# संस्कृतप्रवेश

ग्रंथान् कांश्चित् समालोक्य प्रवेशो रचितो मया ।
कुमाराणां कृते नूनं तेषां तोषाय जायताम् ॥

लेखक

राजाराम दामोदर देसाई, बी. ए.

---

आवृत्ति पांचवी

शक १८४७, सन १९२७

---

किंमत २ रुपये

# पांचव्या आवृत्तीची प्रस्तावना

१. संस्कृतप्रवेशाची ही पांचवी आवृत्ति काढण्याचा सुयोग आला हें त्याची लोकप्रियता वाढत असल्याचें निदर्शक आहे. मात्र ह्याचा प्रवेश सरकारी किंवा निमसरकारी हायस्कुलांत अद्याप झालेला नाहीं. ह्याचा जो काय वापर होतो तो संस्कृत पाठशाळा, राष्ट्रीय विद्यालयें आणि खासगी रीतीनें संस्कृत शिकणारे तरुण व प्रौढ वाचक यांच्यांतच होय.

२. ह्या आवृत्तींत चार सुधारणा केल्या आहेत. ( १ ) पहिल्या दोन आवृत्त्यांप्रमाणेंच प्रथम वाचनपाठ व मग व्याकरण छापलें आहे. ( २ ) वाचनपाठांत जवळ जवळ ८५ पानें नवीन वेंच्यांची भर घातली आहे. ( ३ ) संस्कृत अनुवादाकरितां मराठी वाक्यें व उतारे दिले आहेत. ( ४ ) दुसऱ्या आवृत्तीप्रमाणेंच ह्यांत एक आदर्शपाठ निविष्ट केला आहे.

३. संस्कृतप्रवेशाचा मूळ उद्देश सुभाषितांच्या द्वारें विद्यार्थ्यांचा संस्कृतांत प्रवेश करून द्यावयाचा व सर्व-सामान्य संस्कृत वाङ्मय वाचतांना हरघडीं ज्याची जरूर पडते तेवढेंच व्याकरण शिकवावयाचें व रामायण, महाभारत, मनुस्मृति अशा ग्रंथांचें वाचन सुगम करावयाचें, असा होता. ह्याची पहिली आवृत्ति केवळ समर्थविद्यालयाच्या उपयोगासाठीं अगदीं घाईंत काढली होती. साहजीकपणेंच तें त्याचें बालस्वरूप होतें. पुढें समर्थविद्यालय बंद झालें. तेव्हां तो सर्वप्रकारच्या शाळांत उपयोगी पडावा म्हणून त्याची व्यापक रचना करून ११० पानांच्या पहिल्या आवृत्तीचें रूपांतर २९० पानांच्या तिसऱ्या आवृत्तींत झालें. आणि आतां ही पांचवी आवृत्ति ३७५ पानांची झाली आहे! हिच्यावरून संस्कृतप्रवेशाच्या पहिल्या स्वरूपाची ओळखहि पटणार नाहीं. प्रस्तुत आवृत्तीनें 'भांडारकरांचीं दोन पुस्तकें 'आपट्यांचें गाईड' आणि 'कुसुममाले' सारखें वेंच्यांचें पुस्तक ह्या तिहींचें काम भागणार आहे. शिवाय यांत अंगिकारलेली पद्धत ही जुन्या व नवीन पद्धतींचा मधुर संयोग आहे. आणि अशा पुस्तकाची २ रु. किंमत ही सर्वांच्या आटोक्यांत असावी म्हणूनच ठेवली आहे.

४. ह्यांत निवडलेलीं सुभाषितें ( २५० ), म्हणी आणि उतारे हीं इतकीं उत्तम व विविध आहेत कीं, तीं एकदां मार्मिक रीतीनें समजावून दिलीं म्हणजे तीं गुणगुणत राहावें-तोंडपाठ करावीं असें वाटल्याशिवाय राहणार नाहीं. संस्कृत वाङ्मयांतील ओजस्वी व स्फूर्तिदायक विचार, उदात्त

भावना, चित्ताकर्षक व विविध भाषाशैली, विचक्षण व्यवहारनीति, हृदयाल्हादक वर्णनें, विनोद, विषयवैचित्र्य अशा अनेक दृष्टींनीं वेंच्यांची निवड केलेली आहे, हें अनुक्रमणिकेवरून नुसती दृष्टी फिरविल्यास दिसून येईल.

कै. गु. अण्णा विजापुरकरांनीं दुसऱ्या आवृत्तीवर बऱ्याच सूचना अनुग्रह-पूर्वक लिहून ठेविल्या होत्या. त्यांत करमणुकीचे श्लोक म्हणून दिलेले चार श्लोक पृष्ठ १२७ वर घेतले आहेत. ते विद्यार्थ्यांस गमतीचे वाटतील.

५. संस्कृत अनुवादाकरितां दिलेले मराठी उतारे थोडे आहेत असा आक्षेप येईल. प्रकाशनाची घाई व सं. वाचनपाठांची वाढ ह्यांमुळें ते अधिक देतां आले नाहींत हें तर खरेंच; पण उत्तम संस्कृत वाङ्मयाचेंच वाचन अधिक होणें अनेक दृष्टींनीं लाभदायक आहे असें आमचें मत आहे. भूमि बराच काळ पुष्कळ पाऊस प्याल्यावरच तींतून झरे वाहूं लागतात. तसेंच ह्यांत दिलेले बरेचसे संस्कृत उतारे वाचून विद्यार्थ्यांचा सं. भाषाशैलीशीं परिचय होऊन तिच्याशीं ते समरस झाले म्हणजे मग त्यांजकडून मराठी अनुवाद करवून घ्यावा. पण अगदीं आरंभापासूनच जर मराठी वाक्यांचें भाषांतर करावयास लावलें, तर त्यांस तें योग्य रीतीनें करतां येणार नाहीं. उदा. 'वाशा फुलांचा भ्रमर त्याग करतात ' याचें भाषांतर ते प्रायः ' पर्युषितस्य पुष्पस्य भ्रमराः त्यागं कुर्वन्ति ' असें करतील. पण वाङ्मयाचा परिचय झाल्यावर ' पुष्पं पर्युषितं त्यजंति मधुपाः ' असें सुंदर भाषांतर करतील. तसेंच ' ज्याच्या हातीं ससा तो पारधी ' ह्या म्हणीचा अनुवाद 'शशको हि करे यस्य व्याधोऽसौ मन्यते जनैः ' असा करूं शकतील. १८५ पानावरील पहिल्या ३ परिच्छेदांतील वाक्यें ( वरील म्हण सोडून ) मूळ संस्कृत वाक्यांचें भाषांतर आहेत. शिक्षकांनींहि स्वतः तसें करून वाक्यें द्यावींत किंवा ' जनीं निंद्य तें सर्द सोडोनि द्यावें, ' ' अंग वक्र अधरीं धरि पांवा, ' ' कां न सदन बांधावें कीं त्यांत पुढें बिळें करिल घूस ' अशा मराठी कविता किंवा 'आनंद' मासिकांतील चिमुकल्या गोष्टी संस्कृत अनुवादासाठीं दिल्यास मराठी उताऱ्यांचा अपुरेपणा भरून निघेल.

६. वाचन पाठांतील पहिले १३ पाठ व त्यांच्याबरोबर विविध पाठांतील ' शिक्षातत्त्वम् ' ' लोकोक्तयः,' सुभाषितानि ( खंडः १ ) पंचतंत्र व हितोपदेश यांतील कांहीं गोष्टी पहिल्या वर्षी घ्याव्यात. दुसऱ्या वर्षी १४ ते २५

पाठ आणि विविध पाठांतील कांहीं पाठ आणि तिसऱ्या वर्षी २६ ते ३० पाठ आणि कांहीं विविध पाठ घ्यावेत. आणि नंतर उजळणी अशा विभागणी सुचवाशी वाटते.

७. ज्या ज्या गृहस्थांनीं कोणत्याहि सूचना केल्या त्यांचे आमच्यावर उपकार आहेत. श्री. नी. शं. नवरे, बी. ए., बी. टी. यांनीहि स्नेहपूर्वक बऱ्याच सूचना केल्या. त्यांतील कांहींचा यांत उपयोग केला आहे व त्यांबद्दल त्यांचा ऋणी आहें. वेदशास्त्रोत्तेजक सभेच्या प्रवेशपरीक्षेंतील मराठी उतारे घेण्याची व शिवभारतांतील उतारे घेण्याची परवानगी दिल्याबद्दल अनुक्रमें वे. पं. कृष्णशास्त्री कवडे व श्री. स. म. दिवेकर यांचाहि आभारी आहें. शुद्धिपत्र तयार करण्याच्या कामीं झालेल्या व्याकरणरत्न कात्रे शास्त्री व श्री. गं. रा. जोशी यांच्या साह्याबद्दल त्यांचाहि आभारी आहें.

गंगापुरी, वाई
पौष, शके १८४७. } रा. दा. देसाई

---

# आदर्शपाठ

## ( पहिले ११ पाठ झाल्यानंतर )

**अव्याकरणमधीतं, भिन्नद्रोण्या तरंगिणीतरणम् ।**
**भेषजमपथ्यसहितं, त्रयमिदमकृतं वरं, न कृतम् ॥**

गुरुः—ही आर्या वाच पाहूं. मोरोपंताच्या आर्येप्रमाणेंच. ह्या वृत्ताचें संस्कृत नांव गीति. हिच्या १ ल्या व ३ ऱ्या चरणांत १२ मात्रा आणि २ ऱ्या व ४ थ्या चरणांत १८ मात्रा. पण खऱ्या संस्कृत आर्यावृत्ताच्या ४ थ्या चरणांत १५ मात्रा असतात. ह्यांतील पदें सांगशील ?

शिष्यः—होय, गुरुजी. अव्याकरणं, अधीतं, भिन्नद्रोण्या, तरंगिणीतरणं, भेषजं, अपथ्यसहितं, त्रयं, इदं, अकृतं, वरं, न, कृतं.

गुरुः—ह्यांतील मुख्य वाक्य कोण सांगेल ?

शिष्यः—इदं त्रयं अकृतं वरं, न कृतम्.

गुरुः—ह्यासारखेंच पूर्वीच्या पाठांमध्यें वाक्य गेलें आहे काय ?

शिष्य—आठवत नाहीं. ( कांहीं वेळानें एक हुषार मुलगा उठतो ) होय, गुरुजी. ' वरं मृत्युर्न पुनरपमानः '

गुरुः— याचा अर्थ सांग.

शिष्यः—' अपमानापेक्षां मृत्यु अधिक बरा. '

गुरुः—आतां ह्या आर्येतील वाक्याचा अर्थ कर पाहूं.

शिष्यः—हें तीन करण्यापेक्षां न केलेलें बरें.

गुरुः—त्रयं न. = तीन गोष्टींचा समुदाय. ह्या तीन गोष्टी करण्यापेक्षां न केलेल्या अधिक बऱ्या. आतां ह्या तीन गोष्टी कोणत्या बोल ?

शिष्यः—सगळ्या शब्दांचा अर्थ ठाऊक नाहीं म्हणून नीटसें सांगतां येत नाहीं.

गुरुः—अधीतं = अध्ययन, शिकणें. हा शब्द 'अधि'पूर्वक इ २ प. धातूस त प्रत्यय लागून न. नाम बनला आहे. ( कलम २८९ वाचा ); तरंगिणी = नदी. तरंग ( लाट ) + इन् + ई ( कलमें ११३ ( २ ) आणि ९८ पाहा. ) याचप्रमाणें तटिनी = नदी, ध्वजिनी = सेना, करिणी =

हत्तीण, गृहिणी = भार्या हे शब्द तट, ध्वज, कर ( सोंड), गृह या शब्दांपासून बनले आहेत. भेषजं = औषध. अपथ्यं हा अज्ञानं शब्दाप्रमाणेंच आहे. त्याचा अर्थ सांग.

शिष्यः—प्रकृतीस अपायकारक अन्न-गोष्ट. ( न पथ्यं )

गुरुः—ठीक. अपथ्यसहितं भेषजं = अपथ्येन सहितं भेषजं (औषधं ). आतां तीन गोष्टी कोणत्या तें सांग.

शिष्यः--अधीतं, तरंगिणीतरणं, भेषजं.

गुरुः—आतां 'अव्याकरणं' हा शब्द अज्ञानं, अपथ्यं यांसारखें नाम धरतां येणार नाहीं. कारण तीनच गोष्टी आहेत. 'अधीतं' कसलें तर 'अव्याकरणं' म्हणजे ज्यांत व्याकरण नाहीं='नास्ति व्याकरणं यस्मिन् तत् (अधीतं) असा अर्थ होय. व्याकरणं—वि + आ पूर्वक कृ अन = स्पष्टीकरण, पृथक्करण. कलम २८८ अ पाहा. याचप्रमाणें मृ—मरणं, हृरणं, तृ—तरणं, वद्—वदनं, सद्—सदनं इत्यादि.

भिद् + त (न) = फुटलेली, कलम २७६ आ वाचा. याप्रमाणें छिद—छिन्न, खिद्—खिन्न इत्यादि.

द्रोणी = डोणी. येथें होडी. भिन्नद्रोण्या हा समास सोडव पाहूं.

शिष्यः—भिन्ना द्रोणी भिन्नद्रोणी तया.

गुरुः—आतां सबंध आर्येचा ( गीतीचा ) अर्थ सांग.

शिष्यः--व्याकरणरहित अध्ययन, फुटलेल्या होडीनें नदी तरणें, कुपथ्य करीत औषध घेणें ह्या तीन गोष्टी करण्यापेक्षां न केलेल्याच बऱ्या.

गुरुः--दुसऱ्या दोन गोष्टींत जसा बुडण्याचा व रोग विकोपास जाण्याचा धोका तसाच व्याकरणरहित अध्ययनानें अर्थाचा अनर्थ होण्याचा धोका आहे.

**यद्यपि बहु नाधीषे तथापि पठ पुत्र व्याकरणम् ।**
**स्वजनः श्वजनो मा भूत्, सकलं शकलं, सकृत् शकृत् ॥**

---

# शिक्षकांस सूचना

(१) वाचनपाठ व व्याकरण असे या पुस्तकाचे मुख्य दोन भाग केले आहेत. व्याकरणभागांत अवश्य असें सर्व व्याकरण प्रकरणशः दिलें आहे. तथापि तें सर्व आधीं तयार करून मग वाचनपाठ वाचावयाचे असा अर्थ नसून **प्रत्येक पाठाच्या शिरोभागीं, 'पूर्वतयारीं' त सांगितल्याप्रमाणें तें क्रमाक्रमानें शिकवावयाचें.** 'पूर्वतयारीं 'त ज्या अन्ताच्या नामांचा उल्लेख केला असेल त्या अन्ताच्या एका नामाचीं विभक्तिरूपें नमुन्यादाखल तोंडपाठ करून घ्यावींत; त्याचप्रमाणें ज्या गणाचा उल्लेख केला असेल त्या गणाच्या एका धातूचीं क्रियापदरूपें तोंडपाठ करून घ्यावींत व मग पाठ शिकविण्यास लागावें. 'पूर्वतयारीं 'त उल्लेखिलेल्या इतर नियमांचा उपयोग प्रसंगाप्रमाणें वारंवार दाखवावा; ते तोंडपाठ करून घेण्याचें कारण नाहीं. संधिनियम, संख्यावाचक शब्द, स्त्रीप्रत्यय, समास, नामसाधित व धातुसाधित शब्द इत्यादि भाग अगदीं प्रारंभापासून क्रमाक्रमानें आधीं सोपा व मग कठिण या धोरणानें शिकवावेत. उदाहरणार्थ, दुसऱ्या पाठांतील 'शतमप्यन्धानां न पश्यति' ह्या वाक्यांतील 'शतं' हा संख्यावाचक शब्द 'फल' प्रमाणें चालवितां येईल; फक्त त्याचा उपयोग कसा करतात तेवढें वाक्यरचना प्रकरणांत दाखवावें. 'पञ्चन्'इत्यादि संख्यावाचक शब्द 'आत्मन्', 'नामन्' शब्दांबरोबर चालवून घेऊन त्यांचा उपयोग कसा करावयाचा त्याची माहिती द्यावी. 'षष्' हा शब्द ष्कारान्त शब्दाबरोबर चालवून घ्यावा, आणि सं. वा. च्या उपयोगाची पुनः आठवण करून द्यावी. तत्पुरुषसमासाचा उल्लेखही दुसऱ्याच पाठाच्या पूर्वतयारींत केला आहे. त्यावरून तत्पुरुषासंबंधीची सर्व माहिती त्याच पाठांत करून द्यावयाची असा अर्थ नव्हें; तर त्या पाठापासून 'सूर्योदय' 'फलागम' असले सोपे सोपे तत्पुरुष समास शिकवूं लागावें. हीच गोष्ट नामसाधित शब्दांनाही लागू आहे. 'संपूर्णता', 'विपरीतता' असले सोपे नामसाधित शब्द तिसऱ्या चौथ्या धड्यापासून मुद्दाम आणले आहेत. तेव्हां त्या प्रसंगानें 'ता' हा प्रत्यय कोणत्या अर्थी व कसा लागतो तें सांगावें. याचप्रमाणें 'मार्दवं' शब्द

तिसऱ्या धड्यांत आला आहे. तो 'मृदु' ला कोणता प्रत्यय लागून कसा बनला आहे हें समजावून द्यावें व पुढें प्रसंगाप्रमाणें असेंच करीत जावें. याची घटना नामसाधित प्रकरणांतील तत्संबंधीं कलम दाखवून समजावून द्यावी. 'भूत', 'जित', 'नीत', 'हृत' इत्यादि सोपीं धातुसाधितें 'त' प्रत्यय कोणत्या अर्थीं लागून बनलीं आहेत हें लवकरच म्हणजे पांचव्या सहाव्या धड्यापासून नजरेस आणून देत जावें. याचप्रमाणें भूत्वा, नीत्वा, जित्वा, हृत्वा; जेतुं, नेतुं, हर्तुं इत्यादि धातुसाधितें 'त्वा' व 'तुम्' प्रत्यय कोणत्या अर्थीं लागून कशीं बनतात तें क्रमानें दाखवावें. आणि त्या त्या प्रसंगीं धातुसाधित प्रकरणांतील तीं तीं कलमें वाचून घ्यावीं. अशा रीतीनें त्या त्या विषयाचा थोडथोडा भाग क्रमाक्रमानें अगदीं प्रारंभापासून शिकवीत गेल्यानें व्याकरणाचा बोजा भासणार नाहीं व तें कंटाळवाणें किंवा त्रासदायक होणार नाहीं. निरनिराळ्या पाठांमधून व्याकरणाची जी विभागणी केली आहे ती वाङ्मयांत ज्याचा प्रयोग आरंभापासूनच सर्वत्र फार आढळतो तें आधीं द्यावयाचें, ज्यांचा परस्परसंबंध आहे किंवा ज्यांच्यामध्यें परस्परसाम्य आहे असे भाग एकत्र द्यावयाचे इत्यादि धोरणांनीं केली आहे. उदाहरणार्थ --अस्मद्, युष्मद्, तद्, यद्, किम्, एतद्, इदम् ह्या सर्वनामांच्या रूपांची साहजिकपणें वाङ्मयांत फार लवकर जरूर पडत्ये. म्हणून तीं पांचव्या पाठापासून दिलीं आहेत. तीं त्याच्याही अगोदर शिकविणें अधिक उपयुक्त होईल असें वाटतें. वारि, मधु व दातृ न. यांच्या विभक्तिरूपांत पूर्ण साम्य आहे, म्हणून हीं तीनहि नामें एकत्र दिलीं आहेत. 'धनिन्' 'श्रीमत्' 'श्रेयस्' इत्यादि शब्द ज्या धड्यांत दिले आहेत त्याच धड्यांत 'इन्' 'मत्' 'ईयस्' इत्यादि प्रत्यय कोणत्या अर्थी व कसे लागतात, हें सांगण्याबद्दल सुचविलें आहे. असें करतांना नामसाधित प्रकरणांतील तीं तीं कलमें दाखवावींत. कारण यांचा परस्परसंबंध आहे. उपसर्गांसंबंधीं माहिती २७१ व्या कलमांत दिलेली असली तरी उपसर्गयुक्त धातूंचा उपयोग पहिल्याच पाठापासून थोडथोडा केला आहे. सर्व उपसर्ग एकदम घोकून न घेतां त्यांचा उपयोग कसा करतात हें नुसतें प्रारंभीं सांगून ठेवावें व ज्या उपसर्गाचा प्रयोग वाक्यांत येईल तेवढ्याचाच अर्थ त्या त्या वेळीं सांगावा. व्याकरणाच्या प्रत्येक प्रकरणाच्या प्रारंभीं जी प्रास्ताविक माहिती दिलेली आहे, ती प्रसंगाप्रमाणें सांगावी

किंवा वाचून घ्यावी. प्रत्येक गणांतील नमुन्याच्या धातूचीं क्रियापदरूपें तोंडपाठ करून घेण्यापूर्वी त्या गणांतील धातूंचें अंग कसें बनतें हें समजावून द्यावें; असें केल्यानें रूपसिद्धि लक्षांत येऊन वाक्यांतील रूपें ओळखण्यास सोपें जातें.

( २ ) एक पाठ एका दिवसांत शिकवावयाचा असा उद्देश नाहीं. पाठांची संख्या उगाच फुगूं नये, म्हणून व्याकरण तीस पाठांत वांटून दिलें आहे. विद्यार्थ्यांच्या ग्रहणशक्तीच्या अनुरोधानें व पाठांतील मजकुराच्या मानानें एकेका पाठाला चार, पांच दिवस लागतील. विभक्तिरूपें व धातुरूपें हीं चांगलीं घटावींत म्हणून त्या त्या पाठांत येणारीं नामें व धातु नमुन्याच्या नामाप्रमाणें किंवा धातूप्रमाणें चालवून घ्यावींत.

( ३ ) प्रत्येक पाठ शिकवून झाल्यावर त्या पाठांतील वाक्यें व सुभाषितें उत्तम रीतीनें विद्यार्थ्यांस वाचतां येतील अशी दक्षता ठेवावी. मराठी किंवा इतर कोणत्याही भाषेचें वाचन करून घेतात तसेंच संस्कृताचेंहि करवावें. तीं चांगलीं वाचतां आल्यावर तोंडपाठ करवावींत.

( ४ ) एकाच नामास किंवा धातूस निरनिराळे अनेक प्रत्यय लागून त्यापासून अनेक नामसाधित किंवा धातुसाधित शब्द कसे बनतात हें विद्यार्थ्यांच्या मनावर चांगलें बिंबवावें. असें केल्यानें मूळ नामाचा किंवा धातूचा अर्थ ठाऊक असला म्हणजे त्यापासून बनलेल्या नामसाधितांचा किंवा धातुसाधितांचा अर्थ समजण्यास सोपें जाईल, व प्रत्येक नवीन शब्द सांगण्याचा किंवा पाहण्याचा प्रसंग येणार नाहीं; व नवीन शब्द कसे बनवावेत हेंहि सहज लक्षांत येईल.

( ५ ) संस्कृत व मराठी या भाषांमध्यें ज्या ज्या बाबींत साम्य आढळेल ती ती बाब प्रसंगानुसार विद्यार्थ्यांच्या नजरेस आणून द्यावी. जसें, ( विभक्तिसाम्य ) वानरेभ्यः फलानि रोचन्ते–वानरांस फळें रुचतात ( आवडतात ). तसेंच जे मराठी शब्द संस्कृत शब्दांपासून थोड्या फार फरकानें बनले आहेत ते त्या त्या वेळीं दाखवावे. उदाहरणार्थ, व्याघ्र–वाघ, तृण–तण, वरम्–बरें, पर्ण–पान, स्फार–फार, हस्त–हात, स्थविर–थोर, पुत्र–पूत इत्यादि.

( ७ ) कित्येक नियमांच्यापुढें कंसांत पाणिनीच्या अष्टाध्यायींतील सूत्रें दिलीं आहेत. आवृत्तीच्या वेळीं नियम थोडक्यांत ध्यानांत ठेवण्यास त्यांचा

विद्यार्थ्यांस उपयोग होईल. मात्र सूत्रें पाठ करविणें असेल तर सूत्रांचे अर्थ लावण्याविषयींची माहिती पुस्तकाच्या शेवटीं दिली आहे, त्याप्रमाणें अर्थ समजावून देऊन मग पाठ करवावीं.

(८) पहिल्या कांहीं धड्यांतील बहुतेक वाक्यें संधिविरहित दिलीं आहेत; पुढें क्रमानें सोपे संधि केलेले आहेत. ते संधिप्रकरणांतून दाखवावे.

---

## संक्षेप व चिन्हें

अ.—अव्यय.
आ.—आत्मनेपदी.
इ.—इत्यादि.
उ.—उभयपदी.
उ. किंवा, उ. पु.—उत्तमपुरुष.
ए. किंवा ए. व.—एकवचन.
च.—चतुर्थी.
तृ. तृतीया.
द्वि.—द्वितीया द्विवचन.
द्वि. व.—द्विवचन.
धा. सा.- धातुसाधित.
न.—नपुंसकलिंगी.
ना.—नाट्यशास्त्र.
ना. सा.—नामसाधित.
नि. ब.—नित्यबहुवचनी.
नि. द्वि.—नित्यद्विवचनी.
प.—परस्मैपदी.
पं.—पंचमी.
+ उपसर्गांपुढें धातु घ्यावा असें दर्शविते.

पुं.—पुँल्लिंगी.
प्र.—प्रथमा; प्रथमपुरुष.
प्र. पु.—प्रथम पुरुष.
ब. किंवा ब. व.—बहुवचन.
म. किंवा म. पु.—मध्यमपुरुष.
वि.—विशेषण.
वि. ना.—विशेषनाम.
वे.—वेद.
ष.—षष्ठी.
ष. त.—षष्ठीतत्पुरुष.
सं.—सर्वनाम.
सं.—संबोधन.
स्त्री.—स्त्रीलिंग.
[ ] व्युत्पत्ति दर्शविण्यासाठीं.
( ) शब्दाचा अर्थ, पाणिनीय रूप, वैकल्पिक रूप, धातूचा आदेश—गम् ( गच्छ् ), अध्याहृत शब्द, सूत्र, पोटकलम, उपसर्ग इत्यादि दर्शविण्यासाठीं वापरली आहे.

—शब्दाच्या रूपसिद्धीच्या पायऱ्या किंवा उदाहरण देतांना वापरली आहे.

* नियमांतील ही खूण वार्तिक दर्शविते; पाठांत टीप दर्शविते.

। वाक्याचा किंवा चरणाचा शेवट दर्शविते.

§ कलम दर्शविते.

, शब्दार्थसंग्रहांत पर्यायशब्द दर्शविते.

; शब्दार्थसंग्रहांत निराळा अर्थ दर्शविते, किंवा निराळें उदाहरण दर्शविते.

रूपापुढें २, ३ असा आंकडा तें रूप दोन किंवा तीन वेळां घ्यावयाचें असें दर्शवितो.

---

# अनुक्रमणिका



## १ वाचनपाठ

## २ व्याकरण



# संस्कृतप्रवेश

## वाचनपाठ



### प्रथमः पाठः

**पूर्वतयारी**—अकारान्त पुं. आणि न. शब्द; वर्तमानकाळ–१ ला गण. ४५, ४६, १२८, १२९, १३३, १३४; शिवाय १०७, १०८, २९५, २९६, ३००.

(क) गणेशाय नमः। अत्र बालाः क्रीडन्ति। तत्र शिष्याः पठन्ति। मूर्खान् हसन्ति जनाः। जलं वहति। वातेन जले तरङ्गाः उद्भवन्ति। कदा गच्छसि? अद्य गच्छामि। हे मूर्खाः, सज्जनान् किं वृथा निन्दथ? 'धूर्ताः क्रीडन्ति बालिशैः' (मूर्खैः) एवं जनाः वदन्ति। मूर्खवैधेयबालिशाः इति अमरः। क्व वससि? वेणुग्रामे वसामि। नेत्राभ्यां पश्यामः। अन्धाः अपि पश्यन्ति। अहो आश्चर्यम्! कथमेवं वदसि? अनृतं न वदामि। किं न पश्यन्ति अन्धाः स्पर्शेन? अजीर्णे भोजनं विषम्।

(ख) देवं वन्दे। कुमार, क्व गच्छसि? कृष्णस्य गृहं गच्छामि। नृपः जनान् रक्षति। उद्याने रमन्ते बालाः। हरिणाः तृणेन जीवन्ति। व्याघ्रः मांसं खादति। मार्जाराय दुग्धं रोचते। भारं वहति गर्दभः। बलीवर्दौ शकटं वहतः। उद्योगात् धनं लभामहे। अलसस्य धनं कुतः?

(ग) वानरेभ्यः फलानि रोचन्ते। वृक्षाणां कोटरेषु निवसन्ति शुकाः। आचार्यस्य अग्रे शिष्याः तिष्ठन्ति। प्रातरादित्यमुपतिष्ठन्ते द्विजाः। वातेन वृक्षाः कम्पन्ते, न पर्वताः। अन्नात् भवन्ति भूतानि। पर्जन्यात् अन्नं भवति। मूर्खस्य शरीरं एव वर्धते, न ज्ञानम्। लोकानां कल्याणाय पार्थिवः यतते। प्रातरुद्यानात् पुष्पाणि आहरामि।

---

१. § ३१६ (११). २. § ३१६ (६).

(घ) स्मरसि तातस्य वचनम्? कथं न स्मरामि? शिष्याः आचार्यस्य पादयोः पतन्ति, उपदेशं कर्णाभ्यां पिबंति च। चौराः प्रमत्ते जीवन्ति। नहि चन्द्रात् आतपः भवति। एवं सज्जनात् अपि तापः न भवति। अर्थस्य पुरुषः दासः। यथा बीजं तथा अंकुरः। यथा वृक्षः तथा फलम्। यदा देवः वर्षति तदा तृणानि प्ररोहन्ति। अद्य दीपोत्सवः वर्तते इति जनाः वदन्ति।

उदारस्य तृणं वित्तं, शूरस्य मरणं तृणम्।

## शब्दार्थसंग्रह

### नामें

अनृत न. खोटें.
अर्थ पुं. पैसा.
अश्व पुं. घोडा.
आतप पुं. ऊन्ह.
आचार्य पु. गुरु.
आदित्य पुं. सूर्य.
उद्यान न. बाग.
कोटर पुं., न ढोली.
गर्दभ पुं. गाढव.
चौर पुं. चोर.
तात पुं. बाप.
ताप पुं. त्रास, पीडा.
तृण न. गवत.
दास पुं. गुलाम.
दीप पुं. दिवा.
दुग्ध न. दूध.
देव पुं. देव; मेघदेवता.
द्विज पुं. मुंज झालेला.
नृप पुं. राजा.
नेत्र न. डोळा.
पाद पुं. पाय.
पार्थिव पुं. राजा.
पुष्प न. फूल.
प्रमत्त वि. बेसावध.
बलीवर्द पुं. बैल.
भार पुं. ओझें.
भूत न. प्राणी.
मार्जार पुं. मांजर.
वात पुं. वारा.
वृक्ष पुं. झाड.
वेणुग्राम पुं. बेळगांव.
व्याघ्र पुं. वाघ.
शकट पुं., न. गाडी.
शुक पुं. पोपट.
सज्जन पुं. चांगला माणूस.

### धातु

कम्प् १ आ. कांपणें; हलणें.
क्रीड् १ प. खेळणें.
खाद् १ प. खाणें.
गम् (गच्छ्) १ प. जाणें
गम् आ + येणें.
जीव् १ प. जगणें; पोट भरणें.
दृश् (पश्य्) १ प. पाहणें
धाव् १ प. धावणें.
पठ् १ प. शिकणें.
पत् १ प. पडणें.
भू १ प. होणें; असणें; उत्पन्न होणें.
यत् १ आ. झटणें, यत्न करणें.
रक्ष् १ प. रक्षणें.
रम् १ आ. रमणें.
रुच् १ आ. आवडणें.
रुह् १ प. उगवणें, अंकूर फुटणें.
,, प्र + ,,
लभ् १ आ. मिळविणें.

वद् १ प. बोलणें.
वन्द् १ आ. नमस्कार करणें.
वस् १ प. राहणें.
वस् ( नि ) प. राहणें
वृत् १ आ. असणें.
वह् १ उ. वाहणें; नेणें.
वृध् १ आ. वाढणें.
वृष् १ प. वृष्टि करणें.
स्था ( तिष्ठ् ) १प. उभें राहणें.
,, उप + आ. सेवा– पूजा करणें.
स्मृ १ उ. स्मरणें.
हृ १ उ. घेऊन जाणें.
,, आ + आणणें.

**अव्ययें**

अग्रे पुढें, समोर.
अत्र येथें.
अद्य आज.
अपि देखील.
इति असें.
एवम् असें.
कथम् कसें.
कदा केव्हां.
क्व कोठें.
तत्र तेथें.
तथा तसें.
तदा तेव्हां.
यथा जसें.
यदा जेव्हां.
न नाहीं.
नमस् नमस्कार.
प्रातर् पहाटे.
हि कारण; खरोखर.

## द्वितीयः पाठः

**पूर्वतयारी**—आकारान्त स्त्री. शब्द; वर्तमानकाळ–४ था व ६ वा गण; तपुरुष §§ ४८, १३० १३१, १३३, १३५, १३६. व संधिनियम ९, १०, १३.

( क ) कुतः आगच्छसि ? पाठशालायाः । सूर्यस्योदये तारकाः नश्यन्ति, निशायां पुनराविर्भवन्ति । सुखमिच्छन्ति मानवाः । चिन्तायाः समुद्भवन्ति रोगाः । प्रजानां पालनं नृपस्य धर्मः । धर्ममुपदिशत्याचार्यः । सीता जनकस्य कन्या, रामस्य भार्या । प्रत्यहं प्राक्[1] सूर्योदयात् प्रतिबुध्ये ।

( ख ) विद्या नाम नरस्य भूषणम् । तृष्णया मुखं परिशुष्यति । जलेन तृषा शाम्यति । अतिपरिचयात् अवज्ञा भवति । ज्ञानेनाज्ञानं नश्यति । नगरस्य रथ्यासु क्रीडन्ति बालाः । वर्षासु पल्वले[2] पल्वले भेकाः जायन्ते । मेघानां दर्शनेन मयूराः नृत्यन्ति । कुत्रोपविश्यामः? अत्र शिलायाम् ।

---

१. § ३१७ (७). २. § ३३२.

(ग) शोभन्ते विद्यया विप्राः, लज्जया च कुलाङ्गनाः [शोभन्ते]। उद्यानस्य शोभां पुष्यन्ति लताः। किं वृथा श्राम्यसि ? शतमपि अन्धानां न पश्यति। पतङ्गाः मोहाद्दीपं विशन्ति नश्यन्ति च। बाले, रोदनस्य कारणं पृच्छामि। किं न यच्छसि प्रतिवचनम् ? लज्जया न भाषते बाला। युद्धात् वैरं न शाम्यति। जरा रूपं हरति।

(घ) कापुरुषः स्वल्पेनापि तुष्यति। अन्नमत्रेण शाम्यति। भोजनस्य वेला वर्तते। तत्किमधुना विलम्बध्वे ? न पापानां वधे पापं विद्यते। विना[३]पराधेनाचार्यः कुप्यतीति कथं मन्यसे ? निशायां धनिकानां गृहाणि चोराः प्रविशन्ति धनमपहरन्ति च। शिष्येषु पुत्रव[४]त्स्निह्यत्याचार्य:=यथा पुत्रेषु स्निह्यति तथा शिष्येषु स्निह्यत्याचार्यः।

उत्पद्यन्ते विलीयन्ते दरिद्राणां मनोरथाः।
लोके गुरुत्वं विपरीततां[५] वा स्वचेष्टितान्येव नरं नयन्ति।
नरस्याभरणं रूपं, रूपस्याभरणं गुणः।
गुणस्याभरणं ज्ञानं, ज्ञानस्याभरणं क्षमा ॥

## शब्दार्थसंग्रह.

| | | |
|---|---|---|
| **नामें** | **दरिद्र** वि. दरिद्री. | **मनोरथ** पुं. इच्छा. |
| **अवज्ञा** स्त्री. अनादर. | **धनिक** पुं. श्रीमंत. | **मयूर** पुं. मोर. |
| **आभरण** न. अलंकार. | **नर** पुं. माणूस. | **मानव** पुं. माणूस. |
| **कापुरुष** पुं. क्षुद्र माणूस. | **निशा** स्त्री. रात्र. | **मोह** पुं. मोह. |
| **गुरुत्व** न. मोठेपणा. | **पतङ्ग** पुं. पतंग, टोळ. | **रथ्या** स्त्री. रस्ता. |
| **चेष्टित** न. क्रिया. | **पथिक** पुं. प्रवाशी. | **रूप** न. सौंदर्य. |
| **जनक** पुं. जनक राजा. | **पल्वल** न. डबकें. | **रोदन** न. रडणें. |
| **जरा** स्त्री. म्हातारपण. | **पाप** वि. पापी. | **वर्षा** स्त्री.नि.ब. पावसाळा |
| **तारका** स्त्री. चांदणी. | **प्रतिवचन** न. उत्तर. | **विपरीत** वि. उलट. |
| **तृषा** स्त्री. तहान. | **बाला** स्त्री. मुलगी. | **विप्र** पुं. ब्राह्मण. |
| **तृष्णा** स्त्री. तहान. | **भेक** पुं. बेडूक. | **शत** न. शंभर. |

३. § ३१५ (९) ४. § १२४ (१०). ५. § ११२.

स्व वि. आपलें.

धातु

इष् (इच्छ्) ६प.इच्छिणें.

कुप् ४ प. रागावणें.

जन् (जा) ४ आ. उत्पन्न होणें.

तुष् ४ प. संतुष्ट होणें.

दा (यच्छ्) १ प. देणें.

दिश् ६ उ. दाखवणें.

,, उप + शिकविणें; सांगणें.

नश् ४ प. नाहींसें होणें.

नी १ उ. नेणें.

नृत् ४ प. नाचणें.

पद् ४ आ. जाणें.

,, उद्+उत्पन्न होणें.

पुष् ४ प. पोसणें; वाढविणें.

प्रच्छ् (पृच्छ्) १ प. विचारणें.

बुध् ४ आ. जाणणें.

,, प्रति + जागें होणें.

भू (आविस्) प्रगट होणें, दिसूं लागणें.

मन् ४ आ. मानणें; समजणें.

लम्ब् १ आ. लोंबणें.

,, वि+उशीर करणें.

ली ४ आ. चिकटणें.

,, वि+नाश पावणें.

विद् ४ आ. असणें.

शम् ४ प. शमणें.

शुभ् १ आ. शोभणें.

शुष् ४ प. कोरडें होणें.

श्रम् ४ प. श्रमणें; कष्ट करणें.

स्निह् ४ प. प्रेम करणें.

हृ (अप) १ उ. हरण करणें.

अव्ययें

अधुना आतां

एव च.

किम् कां.

कुतः कोठून.

च आणि.

तत् तर.

नाम खरोखर.

पुत्रवत् पुत्राप्रमाणें.

पुनर् पुनः.

प्रत्यहम् दररोज.

प्राक् पूर्वीं.

वा किंवा.

विना खेरीज.

वृथा व्यर्थ, फुकट.

## तृतीयः पाठः

**पूर्वतयारीः**—इकारान्त पु. शब्द, वर्तमानकाळ—१०वा गण; विशेषण. §§ ४९, १३२, १३३, १३७, ३०५. विसर्गसंधि. ३५, ३७, ३८, ३९.

(क) अग्निर्जलेन शाम्यति। आचारः प्रथमो धर्मः। अग्नये स्वाहा। मधुरेण भाषणेन नराः तुष्यन्ति। वृक्षात् पक्वानि फलानि पतन्ति। युद्धस्य कथा रम्या। श्रद्धया हरिं पूजयति गोपालः। भृशं क्रुद्धो नरः दन्तैरोष्ठं संदशति। दशरथस्य पुत्रो दाशरथिः। क्रोधात्ताडयति पुत्रं जनकः। कवयो भूपतीनां चरित्रानि वर्णयन्ति।

---

१. § ३१६ (११).

(ख) रम्याणां कथानां श्रवणेन बाला हृष्यन्ति। भोजनात्पूर्वं हस्तौ पादौ मुखं च प्रक्षालयामि । ऋषीणामाश्रमेषु निर्भयं संचरन्ति मृगाः। कविषु कालिदासः श्रेष्ठः । पुष्पैः केशान् भूषयन्ति अङ्गनाः। गिरिषु विशालाः पादपाः रोहन्ति । कविः चित्राः कथाः कथयति । तृषितेभ्यः पथिकेभ्यः शीतमुदकं यच्छामः । किं न भक्षयसि मुनिना दत्तानि मधुराणि फलानि ? गिरिभ्यः प्रस्रवन्ति निर्झराः ।

(ग) न हि निम्बात् स्रवति क्षौद्रम् । लोहमपि अभितप्तं मार्दवं भजते । मेघेभ्यः पतितान् जलस्य कणान् चातकः पिबति । राशीनामुदयो लग्नम् । अध्ययनस्य क्लेशं न गणयामि । गृहस्थः अतिथीनन्नेन पूजयति । कुतः अत्र वने पानपात्रं । तत्पाणिभ्यामेव जलं पिबामः । नाभिनन्दामि कृष्णस्य वचनम् । व्याधिः शरीरं पीडयति, आधिश्च चित्तम् । दूरतः पर्वता रम्याः ।

(घ) गीतस्य मधुरो ध्वनिर्जनानां चित्तं हरति । नृपो यदि स्तेनान् न दण्डयति तर्हि जनानां वित्तस्य जीवितस्य च संशय उत्पद्यते । कीदृशस्तृणानामग्निना सह विरोधः? दुराचारो नृपतिः पौरान् जानपदान् च पीडयति । बालानां मधुरैरालापैः प्रमोदामहे ।

अतृणे पतितो वह्निः स्वयमेवोपशाम्यति ।
गर्जन्ति न वृथा शूरा निर्जला इव तोयदाः ।
अमृतं शिशिरे वह्निः । अमृतं प्रियदर्शनम् ।
उद्यमेन हि सिध्यन्ति कार्याणि न मनोरथैः ।
न हि सुप्तस्य सिंहस्य प्रविशन्ति मुखे मृगाः ॥

शुकः शारिका भृङ्गराजो वा सर्पविषशङ्कायां क्रोशति । क्रौञ्चो विषाभ्यांशे माद्यति, ग्लायति जीवंजीवकः, म्रियते मत्तकोकिलः, चकोरस्य च नेत्रे विरज्येते । कौ. अ.

## शब्दार्थसंग्रह

**नामें** — अतृण न. तृणरहित स्थान. अभ्याश पुं. सांनिध्य.
अतिथि पुं. पाहुणा. अभितप्त वि. तापविलेलें. आधि पुं. मानसिक व्यथा.

२. § ३१८ (६); ३. § ३१५ (७).

आलाप पुं. भाषण.
उदक न. पाणी.
उद्यम पुं. उद्योग.
ओष्ठ पुं. ओठ.
कीदृश वि. कसला.
क्रुद्ध वि. रागावलेला.
क्रौंच पुं. करकोंचा पक्षी.
क्षौद्र न. मध.
गिरि पुं. पर्वत.
गीत न. गाणें.
चकोर पुं. चकोर पक्षी.
चरित न. चरित्र.
चातक पुं. चातक पक्षी.
चित्र वि. आश्चर्यकारक.
जनक पुं. बाप.
जानपद पुं. देशवासी.
जीवंजीव पुं. कुकण पक्षी
जीवित न. प्राण.
तृषित वि. तहानेलेला.
तोयद पुं. ढग.
दत्त वि. दिलेला.
दन्त पुं. दांत.
दुराचार वि. दुराचारी.
दूरतः अ. दुरून
निर्जल वि. जलरहित.
निर्झर पुं. झरा.
निम्ब पुं. कडूनिंब.
नृपति पुं. राजा.
पक्व वि. पिकलेला.

पतित वि. पडलेला.
परम वि. श्रेष्ठ.
पात्र न. भांडें.
पादप पुं. झाड.
पान न. पिणें.
पौर पुं. नगरवासी.
भूपति पुं. राजा.
भृंगराज पुं. काकाकुवा
मत्त पुं. मद आलेला.
मार्दव न. मऊपणा.
मुनि पुं. तपस्वी.
मृग पुं. पशु; हरिण.
राशि पुं. ढीग; रास. (मेष वृषभ इ.)
लग्न न. राशीचा उदय.
लोह न. लोखंड.
वह्नि पुं. विस्तव.
वित्त न. संपत्ति, पैसा.
व्याधि पुं. शारीरिक रोग
शारिका स्त्री. मैना.
शिशिर पुं. हिंवाळा.
श्रवण न. ऐकणें.
संशय पुं. धोका.
सुप्त वि. निजलेला.
हस्त पुं. हात.

**धातु**

कथ् १० प. सांगणें.
क्रुश् १ प. ओरडणें.
क्षल १० प. धुणें.
क्षल् (प्र) धुणें
गण् १० प. मोजणें; जुमानणें.
गर्ज् १ प. गर्जणें.
ग्लै १ प. ग्लानि येणें
चर् १ प. हिंडणें; जाणें.
,, सम् ,,
तड् १० प. बडवणें.
दंश्(दश्) १ प. चावणें.
,, सम् + ,,
पा (पिब्) १ प. पिणें.
पीड् १० प. पीडा देणें.
पूज् १० प. पूजणें, सत्कार करणें.
भक्ष् १० प. खाणें.
भज् १ उ. पावणें, पोचणें.
भूष् १० प. भूषविणें.
मद् ४ प. मत्त होणें.
मुद् १ आ. आनंदित होणें.
,, प्र + ,,
मृ ६ आ. मरणें.
रञ्ज् ४ उ. लाल होणें.
,, वि+फिकें पडणें.
वर्ण् १० प. वर्णन करणें.
शम् (उप) ४ प. शान्त होणें; विझणें.
सिध् ४प. सिद्धीस जाणें.
स्नु १ प. पाझरणें.
,, प्र + ,,

**हृष्** ४ प. हर्ष पावणें.

**अव्ययें**

**तर्हि** तर.

**नहि** (न+हि) नाहीं.

**निर्भयम्** निर्भयपणें.

**पूर्वम्** अगोदर, पूर्वी.

**भृशम्** अतिशय, फार.

**यदि** जर.

**सह** समागमें, बरोबर.

**स्वयम्** स्वतः, आपोआप.

**स्वाहा**. देवांना आहुति देणें.

## चतुर्थः पाठः

**पूर्वतयारीः**—उकारान्त पु. शब्द; वर्तमानकाळ—२ रा गण. आकारान्त धातु, अस् धातु. §§५२, १४०, १४१, १५२.

दिवा भानुः प्रकाशते, नक्तं रजनीकरः। गुरूणामाज्ञां शिष्या न कदापि विलंघयन्ति। भवन्ति नम्रास्तरवः फलागमैः। दिवसस्य[1] द्विः स्नामि। गुरवे नमः। प्रातर्मन्दं[2] वाति शीतलो वायुः। गुरुभिर्विनीता नरा लोके मान्यतां यान्ति। विकसितानि कुसुमानीव भान्ति निशायां नक्षत्राणि। वरमद्य कपोतः श्वो मयूरात्। भिक्षुः कौपीनलाभमपि बहु मन्यते।

रत्नं रत्नेन संगच्छते। विष्णोः कृपया न्यूनं सम्पूर्णतां याति। बाह्वोः प्रतापेनाखिलं देशं जयामि। ज्ञानेन[3] हीनाः [नराः] पशुभिः समानाः [सन्ति]। प्रियं मित्रं गुह्यमाख्याति पृच्छति च। तत्र वायोरपि प्रवेशो नास्ति, किं पुनर्मनुष्याणाम्? न पुनरागच्छमीति रामो भणति। जातस्य हि ध्रुवो मृत्युः। किमेवं वृथा जल्पसि? यदि शक्तोऽसि तत् किं न युध्यसे।

वरं मृत्युर्न पुनरपमानः। उत्पतिष्णुर्मृगपतिः प्रथममंगानि संकुचति, पश्चान्मृगमभिपतति च।

शष्पतुल्यं हि मन्यन्ते दयालुं रिपवो नृपम्।
न जरां यान्ति रत्नानि विद्रुमं मौक्तिकं[4] विना।

सिंहः शिशुरपि गजे निपतति। दुःखभरेण न प्रभुरस्मि गात्राणाम्। शिष्यापराधे गुरोर्दण्डः। विधिर्भूतानि सृजति, विष्णुः पाति, महेशः संहरति।

---

१. § ३१८ (७). २. § १०९ (५). ३. § ३१५ (७). ४. § ३१४ (८).

कथं मत्स्याः सलिले सलिलं पिबन्तीति नावगच्छामि। भानोश्चण्डैः रश्मिभिः संतप्ताः पशवस्तरूणां छायां श्रयन्ते।

वितरति गुरुः प्राज्ञे[५] विद्यां यथैव तथा जडे।
निर्वाणाय तरुच्छाया तप्तस्य हि विशेषतः।
यादृशं वपते बीजं तादृशं लभते फलम्।[६]
बहूनामप्यसाराणां समवायो हि दुर्जयः।

## शब्दार्थसंग्रह

नामें

अंग न. अवयव.
आगम पं. येणें, प्राप्ति.
कपोत पुं. पारवा.
कुसुम न. फूल.
कौपीन न. लंगोटी.
गज पुं. हत्ती.
गात्र न. अवयव.
गुरु पुं. गुरु, शिक्षक.
गुह्य न. गुप्त गोष्ट.
जरा स्त्री. म्हातारपण; जुनेपणा.
तरु पुं. झाड.
निर्वाण न. शान्ति; सुख.
प्रभु पुं. स्वामी, मालक.
बाहु पुं. हात.
भर पुं. भार.
भानु पुं. सूर्य.
भिक्षु पुं. भिकारी.
भुत न. प्राणी.
मत्स्य पुं. मासा.
महेश पुं. शंकर.
मान्यता स्त्री. सन्मान.
मृगपति पुं. सिंह.
मौक्तिक न. मोतीं.
रत्न न. रत्न.
रश्मि पुं. किरण.
रिपु पुं. शत्रु.
वायु पुं. वारा.
विद्रुम न. पोंवळें.
विधि पुं. ब्रह्मदेव.
शष्प न. कोंवळें गवत.
शिशु पुं. मूल. बच्चा.
समवाय पुं. समूह, संघ.
संपूर्णता स्त्री. पूर्णपणा.
सलिल न. पाणी.

विशेषणें.

अखिल सर्व, सगळें.
असार निःसत्त्व.
उत्पतिष्णु झडप घाल.
चण्ड प्रखर.
जड मंदबुद्धीचा.
जात उत्पन्न झालेला.
तप्त तापलेला.
तुल्य सारखें.
तादृश तसलें.
दयालु दयाळू.
दुर्जय जिंकण्यास कठिण.
ध्रुव निश्चित, खात्रीचा.
नम्र वांकलेला.
न्यून कमी, उणें.
प्राज्ञ बुद्धिमान्.
यादृश जसलें.
विकसित फुललेलें.
विनीत शिकविलेला.
शक्त समर्थ.
शीतल गार.

---

५. § ३१९ (४). ६. § ३१६ (२).

संतप्त तापलेला.
समान सारखा.
हीन रहित.

अव्ययें

इव प्रमाणें.
कदापि ( कदा+अपि ) केव्हांहि.
तत् तर, म्हणून.
दिवा दिवसा.
द्विस् दोनदा.
नक्तम् रात्रीं.
पश्चात् नंतर.
पुनर् पण.
प्रथमम् पहिल्यांदा, अगोदर.
बहु अतिशय.
मन्दम् संथपणें.
वरम् पेक्षां बरें.
विशेषतः विशेषेंकरून.
वृथा व्यर्थ, फुकट.
श्वस् उद्यां.
हि उदाहरणार्थ; खरेंच.

धातु

अस् २ प. असणें.
काश् १ आ. प्रकाशणें.
,, प्र+ प्रकाशणें.
कुच् ६ प. आंखडणें.
,, सम् + ,,
ख्या २ प. सांगणें.
,, आ + ,,
गम् ( अव ) जाणणें.
गम् (सम्) १ आ. जुळणें; मिळणें.
जल्प् १ प. बडबडणें.
जि १ प. जिंकणें.
तॄ १ प. तरून जाणें.
,, वि + देणें.
पत् ( अभि ) १ प. झडप घालणें.
पत् ( नि ) झडप घालणें.
पा ( पिब् ) १ प. पिणें.
पा २ प. रक्षणें.
भण् १ प. म्हणणें; बोलणें.
भा २ प. प्रकाशणें; दिसणें.
या २ प. जाणें.
युध् ४ आ. लढणें.
लंघ् १० प. उडी मारणें, ओलांडणें.
लंघ् (वि) १० प. उल्लंघणें
वप् १ उ. पेरणें.
वा २ प. वाहणें.
श्रि १ उ. आश्रय करणें
सृज् ६ प. उत्पन्न करणें
स्ना २ प. स्नान करणें.
हृ (सम्) १ उ. संहार करणें.

## पञ्चमः पाठः

पूर्वतयारीः—अस्मद् व युष्मद्. §§ ८७, ८८.

त्वमेव शरणं मम। शिष्यस्तेऽहम्। कथं मयि तवाविश्वासः? अग्रेक्षस्य, कथयामि ते[1] भूतार्थम्। कुत्रास्ति मम पुस्तकम्? अग्रेस्थितमपि कथं न पश्यसि? अपि[2] तिष्ठन्ति युष्माकं निदेशे मम पुत्राः? यूयमेवात्र प्रमाणम्। अहमर्जुनस्य गृहं गच्छामि, आगच्छथ मया सह? असहायोऽस्म्यहम्; कथं मां प्रति यूयं विमुखा भवथ?

---

१. § ३१६ (५). २. § ३३१.

यावदस्माकं प्राणा ध्रियन्ते तावद्वयं त्वां न परित्यजामः। शापितोऽसि मम प्राणैर्यदि त्वमितो गच्छसि । अहमपि, त्वया सहागच्छामि। न कालमपेक्षते स्नेहः। सफला अद्य नो मनोरथाः। त्वं जीवितं त्वमसि मे हृदयं द्वितीयं । न खलु त्वामहं तुलये नाव मन्ये वा। अपि सन्निहितोऽत्र युष्माकं गुरुः? अथ किम्। नावगच्छसि त्वमखिलं वृत्तान्तम्; अतस्त्वमस्मानेवमधिक्षिपासि। करस्पर्शान्म्लायन्ति सुकुमाराणि कुसुमानि। वयस्य, स्वागतं ते[३]। ननु पृच्छामि त्वां कुत्र व्रजासि संभ्रमेण। अनुपपन्नस्ते तर्कः इति नः प्रतिभाति। मधुराणि फलानि तुभ्यमहं प्रयच्छामि। यथा मयि स्निह्यति गुरुस्तथा त्वय्यपि। अशक्तोऽहं गृहारंभे शक्तोऽहं गृहभंजने। गुणः खल्वनुरागस्य कारणं, न बलात्कारः।

सीदन्ति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति।
वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते॥ गीता

## शब्दार्थसंग्रह

**नामें**

**अनुराग** पुं. प्रेम.
**आरंभ** पुं. आरंभणें; करणें
**कर** पुं. हात.
**निदेश** पुं. आज्ञा.
**प्रमाण** न. निर्णयकर्ता.
**प्राण** पुं. (नि.ब.) प्राण.
**बलात्कार** पुं. जबरी.
**भंजन** न. मोडणें.
**भूतार्थ** (भूत+अर्थ) पु. वस्तुस्थिति, खरी गोष्ट.
**रोमहर्ष** पुं. अंगावरील केंस उभे राहणें.
**वयस्य** पुं. मित्र.
**वेपथु** पुं. कम्प, कांपरें.
**शरण** न. रक्षक.
**स्वागत** न. आदरसत्कार.

**विशेषणें**

**अनुपपन्न** अयोग्य.
**असहाय** मित्र-सहाय-हीन
**द्वितीय** दुसरा.
**बहु** पुष्कळ.
**मधुर** गोड.
**विमुख** पराङ्मुख.
**शापित** शपथ घातलेला.
**संनिहित** जवळ असलेला, हजर.
**सफल** सफळ.
**स्थित** उभा राहिलेला; असलेला.

**धातु**

**ईक्ष्** १ आ. पाहणें.
,, **अप**+गरज--जरूर असणें; वाट पहाणें.
**क्षिप्** ६ प. फेकणें.

---

३. § ३१५ (२) ४. § ३१६ (११).

क्षिप् (अधि) निंदा-तिरस्कार करणें.
तुल् (तुलय) १० प. कसाला लावणें, बरोबरी करणें.
त्यज् १ प. टाकणें.
,, परि+ टाकणें.
धृ ६ आ. जगणें.
भा (प्रति) २ प. दिसणें; वाटणें.
मन् (अव) ४ आ. तुच्छ मानणें.
म्लै १ प. म्लान होणें, कोमेजणें.
व्रज् १ प. जाणें.
सद् (सीद्) १ प. बसणें, खचणें.
स्निह् ४ प. प्रेम करणें.

अव्ययें

अतस् म्हणून; येथून.
अथकिम् (अथ+किम्) होय, तर काय.
इतस् येथून.
तावत् तोंपर्यंत.
ननु (न+नु) शंकार्थी.
नु अ. संशययुक्त प्रश्न.
प्रति विषयीं.
यावत् जोंपर्यंत.
वा किंवा.

## षष्ठः पाठः

पूर्वतयारीः—सर्व, तद्, यद्, एतद्, अन्य, किम्, एक, द्वि—पुं. व न.; वर्तमानकाळ—कृ ८ उ. §§ ८२, ८३, ८४, १६७, ११२.

सर्वः कान्तमात्मीयं पश्यति। न वसन्त्येकत्र सर्वे गुणाः। अधुना कुत्र निवससि त्वं? तस्मिन्नेव ग्रामे निवसामि। किमत्र तवागमनस्य कारणम्? इच्छामि दर्शनलाभं प्रियमित्रस्य माधवस्य। तवाविनयादस्मान्स्पृशत्येष दोषः। नास्त्यत्र ममापराधः। एको दोषो गुणसन्निपाते निमज्जति। न कोऽपि संदेहोऽत्र। अपेयेषु तटाकेषु बहुतरमुदकं भवति।

भो गोविंद, कस्यैष प्रासादः? अस्ति कस्यापि धनिकस्य। अहो एतस्य शोभा! न प्रतिनिवर्तेते एतस्मान्मम नयने। नूनमेष नृपस्य प्रासादमुपहसति। अत्र खलु परां सीमां स्पृशति स्थपतेर्गृहनिर्माणकौशलम्। वृक्षो महीरुहः शाखी विटपी पादपस्तरुः इत्यमरः। मूले छिन्ने कुतः पादपस्यावस्थानम्? नह्येष स्थाणोरपराधो यदेनमन्धो न पश्यति। नैतत्त्वय्युपपद्यते यद्बन्धुभिः सह विरोधं करोषि। खलः करोति दुर्वृत्तं तद्धि फलति साधुषु। यच्चिन्त-

१. § ३१७ (५). २. § ३१९ (४).

यामि तदेव मे उपनमतीत्यहो आश्चर्यम्। कस्मान्न दयसे तेषां? सोऽद्यापि शोकं नोज्झति? स्वैर्दोषैर्भवति हि शङ्कितो मनुष्यः। कस्मै वा दुःखमेतत्कथयामि? कं वा शरणमुपयामि? त्वदन्यो न कोऽपि मम सहायो विद्यते। यत्ते रोचते तत्ते प्रयच्छामि। एतयोः फलयोः कतरत्ते रोचते? लोके कोऽप्युत्थितः पतति, कोऽपि पतितोऽप्युत्तिष्ठते। नान्येन दृष्टं स्मरत्यन्यः। एकस्य दुःखस्य न यावदन्तं गच्छामि तावद् द्वितीयं समुपतिष्ठति माम्।

यदेवोपनतं दुःखात् सुखं तद् रसवत्तरम्।
को न याति वशं लोके मुखे पिण्डेन पूरितः।
मृदंगो मुखलेपेन करोति मधुरध्वनिम्॥
यस्यार्थास्तस्य मित्राणि यस्यार्थास्तस्य बान्धवाः।
यस्यार्थाः स पुमाँल्लोके यस्यार्थाः स हि पण्डितः॥
यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः।
स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते॥

काकः कृष्णः पिकः कृष्णः को भेदः पिककाकयोः।
प्राप्ते वसंतसमये काकः काकः पिकः पिकः॥
दरिद्रता धीरतया विराजते कुरूपता शीलगुणैर्विराजते।
कुभोजनं चोष्णतया विराजते कुवस्त्रता शुभ्रतया विराजते॥

## शब्दार्थसंग्रह

अद्यापि अ. अजून.
अन्य स. दुसरा.
अन्ध वि. आंधळा.
अपेय वि. पिण्यास अयोग्य
अवस्थान न. राहणें, स्थिति.
अविनय पुं. उद्धटपणा.
अहो अ. आश्चर्यार्थी.
आत्मीय वि. आपलें.
आश्चर्य न. आश्चर्य.
इतर स. दुसरा.
उत्थित वि. उठलेला; उत्कर्ष पावलेला.
उदक न. पाणी.
एकत्र अ. एके ठिकाणीं.
एतद् स. हा.
कतर स. दोहोंपैकीं कोणतें.
कस्मात् अ. कां.
कान्त वि. सुंदर.
कु अ. (समासारंभीं

---

३. § ३१८ (१३). ४. § ३१७ (७). ५. § ७२.

वाईट, निंद्य.
कृ ८ उ. करणें.
कौशल न. कुशलता.
खल पुं. दुष्ट माणूस.
खलु अ. खरोखर.
चर् १ प. चालणें; करणें.
,, आ+करणें, आचरणें.
चिन्त् १० प. चिन्तणें.
छिन्न वि. तोडलेला.
तटाक पुं., न. तळें.
तद् स. तो.
दय् १ आ. दया करणें.
दर्शन न. पाहणें, भेटणें.
दुर्वृत्त न. वाईट वर्तन.
धनिक पु. श्रीमंत.
धीरता स्त्री. धैर्य.
ध्वनि पुं. आवाज.
नम् १ प. नमस्कार करणें; वांकणें.
,, उप+ जवळ येणें; मिळणें.
नहि अ. नाहीं.
निर्माण न. बनविणें; उत्पन्न करणें.
नूनम् अ. खरोखर.
पद् (उप) ४ आ. योग्य असणें
पण्डित वि. शहाणा.
पर वि. श्रेष्ठ.
पिण्ड पुं. गोळा(अन्नाचा)
पिक पु. कोकिळ.
पूरित वि. भरलेला.
प्रमाण न. निर्णयकर्ता.
प्रासाद पुं. वाडा.
बन्धु पुं. भाऊ.
बहुतर वि. पुष्कळ.
बान्धव पुं. नातलग.
मस्ज् ( मज्ज् ) १ प. बुडणें.
मूल न. मूळ.
यद् अ. कीं.
राज् १ आ. प्रकाशणें.
,, वि+ शोभणें.
लोक पुं. जग, भुवन.
वश पुं. ताबा.
वृत् ( प्रतिनि ) १ आ. परत फिरणें.
शील न. सुस्वभाव, सद्वर्तन.
शुभ्रता स्त्री. पांढरेपणा.
संदेह पुं. संशय.
संनिपात पुं. समुदाय.
सर्व स. सर्व.
सहाय पुं. साह्यकर्ता.
सीमा स्त्री. मर्यादा, हद्द.
स्थपति पुं. शिल्पशास्त्रज्ञ.
स्था ( उद् )—उत्तिष्ठ् १ प. उठणें.
,, समुप+जवळ येणें.
स्थाणु पुं. खांब.
स्पृश् ६ प. स्पर्श करणें.
हस् १ प. हसणें.
,, उप + थट्टा करणें; वरचढ करणें.

## सप्तमः पाठः

पूर्वतयारीः—सर्व, तद्, यद्, इ. स्त्रीलिंगी §§ ८२, ८३, ८४, १६७.

का वेला वर्तत इदानीं ? एष मध्यमारोहति रविर्गगनस्य। कस्मान्नायाति रामचन्द्रोऽद्यापि ? अतिक्रामति भोजनस्य कालः।

नहि जातु विना दंण्डं कश्चिन्मार्गेऽवतिष्ठते । यादृशो यक्षस्तादृशो बलिः । यावत्तैलं तावद् आख्यानम् । कस्त्वम् । कुतः आगच्छसि ? कस्याः पुत्रावेतौ ? मम कन्यायाः । रूपकशतं धारयति मह्यं देवदत्तः । सुतैषा तव क्रीडनकं याचते माम्। धन्याः खलु ताः प्रजा यासां त्वं पालकोऽसि । कां भाषां शिक्षसेऽधुना ? बाले, का त्वम्? अहं नारायणस्य सुता, सुशीलेति मम नामधेयम् । तस्यैतद्भागधेयं योऽस्मान्गोपायतीत्युञ्छस्य षष्ठं भागमारण्यका नृपाय निर्वपन्ति । एतस्यां वेलायां कुत्र वर्तते माधवः ? तस्यामग्निशालायाम्। सर्वासु क्रियासु क्रमते प्रज्ञैतस्याः । एताः कन्यकाः स्वे स्वे कार्ये व्यापृताः सन्ति ।

पुस्तकस्था तु या विद्या परहस्तगतं धनम् ।
कार्यकाले समुत्पन्ने न सा विद्या न तद्धनम् ॥
शोकस्थानसहस्राणि भयस्थानशतानि च ।
दिवसे दिवसे मूढमाविशन्ति न पण्डितम् ॥
आशा नाम मनुष्याणां काचिदाश्चर्यशृङ्खला ।
यया बद्धाः प्रधावन्ति मुक्तास्तिष्ठन्ति पंगुवत् ॥

## शब्दार्थसंग्रह

आख्यान न. कथा.
आरण्यक पुं. अरण्यवासी
आश्चर्य वि. आश्चर्यकारक
इति अ. म्हणून.
इदानीं अ. आतां.
उञ्छ पुं. वेंचलेलें धान्य.
काल पुं. काळ, वेळ.
क्रम् १ आ. अप्रतिहत चालणें.
,, अति+१ प. टळणें.
क्रीडनक न. खेळणें, खेळण्याची वस्तु.
गगन न. आकाश.
गत वि. गेलेला, असलेला.
गुप् ( गोपाय् ) १ प. रक्षणें.
जातु अ. कधीं तरी.
तैल न. तेल.
दण्ड पुं. शिक्षा, शासन.
धन्य वि. भाग्यवान्.
धाव् (प्र) १ प. धावणें.
धृ १० प. देणें लागणें.
नामधेय न. नांव.
पंगु वि. पांगळा.
पुस्तकस्थ वि. (पुस्तके तिष्ठति इति) पुस्तकांत असलेलें.

---

१. § २७० ( २ ). २ § ३१६ ( ७ ). ३. § ३१४ ( ३ ). ४. § ३१६ ( १ ). ५. § ३३२

प्रज्ञा स्त्री. बुद्धि.
बलि पुं. बळी.
भागधेय न. भाग, वांटा.
मध्य न. मध्यभाग.
मार्ग पुं. रस्ता, प्रदेश.
मुक्त वि. सोडलेलें.
मूढ वि. मूर्ख.
यक्ष पुं. कुबेरदूत.
याच् १ आ. मागणें.
रवि पुं. सूर्य.
रुह् (आ) १ उ. चढणें.
रूपक पुं. रुपया.
वप् (निस्)–निर्वप् १ उ. देणें.
विश् (आ) ६ प. शिरणें.
वेला स्त्री. वेळ.
व्यापृत वि. निमग्न.
शाला स्त्री. घर, घराचा भाग.
शिक्ष् १ आ. शिकणें.
शृंखला स्त्री. सांखळी.
षष्ठ वि. सहावा.
समुत्पन्न वि. उत्पन्न झालेलें.
सुता स्त्री. मुलगी.
स्थान न. कारण, प्रसंग.
हस्त पुं. हात.

## अष्टमः पाठः

पूर्वतयारीः—इदम्; प्रयोजक धातु. §§. ८५, २२४, २२५, २३०.

तुष्टोऽस्मि तव भाषणेनानेन। किमिह तूष्णीं तिष्ठन्तीमे बालाः? एभ्यः फलेभ्यो[1] मधुरतराणि सन्तीमानि फलानि। वृत्तान्तमिमं गुरवे कथयामि। यतोऽयं मम संशयं वर्धयति।

इयमस्माकं पाठशाला। अस्यां धर्मशास्त्रं पठन्ति केचित्कुमाराः व्याकरणमभ्यस्यन्ति केचित्, अन्ये केचिदायुर्वेदं शिक्षन्ते, अपरे च बहवो विविधानां भाषाणां ज्ञानमधिगच्छन्ति।

कस्यायं रम्य आश्रमः? कोन्वास्मिन्वसति? नैकोऽपि ग्रामो विद्यते सकाशेऽस्य। बहवोऽस्मिन्मृगा विस्रब्धमितस्ततो विचरन्ति। कथं नामैषां व्याघ्रेभ्यो[2] वृकेभ्यो[3] वा भयं न सम्पद्यते? मन्ये मुनीनां संनिधिरेवाभयमुत्पादयत्येषु। अये कुमारकदंबकस्य कोलाहल इवायाति मे कर्णमार्गम्। अग्रे तावद्गच्छामि।

रक्तानि कुसुमानि सन्ति लतास्वेतासु। अनयोश्च लतयोः पीतानि। सर्वत्र प्रसरति सुरभिर्गन्धः कुसुमानामासाम्। न पश्यामि कमपि जलाशयमत्र। नातिदूरे वर्तते विपुलस्तडागः स्थानादस्मात्[4]। यः सर्वेषां भूतानां तृषां शमयति।

---

१. § ३१७ (४). २. § ११४. ३. § ३१७ (२). ४. § ३१७ (१).

अन्धकारो भयमुत्पादयति हृदये नरस्य। प्रकाशे तु नोत्पद्यते भयम्। कथमिव? यतस्तत्र सर्वं पदार्थजातमभिव्यक्तं भवति। एवमेव ज्ञानं निरस्यति भयमज्ञानात्संभूतम्। न तज्ज्ञानं यन्न निरस्याति भयम्।

ऐश्वर्यादनपेतमीश्वरमयं लोकोऽर्थतः सेवते।
चिता दहति निर्जीवं चिन्ता दहति जीवितम्।
विवक्षितं ह्यनुक्तं संतापं जनयाति।

जलबिन्दुनिपातेन क्रमशः पूर्यते घटः।
स हेतुः सर्वविद्यानां धर्मस्य च धनस्य च॥

## शब्दार्थसंग्रह

अतिदूरे अ. फार दूर.
अनपेत वि. भ्रष्ट न झालेला, युक्त.
अनुक्त वि. न बोललेलें.
अन्धकार पुं. काळोख, अंधार.
अभिव्यक्त वि. स्पष्ट.
अर्थतस् अ. पैशासाठीं.
अस् ४ प. फेकणें.
अभि + अस् अभ्यास करणें.
निस्+,, निरस् दूर करणें.
आयुर्वेद पुं. आर्यवैद्यक.
आश्रम पुं. आश्रम.
इतस्ततस् अ. इकडे तिकडे.
इह अ. येथें.
ईश्वरः धनी, मालक, राजा.
सृ ( प्र ) १ प. पसरणें.
सुरभि वि. सुगंधित.
सेव् १ आ. सेवा करणें.
हेतु पुं. कारण.
ऐश्वर्य न. सत्ता, समृद्धि.
कदंबक न. समूह.
कोलाहल पुं. ओरडा.
क्रमशस्. अ. क्रमानें.
गन्ध पुं. वास.
गम् ( अधि ) १ प. मिळविणें.
घट पुं. घागर
चर् (वि) १ प हिंडणें.
चिता स्त्री. चिता, सरण.
जन् ४ आ. प्रयो. उत्पन्न करणें.
जलाशय पुं. तळें.
जीवित न. प्राण.
तडाग पुं., न. तळें
तुष्ट वि. संतुष्ट.
तूष्णीम् अ. स्तब्ध.
दह् १ प. जाळणें.
निपात पुं. पडणें; टिवकणें, गळणें.
निर्जीव वि. प्राणरहित.
पद् ( उद् ) ४ आ. प्रयो. उत्पन्न करणें.
,, सम् + उत्पन्न होणें.
पीत वि. पिवळें.
पूर् ४ आ. भरणें.
यतस् अ. ज्याअर्थी,
रक्त वि. तांवडें.

**विपुल** वि. मोठा, विस्तीर्ण **विस्रब्धं** अ. निर्भयपणें. **संभूत** वि. उत्पन्न झालेलें.
**विवक्षित** वि. बोलूं इच्छिलेलें. **वृक** पुं. लांडगा. **सकाश** पुं. सांनिध्य. **सांनिध्य** पुं. सांनिध्य.

## नवमः पाठः

**पूर्वतयारीः**—ईकारान्त व ऊकारान्त स्त्री. शब्द—नदी, वधू; आज्ञार्थ. §§ ५६, ५९, १२८ ( ३ ), १३४ ते १३७, १४१, १५२, १६७.

नदी वेगेन शुध्यति। गोदावर्या वामे तीरे पंचवटी तिष्ठति। क्रोशोऽस्माद्ग्रामाद्वापी; तस्या आनयन्ति जलं नार्यः। को भेदो वाप्याः कूपस्य च? वापी सोपानमार्गेण युक्ता वर्तते, कूपस्य तु न विद्यते सोपानमार्गः। कृष्णा रजनी चोराणामानन्दाय सम्पद्यते; शुक्ला तु न तथा। चंच्वा युध्यन्ते विहगाः। कुक्कुटस्तु चरणाभ्यामपि युध्यते। अत एव तं चरणायुधं वदन्ति। इतो व्याघ्र इतस्तटी। नहि कमलिनीं दृष्ट्वा ग्राहमवेक्षते मतंगजः। त्रिशंकुरिवान्तराले तिष्ठ। तिष्ठतु तावद्ग्रामवृत्तान्तः संग्रामवृत्तान्तं कथय। वयस्य प्रतीक्षस्व मां मुहूर्तम्। जननि, अभिवादये त्वाम्; वत्स, चिरं जीव। लोका दुर्गाणि तरन्तु भद्राणि च पश्यन्तु। उत्तिष्ठ दासि, गच्छ, शीघ्रमानय जलं, पिपासा मां प्रबाधते। द्वारे तिष्ठत्यन्धोऽयं कश्चित्; प्रयच्छास्मायन्नं किंचित्। मोदन्तां सर्वे जनाः। अद्यानध्यायोऽस्ति, तद्रमध्वं यथेष्टम्। सर्वमास्ति मम गृहे; कथय किं ते प्रयच्छानि। किं शिक्षामहै वयं? आयुर्वेदमुत धनुर्वेदम्? वत्से, जनन्यामिव वर्तस्व तव श्वश्र्वाम्। पराजयस्व शत्रून्, लभस्व विजयम्।

धर्मं चरत माऽधर्मं सत्यं वदत माऽनृतम्।
दीर्घं पश्यत मा ह्रस्वं परं पश्यत माऽपरम्॥

---

१. § ३१७ ( २ ). २. § ३१८ ( ९ ). ३. § ३१५ ( ७ ). ४. § ३१६ ( ३ ). ५. § ३१९ ( ४ ).

अलसस्य कुतो विद्या अविद्यस्य कुतो धनम् ।
अधनस्य कुतो मित्रममित्रस्य कुतः सुखम् ॥
विदेशेषु धनं विद्या व्यसनेषु धनं मतिः ।
परलोके धनं धर्मः शीलं सर्वत्र वै धनम् ।
अपसर मधुकर दूरं परिमलबहलेऽपि केतकीकुसुमे ।
इह नहि मधुलवलाभो भवति परं धूलिधूसरं वदनम् ॥

## शब्दार्थसंग्रह

अतस् अ. म्हणून
अधन वि. दरिद्री.
अनध्याय पुं. सुटी.
अन्तराल न. मधली जागा, पोकळी.
अन्ध वि. आंधळा.
अपर वि. कनिष्ठ.
अमित्र वि. मित्रहीन.
अलस वि. आळशी.
अविद्य वि. विद्याहीन.
आयुध न. शस्त्र.
इतस् अ. येथून.
ईक्ष् (अव) १ आ. पाहणें.
,, (प्रति) वाट पाहणें.
कमलिनी स्त्री. कमळीण.
कुक्कुट पुं. कोंबडा.
कूप पुं. कुवा, आड.
कृष्ण वि. काळा.
क्रोश पुं. कोस.
गोदावरी स्त्री. गोदावरी नदी.
ग्राह पुं. मगर, सुसर.
चंचू स्त्री. चोंच.
चर् १ पं. आचरणें.
चरण पुं. पाय.
चरणायुध पुं. कोंबडा.
चिरम् अ. दीर्घ काळ.
जननी स्त्री. आई.
जि (परा) १ आ. पराभव करणें.
तटी स्त्री. कडा.
तावत् अ. सध्यां, आतां.
तु अ. परंतु.
त्रिशंकु पुं. एक सूर्यवंशीय राजा.
दीर्घम् अ. लांब, दूरवर.
दुर्ग न. संकट.
दृष्ट्वा अ. पाहून.
द्वार न. दार.
धनुर्वेद पुं. तिरंदाजी.
धूसर मलिन.
धूलि स्त्री. धूळ, पराग.
नारी स्त्री. स्त्री.
नी (आ) १ उ. आणणें
पंचवटी स्त्री. एक क्षेत्र.
पर वि. श्रेष्ठ.
परं अ. परंतु.
परिमल पुं. सुगंध.
पिपासा स्त्री. तहान.
बहल विपुल.
बाध् १ आ. त्रास देणें.
,, प्र + ,,
मतंगज पुं. हत्ती.
मा. अ. नको.
मुहूर्त पुं. क्षण.
यथेष्टम् अ. इच्छेप्रमाणें.
युक्त वि. सहित.
रजनी स्त्री. रात्र.
वत्स पुं. मुलगा.

**वत्सा** स्त्री. मुलगी. **विहग** पुं. पक्षी. **श्वश्रू** स्त्री. सासू.
**वापी** स्त्री. विहीर. **वेग** पुं. प्रवाह, गति. **संग्राम** पुं. लढाई.
**वाम** वि. डावा. **शीघ्रम्** अ. जलद. **सोपान** न. पायऱ्या.
**वद् (अभि)** १ उ. प्रयो. नमस्कार करणें. **शुक्ल** वि. पांढरा; चांदण्याचा. **स्था** १ प. असणें, राहणें.
**ह्रस्वम्** अ. आखुड, जवळ.

## दशमः पाठः

**पूर्वतयारीः**—इकारान्त व उकारान्त स्त्री. शब्द—मति, धेनु; विध्यर्थ. §§ ५०, ५३, १२८ (४), १३४ ते १३७, १४१, १५२, १६७.

बुद्धिर्यस्य बलं तस्य । कां वृत्तिमुपजीवत्यार्यः ? अध्यापनेन वर्ते। न परस्य धनाय लुभ्येत् । भक्त्या गुरुं सेवेत । जातौ जातौ भिन्ना आचाराः । न नग्नः स्नानमाचरेत् । न मार्गेत् स्वोत्कर्षं परेषां निन्दया । विद्यया कीर्तिं लभेथा धनं च । अत्यादरः शंकनीयः । मनोरथानामगतिर्न विद्यते । स भारः सौम्य भर्तव्यो यो नरं नावसादयेत् । पिण्डखर्जूरैरुद्वेजितस्य तिंतिण्यामभिलाषो भवेत् । अभिज्ञः खल्वासि लोकव्यवहाराणाम्, तदुपदिश कथमहं समयेऽस्मिन्वर्तेय । सुखार्थाः सर्वभूतानां मताः सर्वाः प्रवृत्तयः । अनिष्टादिष्टलाभेऽपि न गतिर्जायते शुभा । धर्मो भूत्यै कल्पते ।

नित्यं शास्त्राण्यवेक्षेत धत्यानि च हितानि च ।
नित्यं प्रच्युतिशंकया क्षणमपि स्वर्गे न मोदामहे ।
मक्षिका व्रणमिच्छन्ति धनमिच्छन्ति पार्थिवाः ।
नीचाः कलहमिच्छन्ति शान्तिमिच्छन्ति साधवः ॥
अपूर्वः कोऽपि कोशोऽयं विद्यते तव भारति ।
व्ययतो वृद्धिमायाति क्षयमायाति संचयात् ॥
अजरामरवत् प्राज्ञो विद्यामर्थं च साधयेत् ।
गृहीत इव केशेषु मृत्युना धर्ममाचरेत् ॥

---

१. 'लुभ्' चा चतुर्थी किंवा सप्तमीशीं प्रयोग होतो. २. §३३२. ३. §३३७. (४). ४. §३१६ (३).

नाप्सु मूत्रं पुरीषं वा ष्ठीवनं वा समुत्सृजेत् ।
अमेध्यलिप्तमन्यद्वा लोहितं वा विषाणि वा ॥
तावद्भयाद्हि भेतव्यं यावद्भयमनागतम् ।
आगतं तु भयं वीक्ष्य प्रहर्तव्यमभीतवत् ।
अनारोग्यमनायुष्यमस्वर्ग्यं चातिभोजनम् ।
अपुण्यं लोकविद्विष्टं तस्मात्तत्परिवर्जयेत् ॥
बकवच्चिन्तयेदर्थान् सिंहवच्च पराक्रमेत् ।
वृकवच्चावलुम्पेत शशवच्च विनिष्पतेत् ॥

## शब्दार्थसंग्रह.

**अगति** स्त्री. प्रवेश नसणें.
**अजर** वि. म्हातारपण नसलेला.
**अतिभोजन** न. फार खाणें.
**अत्यादर** पुं. अतिआदर.
**अध्यापन** न. शिकविणें.
**अनागत** वि. न आलेलें.
**अनायुष्य** वि. आयुष्याला विघातक.
**अनारोग्य** वि. आरोग्याला विघातक.
**अनिष्ट** वि. अप्रिय; अशुभ.
**अप्** स्त्री. (नि. ब.) पाणी.
**अपुण्य** वि. पुण्यहीन.
**अपूर्व** वि. विलक्षण.
**अभिज्ञ** वि. माहितगार.
**अभिलाप** पुं. इच्छा.
**अभीत** वि. न भ्यालेला.
**अमर** वि. न मरणारा.
**अमेध्य** न. अपवित्र वस्तु.
**अस्वर्ग्य** वि. स्वर्गप्राप्तीस विघातक.
**आगत** वि. आलेलें.
**आर्य** पुं. श्रेष्ठ, पूज्य मनुष्य.
**इष्ट** वि. प्रिय.
**उद्वेजित** वि. वीट आलेला.
**कलह** पुं. भांडण.
**क्लृप्** १ आ. समर्थ, योग्य होणें.
**केश** पुं. केस.
**कोश** पुं. खजिना, संपत्ति.
**क्रम्** (**परा**) १ प. हल्ला करणें.
**क्षय** पुं. नाश.
**खर्जूर** पुं. खजूर.
**गति** स्त्री. परिणाम, शेवट, स्थिति.
**गृहीत** वि. घेतलेला, धरलेला.
**जीव्** (**उप**) १ प. निर्वाहार्थ आश्रयणें.
**तिंतिणी** स्त्री. चिंच.
**दिश्** (**उप**) ६ उ. सांगणें.
**धन्य** वि. धनोत्पादक.
**नित्यम्** अ. नेहमीं.

---

५. §६७.

**नीच** वि. निंद्य.
**पत्** ( **विनिस्** ) १ प. झुकांडी देऊन बाहेर पडणें.
**पिण्डखर्जूर** पुं. पिंड नांवाचा खजूर.
**पुरीष** न. विष्ठा.
**प्रच्युति** स्त्री. पतन, भ्रंश.
**प्रवृत्ति** स्त्री. उद्योग.
**प्रहर्तव्य** वि. मारण्यास योग्य.
**बक** पुं. बगळा.
**भर्तव्य** वि. धारण करण्यास योग्य.
**भारती** स्त्री. वाणी, सरस्वती.
**भूति** स्त्री. कल्याण.
**भेतव्य** वि. भिण्यास योग्य.
**मक्षिका** स्त्री. माशी.
**मत** वि. मान्य, अभिप्रेत.
**मार्ग्** १ प. मिळवूं पाहणें.
**या** (**आ**) २ प. येणें.
**लिप्त** वि. माखलेला.
**लुप्** ( **लुम्प्** ) ६ उ. हिरावून नेणें.
,, अव+झडप घालणें.
**लुभ्** ४ प. लोभ धरणें.
**लोहित** न. रक्त.
**वृज्** १० प. त्याग करणें, टाळणें.
,, **परि** + ,, ,,
**विद्विष्ट** वि. तिरस्कृत.
**वीक्ष्य** अ. पाहून.
**वृत्** १ आ. पोट भरणें.
**वृत्ति** स्त्री. पोटाचा धंदा.
**वृद्धि** स्त्री. वाढ.
**व्ययतस्** अ. खर्चल्यानें.
**व्रण** पुं. जखम.
**शंकनीय** वि. शंका घेण्यास योग्य.
**शंका** स्त्री. भीति.
**शश** पुं. ससा.
**शुभ** वि. कल्याणकारक.
**ष्ठीवन** न. थुंकी.
**संचय** पुं. सांठविणें; सांठा.
**सद्** (**अव**) १ प. प्रयो. नाश करणें.
**समय** पुं. काळ.
**साध्** ४, ५ प. प्रयो. मिळविणें.
**सुखार्थ** वि. सुखासाठीं.
**सृज्** १ प. उत्पन्न करणें.
,, **समुद्**+टाकणें, फेंकणें.
**सौम्य** वि. भला (माणूस).
**हित** वि. हितकारक.

## एकादशः पाठः

**पूर्वतयारीः**—त्, थ्, द्, ध्, प्, भ्—अन्ताचे शब्द; धी, भू, नी. §§ ५७, ५८, ६०, ६५, ६७.

स सुहृद् व्यसने यः स्यात् । जननि, क्षुधा सीदति मे शरीरं, प्रयच्छ मे खाद्यं किंचित् । साहसे श्रीः प्रतिवसति । निस्पृहस्य तृणं जगत् । आपदर्थे धनं रक्षेत् । त्वं जीव शरदः शतम् । काश्चि-

---

१. § ३१४ (२). २. § ३०७ (अ).

त्सरितः समुद्रेण संगच्छन्ते, काश्चिदन्याभिः सरिद्भिश्च। अनिर्वेदः श्रियो मूलम्। न हि कोकिलाः कूजन्तीति काका मूकीभवन्ति । नैतादृशं पुरुषरत्नं भुवि विद्यते। चन्द्रसूर्यौ जगतो नेत्रे इति वर्णयन्ति कवयः। बान्धवस्नेहं राज्यलोभोऽतिवर्तते। धनिकाधमर्णयोरन्तरे यस्तिष्ठति विश्वासार्थं स प्रतिभूः। अप्रतिषिद्धमनुमतं भवति।

नोदके शकटं याति न च नौर्गच्छति स्थले। स देशः प्रवरो यत्र कुटुंबभरणं भवेत्। जाड्यं धियो हरति सज्जनसंगतिः। भक्ष्य-भक्षकयोः प्रीतिर्विपत्तेरेव कारणम्। यदेव रोचते यस्मै भवेत्तत्तस्य सुंदरम्। मुहुः पुनः पुनः शश्वदभीक्ष्णमसकृत्समाः इत्यमरः।

प्रक्षालनाद् हि पंकस्य दूरादस्पर्शनं वरम्।
यथा ह्येकेन चक्रेण न रथस्य गतिर्भवेत्।
एवं पुरुषकारेण विना दैवं न सिध्यति ॥
चिन्तनीया हि विपदामादावेव प्रतिक्रिया।
न कूपखननं युक्तं प्रदीप्ते वह्निना गृहे ॥
शरदि न वर्षति गर्जति, वर्षति वर्षासु निःस्वनो मेघः।
नीचो वदति न कुरुते, वदति न साधुः करोत्येव ॥
व्याघ्री यथा हरेत्पुत्रान् दंष्ट्राभ्यां न च पीडयेत्।
भीता पतनभेदाभ्यां तद्वद्वर्णान् प्रयोजयेत् ॥
दुर्जनस्य च सर्पस्य वरं सर्पो न दुर्जनः।
सर्पो दशति कालेन दुर्जनस्तु पदे पदे ॥
लोभात्क्रोधः प्रभवति लोभात्कामः प्रजायते।
लोभान्मोहश्च नाशश्च लोभः पापस्य कारणम् ॥

---

३. § १२४ (८). ४. § ३३८ (ई). ५. § ३३७ (३). ६. § ३१७ (४). ७. § ३१९ (५). ८. § ३१७ (३). ९. § ३१८ (९).

अमन्त्रमक्षरं नास्ति, नास्ति मूलमनौषधम् ।
अयोग्यः पुरुषो नास्ति, योजकस्तत्र दुर्लभः ॥
विद्या विवादाय धनं मदाय शक्तिः परेषां परिपीडनाय ।
खलस्य, साधोर्विपरीतमेतज्ज्ञानाय दानाय च रक्षणाय ॥
क्षते प्रहारा निपतन्त्यभीक्ष्णं धनक्षये वर्धति[11] जाठरो[12]ऽग्निः ।
आपत्सु वैराणि समुद्भवन्ति छिद्रेष्वनर्था बहुलीभवन्ति[13] ॥

## शब्दार्थसंग्रह

अधमर्ण पुं. ऋणको.
अनिर्वेद पुं. उमेद, उत्साह.
अनुमत वि. मान्य, कबूल.
अनौषध वि. औषध नसलेलें.
अभीक्ष्णम् अ. वारंवार.
अमन्त्र वि. मंत्र नसलेलें.
अर्थे अ. साठीं.
आदि पु. आरंभ.
आपद् स्त्री. आपत्ति.
एतादृश वि. असला.
काम पुं. इच्छा.
कालेन अ. कधीं तरी.
कूज् १ प. गुणगुणणें.
क्षत न. जखम.
क्षय पुं. नाश, ह्रास.
क्षुध् स्त्री. भूक.
खनन न. खणणें.
खाद्य न. खाण्याचा पदार्थ
चिन्तनीय वि. विचार करण्यास योग्य.
छिद्र न. भोंक, व्यंग.
जगत् न. जग.
जाठर वि. पोटांतील.
जाड्य न. जडपणा, मंदपणा.
तद्वत् अ. त्याप्रमाणें.
तु अ. परंतु.
दंष्ट्रा स्त्री. सुळा; दाढ.
दूरात् अ. दुरून.
धनिक पुं. धनको.
धी स्त्री. बुद्धि.
निःस्पृह वि. इच्छारहित
निःस्वन वि. गर्जनारहित
नौ स्त्री. नौका, नाव.
पंक पुं. चिखल.
पतन न. पडणें.
परिपीडन न. पीडा देणें.
पुरुषकार पुं. उद्योग, पराक्रम.
प्रक्षालन न. धुणें.
प्रतिक्रिया न. प्रतिकार, निवारण.
प्रतिभू पुं. जामीन.
प्रतिषिद्ध वि. निषेध केलेलें.
प्रदीप्त वि. पेटलेलें.
प्रवर वि. श्रेष्ठ.
प्रहार पुं. तडाखा.
बहुल वि. पुष्कळ.
भक्षक पुं. खाणारा.
भक्ष्य न. खाण्याचा पदार्थ
भरण न. पोषण.
भीत वि. भ्यालेला.
भू स्त्री. भूमि, जमीन.

---

१०.§३१६(४). ११. परस्मैपद अनियमित. १२.§११५. १३.§१२४(८).

भेद् पुं. फुटणें.
मद् पुं. गर्व.
मूक वि. मुका; न बोलणारा.
युज (प्र.) ६ उ. प्रयो. वापरणें.
युक्त वि. योग्य.
योजक वि. उपयोग करणारा.
वर्ण पुं. अक्षर.
वस् (प्रति) १ प. शेजारीं-जवळ राहणें.
विपत्ति स्त्री. संकट, अरिष्ट.
विपद् स्त्री. विपत्ति.
विवाद पुं. भांडण; वाद.
वृत् (नि) १ आ. परत फिरणें.
,, (अति) अतिक्रमण करणें, वरचढ करणें.
व्यसन न. संकट.
व्याघ्री स्त्री. वाघीण.
शरद् स्त्री. शरदृतु; वर्ष.
श्री स्त्री. लक्ष्मी, संपत्ति.
संगति स्त्री. सहवास.
सरित् स्त्री. नदी.
साहस न. धाडस.
सुहृद् पुं. मित्र.
स्थल न. जमीन.
स्नेह पुं. प्रेम.
हृ १ उ. नेणें; नाहींसें करणें.

## द्वादशः पाठः

पूर्वतयारीः—ऋकारान्त पुं. व स्त्री. शब्द, अनद्यतनभूतकाळ--१ ला, ४ था, ६ वा, १० वा गण; अस्, कृ; तृ व त प्रत्ययान्त धा. सा., बहुव्रीहि. §§ ६१, ६२, १२८ (२), १३३ (३), १३४ ते १३७, १५२, २७६ २८५, ३४४.

अप्रियस्य च पथ्यस्य वक्ता श्रोता च दुर्लभः। परोपदेशे पाण्डित्यं सर्वेषां सुकरं नृणाम्। सुखोपरुद्धा हि पुत्राः पितरमभिद्रुह्यन्ति। नाध्यगच्छमल्पामपि निद्रां रात्र्यामतीतायाम्। यस्यास्ति धनं स किं क्रोडे कृत्वा दर्शयति? कति संवत्सरांस्त्वं काश्यामवसः? त्रीन्संवत्सरांस्तत्रावसं, न्यायं चापठम्। यदा सभां प्राविशन्नृपस्तदोदतिष्ठन्सभ्याः सर्वे। 'पितॄन्समनुजायन्ते नराः, मातरमङ्गनाः' इति लोकप्रवादो वर्तते। पितरि[1] स्थिते सुखान्यनेकान्यहमन्वभवम्। दुहितुर्भर्तारं

१. § ३१९ (५).

पर्यंतच्या शब्दांना अ ऐवजीं म लागतो व त्यापूर्वीं अन्त्य न् चा लोप होतो. जसें, एकादश, द्वादश इत्यादि; विंश-विंशतितम, त्रिंश-त्रिंशत्तम, चतुश्चत्वारिंश-चतुश्चत्वारिंशत्तम, पञ्चाश-पञ्चाशत्तम, एकषष्ट-एकषष्टितम; द्विसप्तत-द्विसप्ततितम, पञ्चनवत-पञ्चनवतितम इत्यादि; पण षष्टितम, अशीतितम, शततम, सहस्रतम. ( तस्य पूरणे डट्। नान्तादसंख्यादेर्मट्। विंशत्यादिभ्यस्तमडन्यतरस्याम्। नित्यं शतादिमासार्धमाससंवत्सराच्च। षष्ट्यादेश्चासंख्यादेः। )

## स्त्रीप्रत्यय

९५. कांहीं शब्द मूळचेच स्त्रीलिंगी असतात. उदाहरणार्थ, मातृ, धेनु, सरित्, धी, माला, सेना, इत्यादि; परंतु पुष्कळ शब्द स्त्रीत्ववाचक प्रत्यय लागून स्त्रीलिंगी बनतात. हे प्रत्यय मुख्यतः आ आणि ई असे दोन आहेत.

९६. अकारान्त विशेषणांचें व कांहीं अकारान्त नामांचें स्त्रीलिंग प्रायः आ प्रत्यय लागून होतें. जसें, धवल-धवला, शुक्ल-शुक्ला, गत-गता, ज्ञेय-ज्ञेया, वर्धमान-वर्धमाना; अज-अजा, एडक-एडका, अश्व-अश्वा, बाल-बाला, वत्स-वत्सा, कोकिल-कोकिला, इत्यादि. ( अजाद्यतष्टाप्। ).

९७. अन्तीं प्रत्ययाचा क असणाऱ्या शब्दांचें स्त्रीलिंग आ प्रत्यय लागून होतें व हा आ लागतांना क च्या मागील अ चा सामान्यतः इ होतो. जसें, कारक-कारिका, दारक-दारिका, गणक-गणिका, सूतक-सूतिका, बालक-बालिका, मूषक-मूषिका किंवा मूषका.

९८. ऋकारान्त व न् कारान्त नामांचें स्त्रीलिंग ई प्रत्यय लागून होतें. जसें, धातृ-धात्री, करिन्-करिणी, राजन्-राज्ञी, श्वन्-शुनी, मघवन्-मघोनी. पण वन् प्रत्ययान्त नामांना हा ई प्रत्यय लागतांना अन्त्य न् चा र् होतो. जसें, पीवन्-पीवरी, धीवन्-धीवरी, शर्वन्-शर्वरी. ( ऋन्नेभ्यो ङीप्। वनो र च। )

९९. (१) अत् ( शतृ ), (२) तवत् ( क्तवतु ), (३) वस् ( क्वसु ), (४) मत्-वत् ( मतुप् ), (५) ईयस् ( ईयसुन् ) हे प्रत्यय लागून बनलेल्या धातुसाधितांचें व नामसाधितांचें, त्याचप्रमाणें (६) अञ्च् धात्वन्त विशेषणांचें स्त्रीलिंग ई प्रत्यय लागून होतें. अत् प्रत्ययान्त धातुसाधितांचें व अञ्च्धात्वन्त विशेषणांचें स्त्रीलिंगी रूप नपुं. प्रथमेच्या द्विवचनाप्रमाणें होतें. ( ७९ अ ) पहा.

क्रमानें उदाहरणें:–(१) पचत्–पचन्ती, भवत्–भवन्ती (पण भवत्=आपण-चें भवती), कुर्वत्–कुर्वती, शृण्वत्–शृण्वती, सत्–सती, ददत्–ददती, यात्–याती किंवा यान्ती, तुदत्–तुदती किंवा तुदन्ती, चोरयत्–चोरयन्ती, रुन्धत्–रुन्धती, गृह्णत्–गृह्णती; (२) कृतवत्–कृतवती; गतवत्–गतवती; (३) निषेदिवस्–निषेदुषी, तस्थिवस्–तस्थुषी, विद्वस्–विदुषी; (४) श्रीमत्–श्रीमती, बलवत्-बलवती (५) श्रेयस्–श्रेयसी, भूयस्–भूयसी, गरीयस्–गरीयसी; (६) प्राच्–प्राची, प्रत्यच्–प्रतीची, उदच्–उदीची, सम्यच्–समीची इत्यादि. ( **उगितश्च** । )

**१००.** उकारान्त गुणवाचक शब्दांचें स्त्रीलिंग विकल्पानें ई प्रत्यय लागून होतें. जसें, मृदु–मृद्वी किंवा मृदु, लघु–लघ्वी किंवा लघु.

परंतु अन्त्य उ च्या मागें जोड व्यंजन असल्यास हा ई प्रत्यय लागत नाहीं. जसें, पाण्डु—पाण्डु. ( **वोतोगुणवचनात्** ।), **खरुसंयोगोपधात्** । )

बहु, रात्रि, पद्धति, चण्ड या व अशा कांहीं नामांना विकल्पानें ई लागतो. बहु, बह्वी; चण्डा चण्डी; रात्रि, रात्री. ( **बह्वादिभ्यश्च** ) ।

**१०१.** जातिवाचक अकारान्त नामांचें स्त्रीलिंग ई प्रत्यय लागून होतें. जसें, सिंह—सिंही, ब्राह्मण-ब्राह्मणी, वृषल--वृषली, गोप--गोपी.

**अपवाद**. शूद्र--शूद्रा ( शूद्र जातीची स्त्री ), शूद्री—शूद्राची बायको.

**१०२.** कोणत्याहि पुरुषवाचक नामाला 'पत्नी' या अर्थी ई प्रत्यय लागून त्याचें स्त्रीलिंग होतें. जसें, गोपस्य स्त्री--गोपी, पितामही, यवनी, कृपी, ईश्वरी.

**१०३.** इन्द्र, वरुण, भव, शर्व, रुद्र, मृड यांना ई प्रत्यय लागतांना मध्यें आन् आगम येतो. जसें, इन्द्राणी, भवानी. याचप्रमाणें हिम, अरण्य, यव, यवन यांचें स्त्रीलिंग कंसांत दिलेल्या अर्थी बनतें. जसें, हिमानी ( हिमाचा ढीग ), अरण्यानी ( महारण्य ), यवानी ( वाईट जव ), यवनानी ( यवनांची लिपि ). मातुल व उपाध्याय यांना हा आन् आगम विकल्पानें येतो. जसें, मातुली--मातुलानी, उपाध्यायी--उपाध्यायानी; स्वतः अध्यापिका असल्यास उपाध्यायी-उपाध्याया अशीं रूपें होतात. तसेंच आचार्यस्य स्त्री--आचार्यानी; पण आचार्या = स्वयंव्याख्यात्री.

---

१ न् चा ण् होत नाहीं. (२३)ला हा अपवाद आहे.

१०४. चतुर्थ पासून पुढील क्रमवाचक संख्याविशेषणांचें (९१) स्त्रीलिंग ई प्रत्यय लागून होतें. जसें, चतुर्थी, पञ्चमी,...एकादशी, विंशतितमी इ. त्याचप्रमाणें अ (अपत्यार्थक इ. ), **एय, तन, तय, मय, दघ्न, मात्र, वर,** अ (कञ्) इत्यादि प्रत्यय लागून झालेलीं नामसाधितें व धातुसाधितें यांचें स्त्रीलिंग ई लागून होतें. जसें, ऐन्द्री, वैनतेयी, इदानींतनी, त्रितयी, जानुदघ्नी, हिरण्मयी, ऊरुमात्री, इत्वरी, तादृशी.

१०५. बाल्यवाचक व तारुण्यवाचक अकारान्त नामांचें स्त्रीलिंग ई लागून होतें. जसें, कुमार--कुमारी, तरुण--तरुणी, किशोरी; पण शिशु तसेंच राहतें. **( वयसि प्रथमे । )**

१०६. कांहीं थोडया उकारान्त शब्दांचें स्त्रीलिंग ऊ प्रत्यय लागून बनतें. जसें, पंगु -पंगू, करभोरु-करभोरू.

---

## अव्ययविचार



१०७. लिंग, वचन व विभक्ति यांपैकीं कोणत्याही कारणानें ज्या शब्दाच्या रूपामध्यें मुळींच बदल होत नाहीं त्यास **अव्यय** म्हणतात.

१०८. सिद्ध आणि साधित असे अव्ययांचे दोन भेद आहेत. ज्यांची व्युत्पत्ति म्हणजे प्रकृतिप्रत्ययविभाग होत नाहीं, तीं सिद्ध अव्ययें होत. जसें, च, वा, एव, ह, चित् इत्यादि. ज्यांची व्युत्पत्ति म्हणजे प्रकृतिप्रत्ययविभाग होतो, तीं साधित होत. जसें, यथाविधि ( विधीप्रमाणें ), द्विधा (दोन प्रकारें), कृत्वा (करून) इत्यादि.

१०९ साधित अव्ययें पांच प्रकारांनीं होतातः—

(१) तस्, त्र, दा, था, धा, वत् ( 'तुल्यक्रिया' अर्थी ) कृत्वस्, शस्, इत्यादि ताद्धित प्रत्यय लागून होणारे शब्द. जसें, दूरतः, सर्वत्र, सर्वदा, सर्वथा, द्विधा, बहुधा, ब्राह्मणवत्, पञ्चकृत्वः, बहुशः इत्यादि.

( २ ) अम्, तुम्, त्वा ( य, त्य ) हे कृत् प्रत्यय लागून होणारे शब्द. जसें, स्मारं स्मारम्, कर्तुम्, नीत्वा, अपनीय, अधीत्य इत्यादि.

( ३ ) विभक्तिप्रतिरूपक म्हणजे मूळचीं विभक्तिरूपें असून अव्ययें म्हणून रूढ झालेले शब्द. जसें, तेंन तस्मात् ( म्हणून ), चिराय चिरस्य ( फार काळानें ), दूरेण ( फार ), अग्रे ( पुढें ), दिष्ट्या ( भाग्यानें ), बलात् ( जोरानें ), स्थाने ( योग्य ) इत्यादि.

( ४ ) सर्व अव्ययीभावसमास. जसें, यथाविधि, प्रत्यक्षम्, निर्मक्षिकम् इ.

( ५ ) पुष्कळ वेळां नामाच्या व विशेषणाच्या नपुंसकलिंगी द्वितीयेचें एकवचनी रूप अव्ययाप्रमाणें वापरतात. जसें, सुखम् ( सुखानें ), मन्दम्, किम् ( कां ), कृतम् ( पुरे ), सविनयम्, बहुमानपुरःसरम् इत्यादि.

---

## नामसाधित शब्द ( तद्धितान्त )

११०. नामें, सर्वनामें, विशेषणें, अव्ययें यांना व क्वचित् क्रियापदांनाहि निरनिराळे प्रत्यय लागून त्यांपासून अनेक प्रकारचे नवीन शब्द बनतात. त्यांना नामसाधित शब्द म्हणतात व त्या प्रत्ययांना **तद्धित** म्हणतात. पुष्कळ वेळां निरानिराळे तद्धित प्रत्यय लागून एकाच शब्दापासून अनेक साधित शब्द बनतात. जसें, धर्म--धर्म्य, धार्मिक, धर्मवत्, धर्मतः, धर्मीभूत; लघु--लघुत्व, लघीयस्, लघुतर; तद् -ततः, तत्र, तथा, तदा इत्यादि.

तद्धित प्रत्ययांपैकीं कांहीं ठळक प्रत्यय पुढें दिले आहेत.

**१११. अपत्यार्थक प्रत्यय- अ, इ, एय आणि य**

हे प्रत्यय लागतांना प्रकृतीमध्यें पुढील फेरफार होतात. ( १ ) आद्य स्वराची वृद्धि होते ( ए, ओ बद्दल ऐ, औ होतात ); ( २ ) अन्त्य अ, आ, इ, ई यांचा लोप होतो; ( ३ ) अन्त्य उ चा गुण होतो; ( ४ ) अन्त्य ऋ चा पुढील स्वराशीं नुसता संधि होतो.

( १ ) अ—पुत्रस्य अपत्यं=पौत्रः, गणपति—गाणपतः, सपत्नी—सापत्नः, रघु—राघवः, दुहितृ—दौहित्रः, इत्यादि.

( २ ) इ—दशरथ—दाशरथिः, द्रोण—द्रौणिः, भीम—भैमिः, इत्यादि.

( ३ ) एय ( विशेषतः स्त्रीलिंगी नामांना लागतो )—कुन्ती–कौन्तेयः, राधा–राधेयः, भगिनी–भागिनेयः, गंगा-गांगेयः, अत्रि–आत्रेयः.

( ४ ) य–जमदग्नि–जामदग्न्यः, दिति–दैत्यः, गर्ग–गार्ग्यः, इत्यादि.

अपवाद. स्वसृ–स्वस्रीयः, भ्रातृ–भ्रातृव्यः किंवा भ्रात्रीयः, सुमित्रा–सौमित्रिः, व्यासः–वैयासकिः.

११२. भावकर्मार्थक प्रत्यय–त्व, ता, य, अ आणि इमन्.

यांपैकीं ता प्रत्ययान्त शब्द स्त्रीलिंगी, इमन् प्रत्ययान्त शब्द पुंल्लिंगी व बाकीचे प्रत्यय लागून बनणारे नपुंसकलिंगी असतात. हे शब्द भाव (=पणा) किंवा क्रिया दर्शवितात. जसें, मौढ्यं=मूढस्य भावः कर्म वा.

(१) त्व,ता—हे लागतांना सु ह्या विभक्तिप्रत्ययापूर्वी होणारें म्हणजे पद अंग होतें. जसें, गुरुत्वं, गुरुता, सत्त्वं, सत्ता [ सत् ], विद्वत्त्वं, विद्वत्ता [ विद्वस् ], पुरुषत्वं, पुरुषता.

( २ ) य आणि अ हे प्रत्यय लागतांना प्रकृतीमध्यें अपत्यार्थक प्रत्ययांपूर्वी होणारे फेरफार होतात ( १११ ).

य–हा प्रत्यय वर्णवाचक ( वर्ण=रंग ), गुणवाचक व इतर कांहीं शब्दांना लागतो. जसें, शौक्ल्यं [ शुक्ल ], माधुर्यं [ मधुर ], जाड्यं [ जड ], शैथिल्यं [ शिथिल ], ब्राह्मण्यं, चौर्यं, तारुण्यं, पांडित्यं, सैनापत्यं [ सेनापति ], आधिपत्यं, पौरोहित्यं, साम्राज्यं [ सम्राज् ], राज्यं [ राजन् ], पार्थक्यं [ पृथक् ].

अपवाद—स्तेयं [ स्तेन ], सख्यं [ सखि ], दूत्यं [ दूत ].

अ–हा प्रत्यय विशेषतः ( १ ) प्राण्यांची जात दर्शविणारे; ( २ ) वयोवाचक ( ३ ) ज्यांत पूर्वी लघु स्वर असून अन्तीं इ, उ किंवा ऋ आहे अशा शब्दांना लागतो. जसें:—

आश्वं [ अश्व ], मानुषं, कौमारं [ कुमार ], शैशवं [ शिशु ]; गौरवं [ गुरु ], लाघवं [ लघु ], मार्दवं [ मृदु ] मौनं [ मुनि ], सौष्ठवं [ सुष्ठु ] सौहृदं [ सुहृद् ], कौशलं, चापलं, सौभगं, नैपुणं, पैशुनं.

( ३ ) इमन्—वर्णवाचक व आणखी कांहीं विशेषणांना लागतो. हा लागतांना ( १ ) व्यंजनादि शब्दांतील ऱ्हस्व ऋ चा र होतो व (२) अन्त्य

स्वराचा लोप होतो; अन्तीं व्यंजन असल्यास त्याचा मागील स्वरासह लोप होतो. रक्तिमन् [रक्त] ,शुक्लिमन्,महिमन् [महत्], म्रदिमन् [मृदु], द्राघिमन् [ दीर्घ ]; स्थिर चें स्थेमन् होतें.

कांहीं कांहीं शब्दांना वरील प्रत्ययांपैकीं दोन, तीन किंवा चार प्रत्यय लागून भाववाचक नामें बनतात. जसें, मृदुत्वं, मृदुता, मार्दवं, म्रदिमन्.

**११३. 'ज्याच्याजवळ किंवा ज्याच्यामध्यें आहे' या अर्थाचे प्रत्यय–मत् ( वत् ), इन्, विन् , अ आणि इक. हे नामांना लागून** सामान्यतः विशेषणें बनतात. जसें, गोमत् ( गावः अस्य सन्ति ), वृक्षवत् ( वृक्षाः अस्मिन् सन्ति ). हे प्रत्यय बाहुल्य, निंदा, प्रशंसा, नित्यसंबंध, अतिरेक, संसर्ग, जवळ असणें हे अर्थ दर्शवितात. जेथें जो अर्थ संभवेल तेथें तो घ्यावा. क्रमानें उदाहरणें—गोमत् , कुष्ठिन्, रूपवत्, क्षीरिन् ( वृक्ष ), उदरिणी ( कन्या ), छत्रिन्, गृहिन्.

( १ ) **मत्**–हा कोणत्याहि नामाला लागतो. पण म्, अ, आ यांपैकीं एखादा वर्ण अन्तीं किंवा उपान्तीं असणाऱ्या किंवा अनुनासिकें सोडून पांचहि वर्गांतील कोणतेंहि व्यंजन अन्तीं असणाऱ्या नामांना लागतांना त्याला वत् असा आदेश होतो. जसें:—

श्रीमत्, मधुमत्, आयुष्मत्, लक्ष्मीवत्, बलवत्, विद्यावत्, विद्युत्वत्, यशस्वत्, भास्वत्. ( **तदस्यास्त्यस्मिन्निति मतुप् । मादुपधायाश्च मतोर्वोऽयवादिभ्यः । झयः ।** )

**अपवाद**—ऊर्मिमत्, भूमिमत्, ककुद्मत्, गरुत्मत्, कृमिमत्.

( २ ) **इन् -इक** हे आकारान्त नामांना लागतात.हे लागतांना नामांच्या अन्त्य अ चा लोप होतो. जसें, गुणिन्, धनिन्, दण्डिन् करिन्, बलिन्;धनिक दण्डिक, इत्यादि. (**अत इनि ठनौ ।**)

( ३ ) **विन्**–हा प्रत्यय अस् अन्तीं असणाऱ्या नामांना व माया, मेधा, स्रज् यांना लागतो. जसें, यशस्विन् , तपस्विन् , तेजस्विन् , मायाविन् , मेधाविन्, स्रग्विन्. (**अस्मायामेधास्रजोविनिः ।** )

( ४ ) अ–हा प्रत्यय लागतांना नामांच्या अन्त्य स्वराचा लोप होतो, व कांहींच्या आद्य स्वराची वृद्धि होते. जेव्हां नामांचें रूप जसेंच्या तसेंच राहून विशेषणें बनतात, तेव्हां हा अ प्रत्यय लागला आहे असें समजावें. तापस [ तपस् ], तामिस्र [ तमिस्रा ], सैकत [सिकता], शार्कर [शर्करा], ज्यौत्स्न [ ज्योत्स्ना ]; पापः [पापं अस्य आस्ति], शुक्लः [शुक्लः वर्णः अस्य अस्ति]. (अण् च। अर्श आदिभ्योऽच्।)

कांहीं काहीं नामांना वरील प्रत्ययांपैकीं अनेक प्रत्यय लागतात. जसें:— मायाविन्, मायावत्, मायिन्, मायिक.

( ५ ) वरील प्रत्ययांशिवाय ल, र, वल, इल इत्यादि प्रत्यय वरील अर्थींच कांहीं कांहीं नामांना लागतात. जसें, पांसुल, शीतल, श्लेष्मल, मांसल; मधुर, पाण्डुर, मुखर; रजस्वल, कृषीवल, ऊर्जस्वल; फेनिल, तुन्दिल, पिच्छिल.

## ११४. अतिशयार्थक प्रत्यय—तर, तम, ईयस्, इष्ठ

( १ ) तर, तम–हे कोणत्याहि विशेषणाला लागतात. तर हा प्रत्यय दोहोंपैकीं एकाचा व तम हा पुष्कळांपैकीं एकाचा गुणातिशय दर्शवितो. ह्या प्रत्ययांपूर्वीं व्यंजनान्त शब्दांचें पद अंग बनतें. जसें, गुरुतर, गुरुतम; महत्तर, महत्तम; प्रियवाक्तर–तम; धनितर–तम; प्रवयस्तर–तम; विद्वत्तर–तम [ विद्वस् ].

( २ ) अव्ययांना व क्रियापदांनाहि हे प्रत्यय लागतात व त्या वेळीं त्यांचीं तराम् व तमाम् अशीं रूपें होतात. मात्र अव्ययांना हे प्रत्यय लागून अव्ययें होतात, तेव्हांच तराम्, तमाम् अशीं रूपें होतात. विशेषणें बनतात तेव्हां तर, तम अशींच राहतात. जसें, उच्चैस्तराम्, उच्चैस्तमाम्; दहतितराम्; जल्पतितमाम्; सुतराम्, सुतमाम्; पण उच्चैस्तर–तम, उत्तर-उत्तम [उद्].

(३) ईयस्–इष्ठ हे प्रत्यय फक्त गुणवाचक शब्दांना लागून विशेषणें बनतात. हे लागतांना प्रकृतीच्या अन्त्य स्वराचा व अन्तीं व्यंजन असल्यास त्याचा मागील स्वरासह लोप होतो आणि व्यंजनादि शब्दांतील ह्रस्व ऋ चा र् होतो. कलम ११२ ( ३ ) पहा. जसें, अल्प–अल्पीयस्, अल्पिष्ठ; लघु–लघीयस्, लघिष्ठ; महत्–महीयस्, महिष्ठ; मृदु–म्रदीयस्, म्रदिष्ठ; दृढ-द्रढीयस्, द्रढिष्ठ;

पृथु–प्रथीयस्, प्रथिष्ठ; पण ऋजु–ऋजीयस्, ऋजिष्ठ.ईयस् हा तर च्या व इष्ठ हा तम च्या अर्थी लागतो.

इन्, मत्, वत्, विन् हे प्रत्यय लागून झालेल्या नामसाधितांना ईयस् इष्ठ प्रत्यय लागतांना मागील प्रत्ययांचा लोप होतो व मग वरील नियमाप्रमाणें अन्त्य स्वराचा लोप होतो. जसें, वलिन् किंवा लबवत्–वलीयस्, वलिष्ठ; मतिमत्–मतीयस् मतिष्ठ; मेधाविन्–मेधीयस्, मेधिष्ठ.

## (४) ईयस्, इष्ठ प्रत्ययान्त अनियामित रूपें

अन्तिक–नेदीयस्, नेदिष्ठ
बाढ–साधीयस्, साधिष्ठ
प्रशस्य– { श्रेयस्, श्रेष्ठ / ज्यायस्, ज्येष्ठ }
स्थूल–स्थवीयस्, स्थविष्ठ
दूर–दवीयस्, दविष्ठ
युवन्– { यवीयस्, यविष्ठ / कनीयस कनिष्ठ }
ह्रस्व–ह्रसीयस्, ह्रसिष्ठ
क्षिप्र–क्षेपीयस्, क्षेपिष्ठ
क्षुद्र–क्षोदीयस्, क्षोदिष्ठ
स्थिर–स्थेयस्, स्थेष्ठ

उरु–वरीयस्, वरिष्ठ
प्रिय–प्रेयस्, प्रेष्ठ
वहुल–वंहीयस्, वंहिष्ठ
गुरु–गरीयस्, गरिष्ठ
वृद्ध— { वर्षीयस्, वर्षिष्ठ / ज्यायस्, ज्येष्ठ }
दीर्घ–द्राघीयस्, द्राघिष्ठ
वृन्दारक–वृन्दीयस्, वृन्दिष्ठ
वहु–भूयस्, भूयिष्ठ
अल्प– { अल्पीयस्, अल्पिष्ठ / कनीयस्, कनिष्ठ }

ईयस् व इष्ठ प्रत्ययान्त विशेषणांना तर व तम हे प्रत्यय कधीं कधीं लावलेले आढळतात. जसें, पापीयस्तर, पापीयस्तम, श्रेष्ठतर, श्रेष्ठतम.

## ११५. संवंधार्थक प्रत्यय–इक, अ, एय, य, तन, ईय, ईन व त्य

हे प्रत्यय 'तस्येदं,' 'तत्र भवः,' 'तत आगतः,' 'तस्मै हितं,' 'तत्र साधु,' 'तदर्हति,' 'तस्मादनपेतं,' इत्यादि विविध अर्थी लागून नामसाधितें बनतात यांपैकीं इक, अ आणि एय हे लागतांना प्रकृतींतील आद्य स्वराची वृद्धि व अन्त्य स्वराचा लोप होतो.

इक—सेना–सैनिक, संवत्सर–सांवत्सरिक, धर्म–धार्मिक ( धर्मं चरति ), इह–ऐहिक, नाविक ( नावा तरति ), आकरिक ( आकरे नियुक्तः ).

अ—जठर–जाठर, शिव–शैव, मथुरा–माथुर, गङ्गा–गाङ्ग, पशुपति-पाशुपत, इन्द्र -ऐन्द्र.

एय—नदी–नादेय, ग्रीवा–ग्रैवेय, एण–ऐणेय, पाथेय ( पथि साधु ), अतिथि–आतिथेय, शालि–शालेय (साळीचें शेत), अहि–आहेय.

य—ग्राम–ग्राम्य, पितृ–पैत्र्य, दिश्–दिश्य, वर्ग–वर्ग्य, पक्ष–पक्ष्य, कण्ठ-कण्ठ्य, यशस्–यशस्य, दण्ड्य ( दण्डमर्हति ), वध्य, पथ्य ( पथः अनपेतः ), धर्म–धर्म्य, न्याय–न्याय्य, रथ्य ( रथं वहति ).

तन—हा प्रत्यय कालवाचक अव्ययांना लागून विशेषणें बनतात.

जसें, पुरातन, सनातन ( सना = नेहमीं ), प्राक्तन [ प्राक् ], अद्यतन, सायंतन, चिरंतन.

ईय—ज्यांचा आद्य स्वर आ, ऐ किंवा औ आहे अशा शब्दांना व कांहीं सर्वनामांना हा प्रत्यय लागून विशेषणें बनतात. जसें, शाला–शालीय, पाणिनीय, तदीय, यदीय, अन्यदीय, भवदीय, त्वदीय, युष्मदीय, मदीय.

ईन—हा प्रत्यय अञ्च्धात्वन्त शब्दांना ते दिग्वाचक स्त्रीलिंगी नसतील तेव्हां लागतो. जसें, अर्वाचीन; पण प्राची ( दिक् ). याचप्रमाणें इतरहि कांहीं शब्दांना लागतो; मौद्गीनं ( मुगाचें शेत ), कौलत्थीनं ( कुळथांचें शेत ), सर्वाङ्गीण, तावकीन, इत्यादि.

त्य—हा प्रत्यय तस् व त्र प्रत्ययान्त अव्ययांना लागतो; तसाच अमा, दक्षिणा, पश्चात् व पुरस् ह्या अव्ययांनाहि लागतो. जसें, कुतस्त्य, तत्रत्य, अत्रत्य, अमात्य ( राजाजवळ असणारा ), दाक्षिणात्य, पाश्चात्य, पौरस्त्य.

## ११६. विकारार्थक प्रत्यय—मय आणि अ

हे प्रत्यय ' त्याचें केलेलें ' किंवा ' त्याचा अवयव ' या अर्थी नामांना लागतात. अ पूर्वी प्रकृतींत ( १११ ) प्रमाणें फरक होतो.

( १ ) मय—मृण्मय, काष्ठमय, हिरण्मय, गोमय ( गाईचें शेण ).

( २ ) अ—विल्व–वैल्व, खदिर–खादिर, वेणु–वैणव, रजत–राजत, कपोत–कापोत, मूर्वा–मौर्व, अश्मन्–आश्मन, लोह–लौह.

## ११७. परिमाणार्थक प्रत्यय–मात्र व दघ्न

ऊरुमात्र ( जांघडभर ), जानुमात्र ( गुडघाभर ), प्रस्थमात्र ( शेरभर ); ऊरुदघ्न, जानुदघ्न.

( अ ) कल्प, देश्य व देशीय हे प्रत्यय 'कांहींसें कमी' या अर्थी लागतात. जसें, अमृतकल्प, विद्वत्कल्प, विद्वद्देश्य, विद्वद्देशीय, अष्टवर्षदेशीय ( आठ वर्षांहून किंचित् कमी ).

## ११८. स्वार्थे ( मूळ अर्थीच लागणारे ) प्रत्यय–अ, य, क

अ आणि य हे प्रत्यय लागतांना प्रकृतींमध्यें ( १११ ) प्रमाणें फरक होतो. ( १ ) अ–प्रज्ञः एव प्राज्ञः, बन्धुरेव बान्धवः, ओषधि–औषधं, चोरः–चौरः, मनः–मानसं, रक्षस्–राक्षसः, मरुत्–मारुतः.

( २ ) य–हा लागून नपुंसक नामें बनतात. जसें, सेना एव सैन्यं, चत्वारः वर्णा एव चातुर्वर्ण्यं, षाड्गुण्यं, उपमा–औपम्यं, भेषज–भैषज्यं, ऐतिह्यं, सुखं–सौख्यं, त्रैलोक्यं, तादर्थ्यं.

( ३ ) क–अविः एव अविकः.

हा क प्रत्यय 'अल्प,' 'अनुकंपा,' 'निंदा,' इत्यादि अर्थीहि लागतो. जसें, तैलकं ( थोडें तेल ), वृक्षकः ( लहान झाड ), पुत्रकः ( प्रिय पुत्र ), अङ्गकं, बालकः, दुर्बलकः, अश्वकः ( द्वाड घोडा ), शूद्रकः ( वाईट शूद्र ), देवदत्तकः ( दुःखी देवदत्त ). क चा अर्थ प्रसंगाप्रमाणें घ्यावा.

( ४ ) तर–हा प्रत्यय कांहीं नामांना 'अल्प' अर्थी लागतो. जसें, अश्वतर, वत्सतर, उक्षतर.

( ५ ) मय–हा प्रत्यय 'विपुलता' या अर्थी लागतो. जसें, जलमय, अन्नमय, आम्रमय.

## ११९. समूहार्थक प्रत्यय–अ, अक, ता आणि या

अ व अक हे प्रत्यय लागतांना प्रकृतींत ( १११ ) प्रमाणें फरक होतो व नपुंसक नामें बनतात. जसें:—

( १ ) अ, अक—पदाति–पादातं ( पायदळ ), कापोतं ( कपोतानां समूहः ), मानुष्यकं ( मनुष्याणां समूहः ), राजन्य- राजन्यकं.

( २ ) ता—हा प्रत्यय फक्त पांच नामांना लागतो व स्त्रीलिंगी नामें बनतात. जसें, ग्रामता, जनता, बन्धुता, गजता, सहायता.

( ३ ) या—हा प्रत्यय लागतांना प्रकृतीच्या अन्त्य स्वराचा लोप होतो. जसें, वात्या ( वातानां समूहः=वावटळ ), वन्या, तृण्या, धूम्या.

## १२० 'तें शिकणारा' व 'तें जाणणारा' या अर्थाचे प्रत्यय—अ व इक

हे प्रत्यय लागतांना प्रकृतींत ( १११ ) प्रमाणें फरक होतो.

( १ ) अ—व्याकरण–वैयाकरणः, निरुक्त–नैरुक्तः, छन्दस्–छान्दसः, निमित्त–नैमित्तः ( शकुनज्ञः ), ज्योतिस्–ज्यौतिषः.

( २ ) इक—न्याय-नैयायिकः, इतिहास–ऐतिहासिकः, पुराण-पौराणिकः, तार्किकः [ तर्क ], आलङ्कारिकः [ अलङ्कार ].

अपवाद. मीमांसकः [ मीमांसा ].

## १२१. 'तें ज्यास झालें आहे' या अर्थाचा प्रत्यय–इत.

हा प्रत्यय लागतांना प्रकृतीच्या अन्त्य स्वराचा लोप होतो. जसें, तारकित ( तारका ज्यांत दिसूं लागल्या आहेत असें ), पुष्पित, पुलकित [ पुलक ] व्याधित.

**१२२. चर**—हा प्रत्यय 'पूर्वी असलेला' या अर्थी लागतो. जसें, आढ्यचरः ( पूर्वी श्रीमंत असलेला ), दृष्टचर, श्रुतचर.

**१२३. रूप**–हा प्रत्यय 'प्रशंसा' अर्थी लागतो. जसें, युक्तरूप ( फार योग्य ); पटुरूप ( चांगला पटाईत ), पचतिरूपं ( चांगलें शिजवितो ).

## १२४. अव्ययकारी प्रत्यय

( १ ) तस्–हा प्रत्यय बहुतेक सर्वनामांना व बहु, परि व अभि यांना पञ्चम्यर्थी लागून अव्ययें बनतात. जसें, तद्–ततः, यद्–यतः, किम्–कुतः, इदम्–इतः, एतद्–अतः, अदस्–अमुतः, उभयतः, अन्यतः, परितः, त्याचप्रमाणें अपादान पञ्चमीच्या अर्थी तस् हा प्रत्यय कोणत्याहि नामाला लागतो. जसें, ग्रामतः ( गांवाहून ), मध्यतः, पृष्ठतः, पार्श्वतः, दूरतः, आदितः.

( २ ) त्र–हा प्रत्यय बहुतेक सर्वनामांना सप्तम्यर्थी लागून अव्ययें बनतात. जसें, तद्–तत्र, यद्–यत्र, किम्–कुत्र, अदस्–अमुत्र, एतद्–अत्र, सर्वत्र, अन्यत्र.

( ३ ) दा—हा प्रत्यय सर्व, एक, अन्य, किम्, यद् व तद् यांना कालार्थी लागून अव्ययें बनतात. जसें, सर्वदा ( किंवा सदा ), एकदा, अन्यदा, कदा, यदा, तदा.

( ४ ) था—हा प्रत्यय कांहीं सर्वनामांना प्रकारार्थी लागून अव्ययें बनतात. जसें, सर्वथा, अन्यथा, यथा, तथा.

( ५ ) धा—हा प्रत्यय संख्यावाचक शब्दांना प्रकारार्थी लागून अव्ययें बनतात. जसें, एकधा, द्विधा ( किंवा द्वधा, द्वैधं ), त्रिधा ( किंवा त्रेधा, त्रैधं ), चतुर्धा, शतधा, सहस्रधा.

( ६ ) शस्—हा प्रत्यय 'अल्प' व 'बहु' या अर्थाच्या शब्दांना लागून अव्ययें बनतात; जसें, बहुशः, अल्पशः, भूरिशः, स्तोकशः, त्याचप्रमाणें संख्यावाचक शब्दांना द्विरुक्ति दर्शवावयाची असल्यास हा शस् लागतो. जसें, द्विशः ( दोन दोन ), त्रिशः, पञ्चशः. तसाच परिमाणवाचक शब्दांलाहि हा लागतो; मात्र तो शब्द एकवचनी असला पाहिजे. जसें माषशः ( मासामासा ), पादशः ( पाव पाव ), प्रस्थशः ( शेर शेर ).

( ७ ) कृत्वस्— हा प्रत्यय संख्यावाचक शब्दांना आवृत्त्यर्थी लागून अव्ययें बनतात. जसें, पञ्चकृत्वः ( पांच वेळां ), सप्तकृत्वः, त्रिसप्तकृत्वः ( एकवीस वेळां ). परंतु द्वि, त्रि, चतुर् यांना नुसता स् लागून द्विः ( दोन वेळां), त्रिः, चतुः अशी रूपें होतात. एक चें सकृत् होतें.

( ८ ) च्वि ( ० )—हा प्रत्यय संपद्यते या क्रियापदाचा कर्ता असणाऱ्या शब्दांना कृ, भू किंवा अस् धातूचा योग असतां 'नसलेलें होणें' या अर्थी लागून अव्ययें बनतात. हा प्रत्यय लागतांना अव्ययांखेरीज इतर शब्दांच्या अन्त्य अ, आ चा ई होतो; अन्त्य इ, उ चा दीर्घ होतो व अन्त्य ऋ चा री होतो. व्यंजनान्त शब्दांचें पद् अंग (७३) बनतें. जसें, अशुक्लः शुक्लः संपद्यते तं करोति-शुक्लीकरोति; अमलिनः मलिनः संपद्यते स भवति-मलिनीभवति; सेना -सेनीभूत; पण दिवा -दिवाभूता (रात्रिः); शुचि--शुचीभूत; पटु--पटूस्यात्; भस्मन्-भस्मीभूत; मरुत्-मरुद्भवति; स्वीकरोति. अरुस्, मनस्, चक्षुस्, चेतस्, रहस्, रजस् ह्यांच्या अन्त्य स् चा लोप होतो. जसें, उन्मनस्-उन्मनीभवति; विरजीकरोति; विरजीस्यात्.

( ९ ) सात् हा प्रत्यय च्वि प्रत्ययाच्या अर्थी लागून शिवाय 'पूर्णपणे' हा अर्थहि त्यांत असतो. जसें, भस्मसात् करोति (पूर्णपणें भस्म करतो); शस्त्रं अग्निसात् भवति.

( अ ) 'अधीन' या अर्थीहि सात् प्रत्यय लागतो. जसें 'राजसात् करोति, राजसाद्भवति (राजाच्या स्वाधीन करतो, होतो).

( १० ) वत्--हा प्रत्यय नामांना ' तुल्य=सारखें, प्रमाणें ' याअर्थी लागून अव्ययें बनतात. मात्र ह्या वत् प्रत्ययान्त अव्ययाचा क्रियेशीं संबंध असेल तेव्हांच हा लागतो. जसें, ब्राह्मणवत् वर्तते; कर्णवत् ददाति.

( अ ) वत् हा प्रत्यय षष्ठ्यन्त किंवा सप्तम्यन्त नामांना ' इव=सारखें ' या अर्थी लागतो. जसें, देवदत्तस्य इव—देवदत्तवत् ( यज्ञदत्तस्य दन्ताः ); मथुरायां इव—मथुरावत् ( इन्द्रप्रस्थे प्राकारः ).

---

## क्रियापदविचार ( तिङन्त )

१२५. संस्कृतमध्यें सिद्ध ( अव्युत्पन्न ) धातु व साधित ( व्युत्पन्न ) किंवा प्रत्ययान्त धातु असे दोन प्रकारचे धातु आहेत. सिद्ध धातूंना ( व नामांनाहि )

विशिष्ट प्रत्यय लागून जे धातू बनतात, त्यांना साधित किंवा प्रत्यान्त धातु म्हणतात. धातूंना निरनिराळ्या काळीं व अर्थीं पुरुषवाचक प्रत्यय लागून क्रियापदें बनतात.

वर्तमान ( लट् ) अनद्यतनभूत ( लङ् ), परोक्षभूत ( लिट् ), सामान्यभूत ( लुङ् ), सामान्यभविष्य ( लृट् ), अनद्यतनभविष्य ( लुट् ) असे सहा काळ आणि आज्ञार्थ ( लोट् ), विध्यर्थ ( विधिलिङ् ), क्रियातिपत्त्यर्थ ( लृङ् ) व आशीर्वादार्थ ( आशीर्लिङ् ) असे चार अर्थ आहेत.

ह्या सहा काळीं व चार अर्थीं सकर्मक धातूंचीं कर्तरि व कर्मणि आणि अकर्मक धातूंचीं कर्तरि आणि भावे ( धात्वर्थी ) अशीं दोन दोन प्रकारचीं रूपें होतात.

वरील दहा काळीं व अर्थीं लागणारे पुरुषवाचक प्रत्यय परस्मैपदी व आत्मनेपदी असे दोन प्रकारचे आहेत. कांहीं धातूंना फक्त परस्मैपदी प्रत्यय लागतात, कांहींना फक्त आत्मनेपदी प्रत्यय लागतात व कांहींना दोनहि प्रकारचे प्रत्यय लागतात. म्हणून त्या त्या धातूंना अनुक्रमें परस्मैपदी, आत्मनेपदी व उभयपदी धातु म्हणतात.

१२६. वर्तमानकाळ, अनद्यतनभूतकाळ, आज्ञार्थ व विध्यर्थ ह्या चारींचे पुरुषवाचक प्रत्यय लागतांना धातूंना ह्या प्रत्ययांपूर्वी आणखी कांहीं प्रत्यय लागतात, त्यांना विकरणें म्हणतात. ह्या विकरणांवरून सिद्ध धातूंचे दहा गण ( =समुदाय ) केलेले आहेत. हीं गणविकरणें फक्त वरील चार काळीं व अर्थीं लागून धातूंचीं अंगें बनतात; म्हणून ह्यांना **गणसापेक्ष** काळ व अर्थ म्हणतात. बाकीचे काळ व अर्थ यांना **गणनिरपेक्ष** म्हणतात.

१२७. ह्या दहा गणांपैकीं पहिला, चौथा, सहावा व दहावा ह्या चार गणांतील धातूंचें अंग वरील गणसापेक्ष काळीं व अर्थीं अकारान्त बनतें, म्हणून ह्या चार गणांचा एक वर्ग होतो व बाकीच्या सहा गणांचें अकारान्ताहून भिन्न बनतें, म्हणून त्या सहा गणांचा दुसरा वर्ग होतो.

## पहिला वर्ग ( अकारान्त अंगाचा )

१२८. ह्या वर्गातील धातूंना वर्तमानकाळ, अनद्यतनभूतकाळ, आज्ञार्थ व

विध्यर्थ या गणसापेक्ष काळीं व अर्थी लागणारे परस्मैपदी व आत्मनेपदी प्रत्यय क्रमानें पुढें दिले आहेत.

(१) वर्तमानकाळ

| | परस्मैपद | | | आत्मनेपद | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | ए. | द्वि. | ब. | ए. | द्वि. | ब. |
| प्रथम पुरुष | ति | तस् | अन्ति | ते | इते | अन्ते |
| मध्यम पुरुष | सि | थस् | थ | से | इथे | ध्वे |
| उत्तम पुरुष | मि | वस् | मस् | इ | वहे | महे |

(२) अनद्यतन भूतकाळ

| | परस्मैपद | | | आत्मनेपद | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | ए. | द्वि. | ब. | ए. | द्वि. | ब. |
| प्रथम पुरुष | त् | ताम् | अन् | त | इताम् | अन्त |
| मध्यम पुरुष | स् | तम् | त | थास् | इथाम् | ध्वम् |
| उत्तम पुरुष | अम् | व | म | इ | वहि | महि |

(३) आज्ञार्थ

| | परस्मैपद | | | आत्मनेपद | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | ए. | द्वि. | ब. | ए. | द्वि. | ब. |
| प्रथम पुरुष | तु, | ताम् | अन्तु | ताम् | इताम् | अन्ताम् |
| मध्यम पुरुष | ०, हि, | तम् | त | स्व | इथाम् | ध्वम् |
| उत्तम पुरुष | आनि | आव | आम | ऐ | आवहै | आमहै |

(४) विध्यर्थ

| | परस्मैपद | | | आत्मनेपद | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | ए. | द्वि. | ब. | ए. | द्वि. | ब. |
| प्रथम पुरुष | इत् | इताम् | इयुः | ईत | ईयाताम् | ईरन् |
| मध्यम पुरुष | इस् | इतम् | इत | ईथास् | ईयाथाम् | ईध्वम् |
| उत्तम पुरुष | इयम् | इव | इम | ईय | ईवहि | ईमहि |

वर दिलेल्या प्रत्ययांपैकीं तीन तीन प्रत्ययांच्या समुदायांना अनुक्रमें



प्रथमपुरुष, मध्यमपुरुष व उत्तमपुरुष अशा संज्ञा आहेत व त्या प्रत्येकाचीं एक, द्वि, बहु अशीं तीन तीन वचनें आहेत.

**१२९. पहिला ( भ्वादि ) गण**–ह्या गणांतील धातूंना अ ( शप् ) हें विकरण लागून त्यांचें अंग बनतें. ह्या अ लागतांना धातूंच्या अन्त्य ऱ्हस्व किंवा दीर्घ इ, उ, ऋ चा व उपान्त्य ऱ्हस्व इ, उ, ऋ व ऌ चा गुण होतो. जसें, **जि** धातूचें वर्तमान प्र. पु. ए. चें रूप **जि** +अ + ति = जे + अ + ति = जय् + अ + ति (१३) = जय+ ति = जयति असें बनतें. यांतील **जय** हें अंग होय. **नी** + अ = ने + अ = नय–नयति; **स्रु** + अ = स्रो + अ = स्रव–स्रवति; **भू** + अ = भो + अ = भव–भवति; **स्मृ**+अ=स्मर् + अ = स्मर–स्मरति; **तॄ** + अ = तर् + अ = तर–तरति; **धे**+अ=धय् + अ =धय–धयति; **गै** + अ = गाय् + अ = गाय–गायति; **मिह्** + अ = मेह –मेहति; **शुच्** + अ = शोच–शोचति; **वृत्** + अ = वर्त–वर्तते; **कॢप्** + अ = कल्प् + अ = कल्प–कल्पते; **वद्** + अ = वद–वदति. पण **जीव्**+अ = जीव–जीवति, कारण जीव् चा उपान्त्य ई **दीर्घ** आहे; **निन्द्** + अ = निन्द–निन्दति, **शिक्ष्** + अ = शिक्ष – शिक्षते, कारण यांतील इ उपान्त्य नाहीं.

( अ ) या गणांतील कित्येक धातूंना अ ह्या गणविकरणापूर्वी विशिष्ट आदेश होतात. जसें, **गम्** ( गच्छ् )–गच्छति; **पा** ( पिब् ) -पिबति; **सद्** ( सीद् ) –सीदति; **स्था** ( तिष्ठ् )–तिष्ठति; **दृश्** ( पश्य् )–पश्यति.

**१३०. चौथा ( दिवादि ) गण**–या गणांतील धातूंना य ( श्यन् ) हें विकरण लागून त्यांचें अंग बनतें. जसें, **सिध्** धातूचें वर्तमान प्र. पु. ए. चें रूप **सिध्** + य=सिध्य–सिध्यति असें होतें. **नश्** + य = नश्य–नश्यति; **नृत्** + य = नृत्य- नृत्यति, इत्यादि.

**( १ ) रकारान्त आणि वकारान्त धातूंच्या उपान्त्य इ, उ, ऋ चा त्या धातूंपुढें व्यंजन आलें असतां दीर्घ होतो.** जसें, **दिव्**+य= दीव्य–दीव्यति; **ष्ठिव्** + य = ष्ठीव्य–ष्ठीव्यति; **सिव्** +य = सीव्य- सीव्यति.

( २ ) **शम्, तम्, दम्, श्रम्, भ्रम्, क्षम्, क्लम्, मद्** या धातूंतील अ चा ह्या य गणविकरणापूर्वी आ होतो. जसें, शाम्यति, माद्यति, इ.

( ३ ) ओकारान्त धातूंच्या अन्त्य ओ चा ह्या य गणविकरणापूर्वी लोप होतो. सो + य = स् + य --स्यति; शो- श्यति; छो--छ्यति; दो-द्यति.

( ४.) व्यध् ला विध्, जन् ला जा असे या गणांतील कित्येक धातूंना ह्या य विकरणापूर्वी आदेश होतात व विध्यति, जायते इत्यादि रूपें होतात.

**१३१. सहावा (तुदादि) गण**--या गणांतील धातूंना अ ( श ) हें विकरण लागून त्यांचें अंग बनतें. जसें, तुद् धातूचें वर्तमान प्र. पु. ए. चें रूप तुद् + अ = तुद--तुदति, विश् + अ = विश--विशति, सृज् + अ = सृज--सृजति, इत्यादि.

( १ ) लिप्, मुच्, लुप्, विद्, सिच्, कृत् इत्यादि कांहीं धातूंना हें अ गणविकरण लागतांना अन्त्य व्यंजनामागें न् आगम होतो. व त्या न् ला पुढील व्यंजनाच्या वर्गांतील अनुनासिक आदेश होतो. जसें, लिप् + अ = लिम्प- लिम्पति; मुच्+अ=मुञ्च--मुञ्चति; लुम्पति, विन्दति, सिञ्चति, कृन्तति.

( २ ) दीर्घ ॠकारान्त धातूंच्या अन्त्य ॠ चा, अविकारक प्रत्ययांपूर्वी, इर् होतो. जसें, कॄ + अ = किर् + अ = किर--किरति, गॄ--गिरति.

( ३ ) ऱ्हस्व किंवा दीर्घ इकारान्त व उकारान्त धातूंच्या अन्त्य स्वराचा स्वरादि अविकारक प्रत्ययांपूर्वी अनुक्रमें इय् व उव् होतो. धू + अ = धुव् + अ = धुव--धुवति, सू--सुवति.

( ४ ) ऋकारान्त धातूंच्या अन्त्य ऋ ला अविकारक प्रत्ययांपूर्वी रि आदेश होतो. जसें, मृ + अ = म्रि + अ = वरील ( ३ ) नियमानें म्रिय् + अ = म्रिय -म्रियते; धृ--ध्रियते; दृ--द्रियते, इत्यादि.

( ५ ) ह्या गणांतील कित्येक धातूंना ह्या अ गणविकरणापूर्वी विशिष्ट आदेश होतात. जसें, इष् ( इच्छ् )--इच्छति; प्रच्छ् ( पृच्छ् )--पृच्छति.

**१३२. दहावा ( चुरादि ) गण**--या गणांतील धातूंना अय[१] हें विकरण

---

१. वास्तविक ह्या गणाचें विकरण पहिल्या गणाप्रमाणेंच आहे. परंतु त्या विकरणापूर्वी धातूंना इ प्रत्यय लागतो. ह्या इ चा अ विकरणामुळें गुण होऊन ए + अ = अय् + अ = अय ( १३ ) असें शेवटचें स्वरूप होतें.

लागून त्यांचें अंग बनतें. ह्या अय विकरणापूर्वी धातूंच्या अन्त्य इ, उ, ऋ ची व उपान्त्य अ ची वृद्धि होते व उपान्त्य ऱ्हस्व इ, उ, ऋ चा गुण होतो. जसें, चुर् + अय=चोर् + अय = चोरय-चोरयति; धृ + अय=धार् + अय= धारय-धारयति; तड् + अय = ताड् + अय=ताडय-ताडयति. परंतु पीड्+ अय=पीडय-पीडयति; कारण, याचा उपान्त्य ई दीर्घ आहे.

( १ ) रच्, गण्, प्रथ्, कथ्, मृग्, स्पृह् अशा कांहीं धातूंना वरील गुणवृद्धिनियम लागू नाहीं. जसें, रच्-रचयति, मृग्-मृगयते, इ.

( २ ) या गणांतील कांहीं धातूंना ह्या अय गणविकरणापूर्वी विशिष्ट आदेश होतात. जसें, कॄत् ( कीर्त् )-कीर्तयति, धू ( धून् )-धूनयति.

**१३३.** याप्रमाणें **वर्तमानकाळ, अनद्यतनभूतकाळ, आज्ञार्थ** व **विध्यर्थ** यांचे प्रत्यय लागतांना पहिल्या वर्गांतील चारहि गणांतील धातूंचीं अंगें बनतात. मात्र प्रत्यय लावतांना पुढील तीन नियम लक्षांत ठेवले पाहिजेत.

( १ ) व् कारादि आणि म् कारादि प्रत्यय पुढें असतांना अंगाच्या अन्त्य अचा आ होतो. जसें, भू + अ + मि=भव + मि = भवामि, भव+ वः = भवावः, भव + मः = भवामः, इत्यादि.

( २ ) अकारादि प्रत्ययांपूर्वी धातूंच्या अंगाच्या अन्त्य अ चा लोप होतो. जसें, भव + अन्ति = भवन्ति.

( ३ ) **अनद्यनभूतकाळीं** कोणत्याही धातूला प्रत्यय लागतांना व्यंजनादि धातूंच्या मागें अ हा आगम लागतो आणि स्वरादि धातूंच्या मागें आ हा आगम लागतो. हा आ व पुढील स्वर या दोहोंबद्दल पुढील स्वराची वृद्धि -आदेश होतो. जसें, भू चें अ + भव + त् = अभवत् असें प्र. पु. ए. रूप होतें; ईक्ष् चें आ + ईक्ष + त = ऐक्षत, उष् चें औषत्, ऋ ( ऋच्छ् ) चें आर्च्छत् अशीं रूपें होतात.

(४) आज्ञार्थ म. पु. ए. हि प्रत्ययाचा अकारान्त अंगापुढें लोप होतो.

## १३४. पहिला ( भ्वादि ) गण

### ( १ ) वर्तमानकाळ ( लट् )

| | भू परस्मैपदी | | | वृध् आत्मनेपदी | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | ए. | द्वि. | ब. | ए. | द्वि. | ब. |
| प्र० | भवति | भवतः(२९) | भवन्ति | वर्धते | वर्धेते | वर्धन्ते |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| म. | भवसि | भवथः | भवथ | वर्धसे | वर्धेथे | वर्धध्वे |
| उ. | भवामि | भवावः | भवामः | वर्धे | वर्धावहे | वर्धामहे |

## ( २ ) अनद्यतनभूतकाळ ( लङ् )

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| प्र. | अभवत् | अभवताम् | अभवन् | अवर्धत | अवर्धेताम् | अवर्धन्त |
| म. | अभवः | अभवतम् | अभवत | अवर्धथाः | अवर्धेथाम् | अवर्धध्वम् |
| उ. | अभवम् | अभवाव | अभवाम | अवर्धे | अवर्धावहि | अवर्धामहि |

## ( ४ ) आज्ञार्थ ( लोट् )

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| प्र. | भवतु | भवताम् | भवन्तु | वर्धताम् | वर्धेताम् | वर्धन्ताम् |
| म. | भव | भवतम् | भवत | वर्धस्व | वर्धेथाम् | वर्धध्वम् |
| उ. | भवानि | भवाव | भवाम | वर्धै | वर्धावहै | वर्धामहै |

## ( ३ ) विध्यर्थ ( विधिलिङ् )

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| प्र. | भवेत् | भवेताम् | भवेयुः | वर्धेत | वर्धेयाताम् | वर्धेरन् |
| म. | भवेः | भवेतम् | भवेत | वर्धेथाः | वर्धेयाथाम् | वर्धेध्वम् |
| उ. | भवेयम् | भवेव | भवेम | वर्धेय | वर्धेवहि | वर्धेमहि |

या गणांतील कांहीं धातूंचीं प्र. पु. ए. चीं रूपें ( कलम १२९ पहा ):–

**गम्** ( गच्छ ) प. गच्छति, अगच्छत्, गच्छतु, गच्छेत्; **घ्रा** प. ( जिघ्र् )—जिघ्रति, आजिघ्रत्, जिघ्रतु, जिघ्रेत्; **ईक्ष्** आ.–ईक्षते, ऐक्षत, ईक्षताम्, ईक्षेत; **दृश्** ( पश्य् ) प.--पश्यति, अपश्यत्, पश्यतु, पश्येत्.

## १३५. चौथा ( दिवादि ) गण

## ( १ ) वर्तमानकाळ

| | तुष् परस्मैपदी | | | विद् आत्मनेपदी | | |
|---|---|---|---|---|---|---|
| प्र. | तुष्यति | तुष्यतः | तुष्यन्ति | विद्यते | विद्येते | विद्यन्ते |
| म. | तुष्यसि | तुष्यथः | तुष्यथ | विद्यसे | विद्येथे | विद्यध्वे |
| उ. | तुष्यामि | तुष्यावः | तुष्यामः | विद्ये | विद्यावहे | विद्यामहे |

### ( २ ) अनद्यतनभूतकाळ

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| प्र. अतुष्यत् | अतुष्यताम् | अतुष्यन् | अविद्यत | अविद्येताम् | अविद्यन्त |
| म. अतुष्यः | अतुष्यतम् | अतुष्यत | अविद्यथाः | अविद्येथाम् | अविद्यध्वम् |
| उ. अतुष्यम् | अतुष्याव | अतुष्याम | अविद्ये | अविद्यावहि | अविद्यामहि |

### ( ३ ) आज्ञार्थ

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| प्र. तुष्यतु | तुष्यताम् | तुष्यन्तु | विद्यताम् | विद्येताम् | विद्यन्ताम् |
| म. तुष्य | तुष्यतम् | तुष्यत | विद्यस्व | विद्येथाम् | विद्यध्वम् |
| उ. तुष्याणि | तुष्याव | तुष्याम | विद्यै | विद्यावहै | विद्यामहै |

### ( ४ ) विध्यर्थ

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| प्र. तुष्येत् | तुष्येताम् | तुष्येयुः | विद्येत | विद्येयाताम् | विद्येरन् |
| म. तुष्येः | तुष्येतम् | तुष्येत | विद्येथाः | विद्येयाथाम् | विद्येध्वम् |
| उ. तुष्येयम् | तुष्येव | तुष्येम | विद्येय | विद्येवहि | विद्येमहि |

या गणांतील कांहीं धातूंचीं प्र. पु. ए. चीं रूपें ( कलम १३० पहा ):–
**दिव्** प.–दीव्यति, अदीव्यत्, दीव्यतु, दीव्येत्; **शम्** प.–शाम्यति, अशाम्यत्, शाम्यतु, शाम्येत्; **व्यध्** प.–विध्यति, अविध्यत्, विध्यतु, विध्येत्; **जन्** आ.–जायते, अजायत, जायताम्, जायेत; **सो** प.–स्यति, अस्यत्, स्यतु, स्येत्; **युध्** आ.–युध्यते, अयुध्यत, युध्यताम्, युध्येत.

## १३६. सहावा ( तुदादि ) गण

### ( १ ) वर्तमानकाळ

**तुद्** उभयपदी

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| प्र. तुदति | तुदतः | तुदन्ति | तुदते | तुदेते | तुदन्ते |
| म. तुदसि | तुदथः | तुदथ | तुदसे | तुदेथे | तुदध्वे |
| उ. तुदामि | तुदावः | तुदामः | तुदे | तुदावहे | तुदामहे |

### ( २ ) अनद्यतनभूतकाळ

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| प्र. अतुदत् | अतुदताम् | अतुदन् | अतुदत | अतुदेताम् | अतुदन्त |
| म. अतुदः | अतुदतम् | अतुदत | अतुदथाः | अतुदेथाम् | अतुदध्वम् |
| उ. अतुदम् | अतुदाव | अतुदाम | अतुदे | अतुदावहि | अतुदामहि |

### ( ३ ) आज्ञार्थ

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| प्र. तुदतु | तुदताम् | तुदन्तु | तुदताम् | तुदेताम् | तुदन्ताम् |
| म. तुद | तुदतम् | तुदत | तुदस्व | तुदेथाम् | तुदध्वम् |
| उ. तुदानि | तुदाव | तुदाम | तुदै | तुदावहै | तुदामहै |

### ( ४ ) विध्यर्थ

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| प्र. तुदेत् | तुदेताम् | तुदेयुः | तुदेत | तुदेयाताम् | तुदेरन् |
| म. तुदेः | तुदेतम् | तुदेत | तुदेथाः | तुदेयाथाम् | तुदेध्वम् |
| उ. तुदेयम् | तुदेव | तुदेम | तुदेय | तुदेवहि | तुदेमहि |

या गणांतील कांहीं धातूंचीं प्र. पु. ए. चीं रूपें ( कलम १३१ पहा ):- ध्रृ आ.-ध्रियते, अध्रियत, ध्रियताम्, ध्रियेत; प्रच्छ् ( पृच्छ् ) प.- पृच्छति, अपृच्छत्, पृच्छतु, पृच्छेत्; सिच् ( सिंच् ) उ.-सिंचति-ते, असिंचत्-त, सिंचतु-ताम्, सिंचेत्-त; गॄ प.-गिरति, अगिरत्, गिरतु, गिरेत्.

## १३७. दहावा ( चुरादि ) गण

### ( १ ) वर्तमानकाळ

चुर् प. अर्थ् आ.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| प्र. चोरयति | चोरयतः | चोरयन्ति | अर्थयते | अर्थयेते | अर्थयन्ते |
| म. चोरयसि | चोरयथः | चोरयथ | अर्थयसे | अर्थयेथे | अर्थयध्वे |
| उ. चोरयामि | चोरयावः | चोरयामः | अर्थये | अर्थयावहे | अर्थयामहे |

### ( २ ) अनद्यतनभूतकाळ

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| प्र. अचोरयत् | अचोरयताम् | अचोरयन् | आर्थयत | आर्थयेताम् | आर्थयन्त |
| म. अचोरयः | अचोरयतम् | अचोरयत | आर्थयेथाः | आर्थयेथाम् | आर्थयध्वम् |
| उ. अचोरयम् | अचोरयाव | अचोरयाम | आर्थये | आर्थयावहि | आर्थयामहि |

### ( ३ ) आज्ञार्थ

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| प्र. चोरयतु | चोरयताम् | चोरयन्तु | अर्थयताम् | अर्थयेताम् | अर्थयन्ताम् |
| म. चोरय | चोरयतम् | चोरयत | अर्थयस्व | अर्थयेथाम् | अर्थयध्वम् |
| उ. चोरयाणि | चोरयाव | चोरयाम | अर्थयै | अर्थयावहै | अर्थयामहै |

### ( ४ ) विध्यर्थ

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| प्र. | चोरयेत् | चोरयेताम् | चोरयेयुः | अर्थयेत | अर्थयेयाताम् | अर्थयेरन् |
| म. | चोरयेः | चोरयेतम् | चोरयेत | अर्थयेथाः | अर्थयेयाथाम् | अर्थयेध्वम् |
| उ. | चोरयेयम् | चोरयेव | चोरयेम | अर्थयेय | अर्थयेवहि | अर्थयेमहि |

या गणांतील कांहीं धातूंचीं प्र. पु. ए. चीं रूपें ( कलम १३२ ):—

तड् प.--ताडयति, अताडयत्, ताडयतु, ताडयेत्; कृत् ( कीर्त् ) प. कीर्तयति, अकीर्तयत्, कीर्तयतु कीर्तयेत्; कथ् प.--कथयति, अकथयत्, कथयतु, कथयेत्; मृग् आ.- मृगयते, अमृगयत, मृगयताम्, मृगयेत.

### वर्ग दुसरा ( अकारान्ताहून भिन्न अंगाचा )

१३८. या वर्गांत दुसरा ( अदादि ), तिसरा ( जुहोत्यादि ), पांचवा ( स्वादि ), सातवा ( रुधादि), आठवा (तनादि) व नववा ( क्र्यादि) हे सहा गण येतात. या दुसऱ्या वर्गांत मोडणाऱ्या गणांतील धातूंना वर्तमानकाळीं, अनद्यतनभूतकाळीं व आज्ञार्थी लागणारे परस्मैपदी प्रत्यय व विध्यर्थी आत्मनेपदी प्रत्यय हे पहिल्या वर्गाच्या प्रत्ययांप्रमाणेंच आहेत. ( १२८ ). बाकीचे प्रत्यय पुढें दिले आहेत.

| वर्तमान—आत्मनेपद | | | | विध्यर्थ—परस्मैपद | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ए. | द्वि. | ब. | | ए. | द्वि. | ब. |
| ते | आते | अते | प्र. | यात् | याताम् | युस् |
| से | आथे | ध्वे | म. | यास् | यातम् | यात |
| ए | वहे | महे | उ. | याम् | याव | याम |

| | अनद्यतनभूत--आत्मनेपद | | | आज्ञार्थ- आत्मनेपद | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | ए. | द्वि. | ब. | ए. | द्वि. | ब. |
| प्र. | त | आताम् | अत | ताम् | आताम् | अताम् |
| म. | थास् | आथाम् | ध्वम् | स्व | आथाम् | ध्वम् |
| उ. | इ | वहि | महि | ऐ | आवहै | आमहै |

१३९. दुसऱ्या वर्गाच्या गणांतील धातूंना लागणाऱ्या वरील प्रत्ययांपैकीं वर्तमान व अनद्यतनभूत या काळांचे परस्मैपदी एकवचनी प्रत्यय (ति, सि,

मि आणि त्, स्, अम्), आज्ञार्थाचे परस्मैपदी व आत्मनेपदी उत्तम पुरुषी प्रत्यय (आनि, आव, आम आणि ऐ, आवहै, आमहै) व प्र.पु. ए. प्रत्यय तु इतके प्रत्यय **विकारक** असून बाकीचे सर्व **अविकारक** आहेत. विकारक प्रत्ययांपूर्वी धातूच्या अंगाच्या अन्त्य इ, उ, ऋ चा गुण किंवा वृद्धि व उपान्त्य ऱ्हस्व इ,उ, ऋ चा गुण होतो.अविकारक प्रत्ययांपूर्वी गुण किंवा वृद्धि होत नाहीं. **विकारक** म्हणजे गुणवृद्धिकारक.

**१४०. दुसरा ( अदादि ) गण**--या गणांतील धातूंना अ ( शप् ) विकरण लागून त्याचा लोप होतो. अर्थात् धातु हेंच अंग होय; व प्रत्ययांपूर्वी होणारीं गुण, वृद्धि किंवा अन्य कार्यें धातूवरच होतात. जसें, **विद्** चें वर्तमान प्र. पु. ए. वेत्ति; इ प.--एति; **स्तु** चें प्र. पु. ब. स्तुवन्ति § १३१ ( ३ ).

( अ ) या गणांतील **जागृ, दरिद्रा, शास्, चकास्, जक्ष्** अशा कांहीं धातूंना अन्ति व अन्तु ऐवजीं अति व अतु आणि अन् बद्दल उस् हे प्रत्यय लागतात.

**१४१. आकारान्त धातु**--दुसऱ्या गणांतील सर्व आकारान्त धातु परस्मैपदी आहेत. त्यांना अनद्यतन भूतकाळीं प्र. पु. ब. अन् प्रत्यय् लागतांना त्याला उस् असा विकल्पानें आदेश होतो व त्यापूर्वी अन्त्य आ चा लोप होतो. **या** जाणें हा धातु खालीं चालवून दाखविला आहे.

**वर्तमानकाळ.** याति यातः यान्ति, यासि याथः याथ, यामि यावः यामः

**अनद्यतनभूतकाळ.** अयात् अयाताम् अयान्--अयुः, अयाः अयातम् अयात, अयाम् अयाव अयाम.

**आज्ञार्थ.** यातु याताम् यान्तु, याहि यातम् यात, यानि याव याम.

**विध्यर्थ.** यायात् यायाताम् यायुः, यायाः यायातम् यायात, यायाम् यायाव यायाम.

**या** प्रमाणेंच स्ना, पा ( रक्षणें ), भा, वा, ख्या इत्यादि चालतात.

**अपवाद. दरिद्रा** ला व्यंजनादि अविकारक प्रत्यय लागतांना इ आगम होतो व त्यापूर्वी अन्त्य आ चा लोप होतो. शिवाय १४० ( अ ) पहा.

**वर्तमानकाळ.** दरिद्राति दरिद्रितः दरिद्रति, दरिद्रासि दरिद्रिथः दरिद्रिथ,इ.

**अनद्यतनभूत.** अदरिद्रात् अदरिद्रिताम् अदरिद्रुः.

**आज्ञार्थ.** प्र. पु. ब. दरिद्रतु, इत्यादि. **विध्यर्थ.** दरिद्रियात्, इत्यादि.

**१४२. इकारान्त धातु.** इ प. जाणें, अधि + इ प.स्मरणें ह्या इकारान्त धातूंच्या इ चा स्वरादि अविकारक प्रत्ययांपूर्वी १३१ (३) नियमाप्रमाणें इय् होत नाहीं; तर य् होतो.

**वर्तमानकाळ.** एति इतः यन्ति, एषि इथः इथ, एमि इवः इमः.

**अनद्यतनभूतकाळ.** ऐत् ऐताम् आयन्, ऐः ऐतम् ऐत, आयम् ऐव ऐम. आ + इ + त् = आ + ए + त् = ऐत्; आ + इ + अन् = आ + य् + अन् = आयन् इत्यादि.

**आज्ञार्थ.** एतु इताम् यन्तु, इहि इतम् इत, अयानि अयाव अयाम. इ+ आनि = ए + आनि = अय् + आनि=अयानि, इत्यादि.

**विध्यर्थ.** इयात् इयाताम् इयुः, इयाः इयातम् इयात, इयाम् इयाव इयाम.

( अ ) इ प. प्रमाणेंच **अधि** + इ प. स्मरणें हा चालतो. जसें, अध्येति, अध्यैत्, अध्येतु, अधीयात्, इत्यादि.

**( आ ) अधि+इ** आ. अध्ययन करणें. १३१ (३) नियमाप्रमाणें स्वरादि अविकारक प्रत्ययांपूर्वी इ चा इय् होतो.

**वर्तमान.** अधीते अधीयाते अधीयते, अधीषे अधीयाथे अधीध्वे, अधीये अधीवहे अधीमहे.

**अनद्यतनभूत.** अध्यैत अध्यैयाताम्[1] अध्यैयत, अध्यैथाः अध्यैयाथाम् अध्यैध्वम्, अध्यैयि अध्यैवहि अध्यैमहि.

**आज्ञार्थ.** अधीताम् अधीयाताम् अधीयताम्, अधीष्व अधीयाथाम् अधीध्वम्, अध्ययै[2] अध्ययावहै अध्ययामहै.

---

१. अधि + आ + इ + आताम्=अधि + आ + इय् + आताम् (१३१) = अधि + ऐय् + आताम्=अध्यैयाताम् ( १२ ). २. अधि + इ + ऐ=अधि + ए + ऐ ( १३९ ) = अधि + अयै ( १३ ) = अध्ययै.

**विध्यर्थ.** अधीयीत अधीयीयाताम् अधीयीरन्, अधीयीथाः अधीयीयाथाम् अधीयीध्वम्, अधीयीय अधीयीवहि अधीयीमहि.

( इ ) **शी** आ. निजणें. या धातूच्या ई ला सर्व प्रत्ययांपूर्वी गुण होतो व वर्तमान, अनद्यतनभूत व आज्ञार्थ यांच्या प्र. पु. ब. प्रत्ययांपूर्वी र् आगम होतो.

| वर्तमान काळ | | | अनद्यतन भूतकाळ | | |
|---|---|---|---|---|---|
| शेते | शयाते | शेरते | अशेत | अशयाताम् | अशेरत |
| शेषे | शयाथे | शेध्वे | अशेथाः | अशयाथाम् | अशेध्वम् |
| शये | शेवहे | शेमहे | अशयि | अशेवहि | अशेमहि |
| **आज्ञार्थ** | | | **विध्यर्थ** | | |
| शेताम् | शयाताम् | शेरताम् | शयीत | शयीयाताम् | शयीरन् |
| शेष्व | शयाथाम् | शेध्वम् | शयीथाः | शयीयाथाम् | शयीध्वम् |
| शयै | शयावहै | शयामहै | शयीय | शयीवहि | शयीमहि |

**१४३. उकारान्त धातु**—यांच्या अन्त्य उ ची व्यंजनादि विकारक प्रत्यय लागतांना वृद्धि होते व स्वरादि विकारक प्रत्यय लागतांना गुण होतो. शिवाय १३१ ( ३ ) पहा.

**यु** प. जोडणें.

**वर्तमान.** यौति युतः युवन्ति १३१ (३), यौषि युथः युथ, यौमि युवः युमः, **अनद्यतनभूत.** अयौत् अयुताम् अयुवन्, अयौः अयुतम् अयुत, अयवम् अयुव अयुम.

**आज्ञार्थ.** यौतु युताम् युवन्तु, युहि युतम् युत, यवानि यवाव यवाम.

**विध्यर्थ.** युयात् युयाताम् युयुः, युयाः युयातम् युयात, युयाम् युयाव युयाम. यु प्रमाणेंच नु, स्नु, इत्यादि परस्मैपदी व ह्नु आ. हे धातु चालतात. ह्नुते ह्नुवाते ह्नुवते, इत्यादि.

( अ ) **रु** प. व **स्तु** उ. हे धातुहि यु प्रमाणेंच चालतात; परंतु व्यंजनादि प्रत्ययांपूर्वी विकल्पानें ई आगम होतो व त्या वेळीं विकारक प्रत्ययांपूर्वी अन्त्य उ ला वृद्धीऐवजीं गुण होतो.

---

१. अधि + इ + ईयाताम् = अधि + इय् + ईयाताम् = अधि + इयीयाताम् = अधीयीयाताम्.

**स्तु** उ. चीं दोनहि प्रकारचीं रूपें पुढें दिलीं आहेतः—

**वर्तमान**. प. स्तौति-स्तवीति स्तुतः-स्तुवीतः स्तुवन्ति, स्तौषि--स्तवीषि स्तुथः स्तुवीथः स्तुथ स्तुवीथ, स्तौमि–स्तवीमि स्तुवः--स्तुतीवः स्तुमः- स्तुवीमः

**अनद्यतनभूत**. प. अस्तौत्- अस्तवीत् अस्तुताम्--अस्तुवीताम् अस्तुवन्, अस्तौः--अस्तवीः अस्तुतम्--अस्तुवीतम् अस्तुत--अस्तुवीत, अस्तवम् अस्तुव--अस्तुवीव अस्तुम--अस्तुवीम.

**आज्ञार्थ**. प. स्तौतु- स्तवीतु स्तुताम्- स्तुवीताम् स्तुवन्तु, स्तुहि-स्तुवीहि स्तुतम् -स्तुवीतम् स्तुत- स्तुवीत, स्तवानि स्तवाव स्तवाम.

**विध्यर्थ**. प. स्तुयात्--स्तुवीयात् स्तुयाताम्--स्तुवीयाताम् स्तुयुः--स्तुवीयुः इ.

**वर्तमान**. आ. स्तुते- स्तुवीते स्तुवाते स्तुवते, स्तुषे -स्तुवीषे स्तुवाथे स्तुध्वे--स्तुवीध्वे, स्तुवे स्तुवहे--स्तुवीवहे, स्तुमहे स्तुवीमहे.

**अनद्यतनभूत**. आ. अस्तुत--अस्तुवीत अस्तुवाताम् अस्तुवत, अस्तुथाः-अस्तुवीथाः अस्तुवाथाम् अस्तुध्वम्--अस्तुवीध्वम्, अस्तुवि अस्तुवहि--अस्तुवीवहि अस्तुमहि--अस्तुवीमहि.

**आज्ञार्थ**. आ. स्तुताम्-स्तुवीताम् स्तुवाताम् स्तुवताम्, स्तुष्व-स्तुवीष्व स्तुवाथाम् स्तुध्वम्--स्तुवीध्वम्, स्तवै स्तवावहै स्तवामहै.

**विध्यर्थ**. आ. स्तुवीत स्तुवीयाताम् स्तुवीरन्, स्तुवीथाः स्तुवीयाथाम् स्तुवीध्वम्, स्तुवीय स्तुवीवहि स्तुवीमहि.

**स्तु** प. प्रमाणेंच रु प. रौति--रवीति रुतः--रुवीतः रुवन्ति, इत्यादि.

( आ ) ब्रू उ. बोलणें. याला व्यंजनादि विकारक प्रत्यय लागतांना ई आगम होतो.

**वर्तमान** प. ब्रवीति ब्रूतः ब्रुवन्ति (१३१), ब्रवीषि ब्रूथः ब्रूथ, ब्रवीमि ब्रूवः ब्रूमः, आ. ब्रूते ब्रुवाते ब्रुवते, ब्रूषे ब्रुवाथे ब्रूध्वे, ब्रुवे ब्रूवहे ब्रूमहे. याच्या वर्तमान पहिल्या पांच रूपांबद्दल आह आहतुः आहुः, आत्थ आहथुः अशीं रूपें विकल्पानें होतात.

**अनद्यतनभूत** प. अब्रवीत् अब्रूताम् अब्रुवन्, अब्रवीः अब्रूतम् अब्रूत,

अब्रवम् अब्रूव अब्रूम; आ. अब्रूत अब्रुवाताम् अब्रुवत, अब्रूथाः अब्रुवाथाम् अब्रूध्वम्, अब्रुवि अब्रूवहि अब्रूमहि.

**आज्ञार्थ** प. ब्रवीतु ब्रूताम् ब्रूवन्तु, ब्रूहि ब्रूतम् ब्रूत, ब्रवाणि ब्रवाव ब्रवाम, आ. ब्रूताम् ब्रुवाताम् ब्रुवताम्, ब्रूष्व ब्रुवाथाम् ब्रूध्वम्, ब्रवै ब्रवावहै ब्रवामहै.

**विध्यर्थ.** प. ब्रूयात् ब्रूयाताम् ब्रूयुः, इत्यादि; आ. ब्रुवीत ब्रुवीयाताम् ब्रुवीरन्.

ब्रू प्रमाणेंच **सू** आ. चालतो. जसें, सूते सुवाते सुवते, इत्यादि.

**१४४. जागृ** प. जागें असणें. **वर्तमान.** जागर्ति जागृतः **जाग्रति** ( १४० अ ) इ.; **अनद्यतनभूत.** अजागः आजागृताम् **अजागरुः**, इ. **आज्ञार्थ** जागर्तु जागृताम् **जाग्रतु** इत्यादि.

**विध्यर्थ.** जागृयात् इत्यादि.

**१४५. व्यंजनान्त धातु—आस्** आ., **वस्** आ., आ + **शास्** आ. व **वच्** प. यांचीं रूपें सरळ होतात. **वच्** चें वर्तमान प्र. पु. ब. रूप नाहीं. आज्ञार्थ म. पु. ए. चा प्रत्यय ( १६५ आ ) प्रमाणें हि ऐवजीं धि होतो.

**( अ ) ध् कारादि प्रत्ययाच्या पूर्वीच्या स् चा लोप होतो.**

**वर्तमान.** आस्--आस्ते आसाते आसते, आस्से आसाथे आध्वे, इ.

**वच्**--वक्ति वक्तः ०, वक्षि वक्थः वक्थ, वच्मि वच्वः वच्मः.

**अनद्यतनभूत.** आस्--आस्त आसाताम् आसत, आस्थाः आसाथाम् आध्वम्, इ. **वच्**--अवक् ( ग् ) अवक्ताम् अवचन्, अवक् ( ग् ) अवक्तम् अवक्त इत्यादि.

**आज्ञार्थ.** आस्--आस्ताम् आसाताम् आसताम्, आस्स्व आसाथाम् आध्वम्, इ. **वच्**--वक्तु वक्ताम् वचन्तु, वग्धि वक्तम् वक्त, इत्यादि.

**विध्यर्थ.** आस् आसीत आसीयाताम् आसीरन्, इ. **वच्**--वच्यात् इ. आस् प्रमाणेंच **वस्**, आ + **शास्** चालतात.

**१४६. द्विष्** उ. द्वेष करणें. यास अनद्यतनभूत प्र. पु. अन् प्रत्यया-बद्दल विकल्पानें उस् होतो. **ष् आणि ढ् यांच्यापुढें स् आला तर त्यांचा क् होतो. ( षढोः कः सि । )**

**वर्तमान**. प. द्वेष्टि द्विष्टः द्विषन्ति, द्वेक्षि ( २४ ) द्विष्ठः द्विष्ठ, द्वेष्मि द्विष्वः द्विष्मः; आ. द्विष्टे द्विषाते द्विषते, द्विक्षे द्विषाते द्विड्ढ्वे, इ.

**अनद्यतनभूत**. प. अद्वेट् ( ड् ) अद्विष्टाम् अद्विषन्-अद्विषुः, अद्वेट् ( ड् ) अद्विष्टम् अद्विष्ट, अद्वेषम् अद्विष्व अद्विष्म; आ. अद्विष्ट अद्विषाताम् अद्विषत, इ.

**आज्ञार्थ**. प. द्वेष्टु द्विष्टाम् द्विषन्तु, द्विड्ढि द्विष्टम् द्विष्ट, द्वेषाणि द्वेषाव द्वेषाम; आ. द्विष्टाम् द्विषाताम्, द्विषताम्, द्विक्ष्व इ.

**विध्यर्थ**. प. द्विष्यात् द्विष्याताम् द्विष्युः, इ.; आ. द्विषीत, इत्यादि.

( अ ) द्विष् प्रमाणेंच चक्ष् आ. चालतो.

**शब्दाच्या अन्तीं असणाऱ्या जोड व्यंजनांतील पहिलें व्यंजन स् किंवा क् असून पुढें अनुनासिक व अन्तःस्थ याखेरीज कोणतेंहि व्यंजन आल्यास किंवा पदान्तीं त्या स् किंवा क् चा लोप होतो. ( स्कोः संयोगाद्योरन्ते च । )**

**वर्तमान**. चष्टे चक्षाते चक्षते, चक्षे चक्षाथे चड्ढ्वे, चक्षे चक्ष्वहे चक्ष्महे चक्ष्+ते=चष्+ते=चष्+टे (२०); असेंच चड्ढ्वे ( २०, १७ ).

**अनद्यतनभूत**.अचष्ट अचक्षाताम् अचक्षत, अचष्ठः अचक्षाथाम् अचड्ढ्वम्, अचाक्षि अचक्ष्वहि अचक्ष्महि.

**आज्ञार्थ**. चष्टाम् चक्षाताम् चक्षताम्, चक्ष्व चक्षाथाम् चड्ढ्वम्, चक्षै चक्षावहै चक्षामहै. **विध्यर्थ**. चक्षीत चक्षीयाताम् चक्षीरन्, इ.

( आ ) दुह् उ. दूध काढणें. नियम ३४ व ७० पहा.

**वर्तमान**. प. दोग्धि दुग्धः दुहन्ति, धोक्षि दुग्धः दुग्ध,दोह्मि दुह्वः दुह्मः. आ. दुग्धे दुहाते दुहते, धुक्षे, दुहाथे धुग्ध्वे, दुहेव दुह्वहे दुह्महे.

**अनद्यतनभूत**. प अधोक् ( ग् ) अदुग्धाम् अदुहन्, अधोक् ( ग् ) अदुग्धम् अदुग्ध, अदोहम् अदुह् अदुह्म; आ. अदुग्ध अदुहाताम् अदुहत, अदुग्धाः अदुहाथाम् अधुग्ध्वम्, अदुहि अदुह्वहि अदुह्महि.

**आज्ञार्थ**. प. दोग्धु दुग्धाम् दुहन्तु, दुग्धि दुग्धम् दुग्ध, दोहानि दोहाव दोहाम; आ. दुग्धाम् दुहाताम् दुहतान्, धुक्ष्व दुहाथाम् धुग्ध्वम्, दोहै दोहावहै दोहामहै.

**विध्यर्थ.** प. दुह्यात् दुह्याताम् दुह्युः, इ. आ. दुहीत दुहीयाताम् दुहीरन् इ. दुह् प्रमाणेंच दिह् चालतो.

( इ ) लिह् उ. चाटणें. नियम ३१ व ७० पहा.

**वर्तमान.** प. लेढि लीढः लिहन्ति लेक्षि लीढः लीढ, लेह्मि लिह्वः लिह्मः, आ. लीढे लिहाते लिहते, लिक्षे लिहाते लीढ्वे, लिहे लिह्वहे लिह्महे.

**अनद्यतनभूत.** प. अलेट् ( ड् ) अलीढाम् अलिहन् अलेट् ( ड् ) अलीढम् अलीढ, अलेहम् अलिह्व अलिह्म; आ. अलीढ अलिहाताम् अलिहत, अलीढाः अलिहाथाम् अलीढ्वम्, इ.

**आज्ञार्थ.** प. लेढु लीढाम् लिहन्तु, लीढि लीढम् लीढः लीढ, लेहानि लेहाव लेहाम; आ. लीढाम् लिहाताम् लिहताम्, लिक्ष्व लिहाथाम् लीढ्वम्, लेहै लेहावहै लहामहै.

**विध्यर्थ.** प. लिह्यात्, इ.; आ. लिहीत इ

१४०. रुद्, स्वप्, श्वस्, अन्, जक्ष्, सर्व परस्मैपदी, हे धातु चालतांना व्यंजनादि प्रत्ययांपूर्वी इ लागतो. अनद्यतनभूताच्या प्रथम व मध्यम पुरुषीं एकवचनीं त् व स् प्रत्ययांपूर्वी ई किंवा अ लागतो.

**वर्तमान.** रुद्—रोदिति रुदितः रुदन्ति, इ. श्वस्--श्वसिति श्वसितः श्वसन्ति.

**अनद्यतनभूत.** अरोदीत्—अरोदत् अरुदिताम् अरुदन्, अरोदीः—अरोदः, इ. श्वस्—अश्वसीत्—अश्वसत्, अश्वसिताम् अश्वसन्, अश्वसीः -अश्वसः, इ.

**आज्ञार्थ.** रोदितु रुदिताम् रुदन्तु, रुदिहि...रोदानि, इ. श्वस्--श्वसितु श्वसिताम् श्वसन्तु.

**विध्यर्थ.** रुद्यात् रुद्याताम् रुद्युः, इ.; श्वस्--श्वस्यात् श्वस्याताम् श्वस्युः, इ. याचप्रमाणें **स्वप्**, **अन्** व **जक्ष** चालतात.

१४८. अद् प. खाणें याचीं अनद्यतनभूताचीं प्रथम व मध्यम पुरुषी एकवचनी रूपें आदत् व आदः अशीं होतात. याचीं इतर रूपें सरळ होतात.

**वर्तमान.** अत्ति अत्तः अदन्ति, अत्सि अत्थः अत्थ, इ. **अनद्यतनभूत.** आदत् आत्ताम् आदन्, इ. **आज्ञार्थ.** अत्तु अत्ताम् अदन्तु, अद्धि ( १६५ आ ) इ. **विध्यर्थ** अद्यात् अद्याताम् अद्युः, इ.

१४९. **ईश्** आ. व **ईड्** आ. यांना स्कारादि किंवा ध्कारादि प्रत्यया-पूर्वी इ आगम होतो. मात्र अनद्यतन भूत म. पु. ब. ध्वम् पूर्वी होत नाहीं.

**वर्तमान.** ईट्टे ईडाते ईडते, ईडिषे ईडाथे ईडिध्वे, ईडे ईड्वहे ईड्महे.

**अनद्यतनभूत.** ऐट्ट ऐडाताम् ऐडत, ऐट्ठाः ऐडाथाम् ऐड्ढ्वम् (२०), ऐडि ऐड्वहि ऐड्महि.

**आज्ञार्थ.** ईट्टाम् ईडाताम् ईडताम्, ईडिष्व ईडाथाम् ईडिध्वम्, ईडै ईडावहै ईडामहै.

**विध्यर्थ.** ईडीत ईडीयाताम् ईडीरन्, इ.

ईड् प्रमाणेंच ईश् चालतो. ( ६८ अ ) नियमाप्रमाणें श् चा ष् होतो. वर्तमान प्र. पु. ए. ईष्टे; अनद्यतन भूत म. पु. ब. ऐड्ढ्वम् ( २०, १७ ).

१५०. **चकास्** प. प्रकाशणें. नियम १४५ अ पहा. आज्ञार्थ म. पु.ए. चकाद्धि किंवा चकाधि.

**वर्तमान.** चकास्ति चकास्तः चकासति, इ. **अनद्यतनभूत.** अचकात् ( द् ) अचकास्ताम् अचकासुः, इ. **आज्ञार्थ.** चकास्तु चाकास्ताम् चकासतु, इ. **विध्यर्थ.** चकास्यात् चकास्याताम् चकास्युः इ.

१५१. **विद्** प. जाणणें. याला वर्तमान काळीं विकल्पानें परोक्षभूताचे प्रत्यय ( १७२ ) लागतात. तसेंच आज्ञार्थी रूपें विकल्पानें विद् ला आम् लावून नंतर कृ चीं आज्ञार्थीचीं रूपें जोडून होतात.

**वर्तमान.** वेत्ति–वेद वित्तः-विदतुः विदन्ति-विदुः, वेत्सि-वेत्थ वित्थः-विदथुः वित्थ–विद, वेद्मि–वेद विद्वः विद्व विद्मः-विद्म.

**अनद्यतनभूत.** अवेत् ( द् ) अवित्ताम् अविदुः, अवेः-अवेत् ( द्) अवित्तम् अवित्त, अवेदम् अविद्व अविद्म.

**आज्ञार्थ.** वेत्तु वित्ताम् विदन्तु, विद्धि वित्तम् वित्त, वेदानि वेदाव वेदाम; विदांकरोतु, विदांकुरुताम् विदांकुर्वन्तु, विदांकुरु विदांकुरुतम् विदांकुरुत, विदांकरवाणि विदांकरवाव विदांकरवाम.

**विध्यर्थ.** विद्यात् विद्याताम् विद्युः, इत्यादि.

**१५२. अस्** प. असणें.

आविकारक प्रत्ययांपूर्वी अस् च्या अ चा लोप होतो.

**वर्तमान.** अस्ति स्तः सन्ति, असि स्थः स्थ, अस्मि स्वः स्मः.

**अनद्यतनभूत.** आसीत् आस्ताम् आसन्, आसीः आस्तम् आस्त, आसम् आस्व आस्म.

**आज्ञार्थ.** अस्तु स्ताम् सन्तु, **एधि** स्तम् स्त, असानि असाव असाम.

**विध्यर्थ.** स्यात् स्याताम् स्युः, स्याः स्यातम् स्यात, स्याम् स्याव स्याम.

**१५३. शास्** प. सत्ता चालविणें. याला व्यंजनादि आविकारक प्रत्यय लागतांना शिस् आदेश होतो; मग ( २४ ) नें स् चा ष् होतो.

**वर्तमान.** शास्ति शिष्टः शासति, शास्सि शिष्ठः शिष्ठ, शास्मि शिष्वः शिष्मः

**अनद्यतनभूत.** अशात् ( द् ) अशिष्टाम् अशासुः, अशाः--अशात् ( द् ) अशिष्टम् अशिष्ट, अशासम् अशिष्व अशिष्म.

**आज्ञार्थ.** शास्तु शिष्टाम् शासतु, शाधि शिष्टम् शिष्ट, शासानि शासाव शासाम.

**विध्यर्थ.** शिष्यात् शिष्याताम् शिष्युः, इत्यादि.

**१५४. हन्** प. ठार मारणें. अनुनासिक व अन्तःस्थ खेरीज करून कोणतेंहि व्यंजन आरंभीं असणाऱ्या प्रत्ययांपूर्वी हन् च्या न् चा लोप होतो. स्वरादि प्रत्ययांपूर्वी हन् च्या अ चा लोप होतो व तेव्हां ह चा घ् होतो.

**वर्तमान.** हन्ति हतः घ्नन्ति, हंसि हथः हथ, हन्मि हन्वः हन्मः

**अनद्यतनभूत.** अहन् अहताम् अघ्नन्, अहन् अहतम् अहत, अहनम् अहन्व अहन्म.

**आज्ञार्थ.** हन्तु हताम् घ्नन्तु, **जहि** हतम् हत, हनानि हनाव हनाम.

**विध्यर्थ.** हन्यात् हन्याताम् हन्युः, इ.

**१५५. मृज्** प. स्वच्छ करणें, धुणें. विकारक प्रत्ययांपूर्वी मृज् च्या ऋ ची वृद्धि व स्वरादि अविकारक प्रत्ययांपूर्वी विकल्पानें वृद्धि होते. शिवाय ( ६८अ ) पहा.

**वर्तमान.** मार्ष्टि मृष्टः मृजन्ति--मार्जन्ति, मार्क्षि मृष्ठः मृष्ठ, मार्ज्मि मृज्वः मृज्मः, मृज् + ति=मार्ज्+ति=मार्ष्+ति ( ६८ अ ) = मार्ष्टि ( २० )

**अनद्यतनभूत.** अमार्ट् ( ड् ) अमृष्टाम् अमृजन्--अमार्जन्, अमार्ट् ( ड् ) अमृष्टम् अमृष्ट, अमार्जम् अमृज्व अमृज्म.

**आज्ञार्थ**. मार्ष्टु मृष्टाम् मृजन्तु--मार्जन्तु, मृड्ढि मृष्टम् मृष्ट, मार्जानि मार्जाव मार्जाम.

**विध्यर्थ**. मृज्यात्, मृज्याताम् मृज्युः, इत्यादि.

१५६. **वश्** प. इच्छिणें. यांच्या व चें अविकारक प्रत्ययांपूर्वी संप्रसारण होतें म्हणजे त्याचा उ होतो. शिवाय ( ६८ अ ) पहा.

**वर्तमान**. वष्टि उष्टः उशन्ति, वक्षि उष्ठः उष्ठ, वश्मि उश्वः उश्मः.

**अनद्यतनभूत**. अवट् ( ड् ) औष्टाम् औशन्, अवट् ( ड् ) औष्टम् औष्ट अवशम् औश्व औश्म.

**आज्ञार्थ**. वष्टु उष्टाम् उशन्तु, उड्ढि उष्टम् उष्ट, वशानि वशाव वशाम.

**विध्यर्थ**. उश्यात् उश्याताम् उश्युः, इत्यादि.

१५७. **तिसरा ( जुहोत्यादि ) गण**—या गणांतील धातूंना अ ( शप् ) विकरण लागून त्याचा लोप होतो; आणि प्रत्यय लागतांना धातूंचें द्वित्व होतें. वर्तमान व आज्ञार्थ यांच्या परस्मैपदीं प्र. पु. व. अन्ति व अन्तु या प्रत्ययांच्या न् चा लोप होतो. अनद्यतनभूताच्या अन् ऐवजीं उस् लागतो आणि त्यापूर्वी अन्त्य आ चा लोप होतो व अन्त्य इ, उ, ऋ ऱ्हस्व किंवा दीर्घ यांचा गुण होतो.

**( अ ) धातूच्या अन्त्य इ किंवा ईच्या मागें जोडव्यंजन नसून धातूचें अंग अनेकाक्षरी असेल तेव्हां त्या इ किंवा ईचा स्वरादि अविकारक प्रत्ययापूर्वी य् होतो. ( एरनेकाचोऽसंयोगपूर्वस्य । )**

१५८. **द्वित्वासंबंधींचे सामान्य नियम**. द्वित्व म्हणजे दोनदां उच्चार. जसें, दा–दादा, जीव्–जीव्जीव्. धातूंचें द्वित्व केलें असतां त्याच्या पूर्व भागाला **अभ्यास** म्हणतात व दोनही भागांना मिळून **अभ्यस्त** म्हणतात. जसें, दादा यांतील पहिला दा हा अभ्यास होय; आणि दादा हें अभ्यस्त होय. ( **पूर्वोऽभ्यासः । उभे अभ्यस्तम् ।** )

( १ ) धातु अनेकाक्षरी असून तो व्यंजनादि असेल तर त्याच्या पहिल्या अक्षराचें द्वित्व होतें व तो स्वरादि असल्यास दुसऱ्या अक्षराचें द्वित्व होतें.

जसें, जागृ–जाजागृ; ऊर्णु– ऊर्णुनु. ( एकाचो द्वे प्रथमस्य । अजादेर्द्वितीयस्य । शिवाय नन्द्रा संयोगादयः । नियम २०० पहा. )

( २ ) अभ्यासांतील पहिलें व्यंजन मात्र राहून बाकीच्या व्यंजनांचा लोप होतो. जसें, जीव्–जीव्जीव्—जीजीव्; स्मृ–स्मृस्मृ–सस्मृ. ( हलादिः शेषः । )

( ३ ) अभ्यासाचें पहिलें व्यंजन श्, ष् किंवा स् असून त्याच्यापुढें श्, ष्, स् यांखेरीज कोणतेंही कठोर व्यंजन असेल तर तें कठोर व्यंजन राहून पूर्वीच्या श्, ष् किंवा स् चा लोप होतो. जसें, स्पर्ध्–स्पर्ध्स्पर्ध्–पस्पर्ध्. ( शर्पूर्वाः खयः । )

( ४ ) अभ्यासांत पांचांपैकीं कोणत्याहि वर्गांतील दुसरें व्यंजन असेल तर त्याचें पहिलें व चौथें असेल तर त्याचें तिसरें होतें. जसें, छिद्–छिद्छिद्–छिछिद्–छिच्छिद् ( १८ )–चिच्छिद्; धा–धाधा–दाधा. ( अभ्यासे चर्च । )

( ५ ) अभ्यासांत असलेल्या कवर्गांतील व्यंजनाबद्दल अनुक्रमें चवर्गांतील व्यंजन होतें, व ह् बद्दल झ् होऊन वरील ( ४ ) नें ज् होतें. जसें, गम्–गम्गम्–गगम्–जगम्; खन्— खन्खन्–खखन्–कखन्–चखन्; हु–हुहु–जुहु. ( कुहोश्चुः । )

( ६ ) अभ्यासांतील दीर्घ स्वर ह्रस्व होतो ( ए, ऐ चा ह्रस्व इ आणि ओ, औचा ह्रस्व उ ). जीव्–जीव्जीव्–जीजीव्–जिजीव्, भी–भीभी–बीभी–बिभी; सेव्–सेव्सेव्–सेसेव्–सिषेव् ( २४ ); ढौक्–ढौक्ढौक्—ढौढौक्–डौढौक्–डुढौक्. ( ह्रस्वः । )

( ७ ) अभ्यासांतील ऋ चा अ होतो. जसें, स्मृ–स्मृस्मृ–स्मृस्मृ–सस्मृ, कृ–कृकृ–चृकृ–चकृ. ( उरत् । )

१५९. हु प. हवन करणें. अंग जुहु.

**वर्तमान.** जुहोति जुहुतः जुह्वति (१५७), जुहोषि जुहुथः जुहुथ, जुहोमि जुहुवः जुहुमः.

**अनद्यनभूत.** अजुहोत् अजुहुताम् अजुहवुः, अजुहोः अजुहुतम् अजुहुत अजुहवम् अजुहुव अजुहुम.

**आज्ञार्थ.** जुहोतु जुहुताम् जुह्वतु, जुहुधि ( १६५ आ) जुहुतम् जुहुत, जुहवानि जुहवाव जुहवाम.

**विध्यर्थ.** जुहुयात् जुहुयाताम् जुहुयुः, इत्यादि.

हु प्रमाणेंच ह्री प. चालतो. जसें, जिह्रेति जिह्रीतः जिह्रियति–१३१ ( ३ ). अजिह्रयुः, जिह्रियतु, जिह्रीयात्, इत्यादि.

१६०. दा उ. देणें व धा उ. ठेवणें यांच्या अंगाच्या अन्त्य आ चा अविकारक प्रत्ययांपूर्वी लोप होतो. अंगें ददा व दधा.

**वर्तमान.** प. ददाति दत्तः ( १७ ) ददति, ददासि दत्थः दत्थ, ददामि दद्वः दद्मः; आ. दत्ते ददाते ददते, दत्से ददाथे दद्ध्वे, ददे दद्वहे दद्महे.

**अनद्यतनभूत.** प. अददात् अदत्ताम् अददुः, अददाः अदत्तम् अदत्त, अददाम् अदद्व अदद्म; आ. अदत्त अददाताम् अददत, अदत्थाः अददाथाम् अदद्ध्वम्, अददि अदद्वहि अदद्महि.

**आज्ञार्थ.** प. ददातु दत्ताम् ददतु, देहि दत्तम् दत्त, ददानि ददाव ददाम; आ. दत्ताम् ददाताम् ददताम्, दत्स्व ददाथाम् दद्ध्वम्, ददै ददावहै ददामहै.

**विध्यर्थ.** प. दद्यात् दद्याताम् दद्युः इ.; आ. ददीत ददीयाताम् इ. याच-प्रमाणें धा चालतो.

**वर्तमानकाळ.** दधाति धत्तः दधति, दधासि धत्थः धत्त, दधामि दध्वः दध्मः आ. धत्ते दधाते दधते, धत्से दधाते, धद्ध्वे, दधे दध्वहे दध्महे.

**अनद्यतनभूत.** प. अदधात् अधत्ताम् अदधुः, अदधाः अधत्तम् अधत्त, अदधाम् अदध्व अदध्म. आ. अधत्त अदधाताम् अदधत, अधत्थाः अदधाथाम् अधद्ध्वम्, अदधि अदध्वहि अदध्महि.

**आज्ञार्थ.** प. दधतु धत्ताम् दधतु, धेहि धत्तम् धत्त, दधानि दधाव दधाम, आ. धत्ताम् दधाताम् दधताम्, धत्स्व दधाथाम् धद्ध्वम्, दधै दधा-वहै दधामहै.

**विध्यर्थ.** प. दध्यात् दध्याताम् दध्युः, इ.; आ. दधीत दधीयाताम् दधीरन्, इ.

**१६१. हा** प. त्यागणें. याच्या अन्त्य आ चा स्वरादि अविकारक प्रत्यय व विध्यर्थाचे सर्व प्रत्यय यांपूर्वी लोप होतो व व्यंजनादि अविकारक प्रत्ययांपूर्वी अन्त्य आबद्दल इ किंवा ई आदेश होतो.

**वर्तमान**. जहाति जहितः–जहीतः जहति, जहासि जहिथः–जहीथः जहिथ–जहीथ, जहामि जहिवः–जहीवः–जहिमः जहीमः.

**अनद्यतनभूत**. अजहात् अजहिताम्–अजहीताम् अजहुः, इत्यादि.

**आज्ञार्थ**. जहातु जहिताम्–जहीताम् जहतु, **जहाहि–जहिहि–जहीहि**, इ.

**विध्यर्थ**. जह्यात् जह्याताम् जह्युः, इत्यादि.

**१६२. मा** आ. मोजणें, **हा** आ. जाणें, **भृ** उ. भरणें **पृ** व **ऋ** यांच्या अभ्यासांतील अ चा इ होतो; आणि **निज्, विज्** व **विष्** यांच्या अभ्यासांतील इ चा गुण होतो. **ऋ** चें अंग इयृ होतें. १७७ (३).

मा व हा ह्यांच्या अन्त्य आ चा व्यंजनादि अविकारक प्रत्ययांपूर्वी ई होतो व स्वरादि अविकारक प्रत्ययांपूर्वी त्याचा लोप होतो.

**वर्तमान**. मिमीते मिमाते मिमते; जिहीते जिहाते जिहते, इत्यादि.

**अनद्यतनभूत**. अमिमीत अमिमाताम् अमिमत; अजिहीत, इत्यादि.

**आज्ञार्थ**. मिमीताम् मिमाताम् मिमताम्; जिहीताम्, इ.

**विध्यर्थ**. मिमीत मिमीयाताम् मिमीरन्; जिहीत, इ.

## भृ. उ. भरणें.

**वर्तमान**. बिभर्ति बिभृतः बिभ्रति, बिभर्षि बिभृथः बिभृथ, बिभर्मि बिभृवः बिभृमः; बिभृते बिभ्राते बिभ्रते, इ.

**अनद्यतनभूत**. अबिभः ( ३३ ) अबिभृताम् अबिभरुः, अबिभः अबिभृतम् अबिभृत, अबिभरम् अबिभृव अबिभृम; अबिभृत अबिभ्राताम् अबिभ्रत, इ.

**आज्ञार्थ**. बिभर्तु बिभृताम् बिभ्रतु, बिभृहि बिभृतम् बिभृत, बिभराणि बिभराव बिभराम; बिभृताम् बिभ्राताम् बिभ्रताम्, इ.

**विध्यर्थ.** बिभृयात् बिभृयाताम् बिभृयुः; बिभ्रीत, इ.

**१६३. भी** प. भिणें याचा अन्त्य ई व्यंजनादि अविकारक प्रत्ययापूर्वी विकल्पानें ऱ्हस्व होतो.

**वर्तमान.** बिभेति बिभितः—बिभीतः बिभ्यति ( १५७ अ ), इत्यादि.

**अनद्यतनभूत.** अबिभेत् अबिभिताम्–अबिभीताम् अबिभयुः, इ.

**आज्ञार्थः**— बिभेतु बिभिताम्–बिभीताम् बिभ्यतु, इ.

**विध्यर्थ.** बिभियात् बिभीयात्, इ.

**१६४. पांचवा ( स्वादि ) गण**—या गणांतील धातूंना नु हें विकरण लागून अंग बनतें. जसें, सु चें वर्तमान प्र.पु. ए. सु+नु +ति=सुनु+ति = =सुनो + ति ( १३९ ) = सुनोति.

या गणांतील धातूंच्या अंगाच्या अन्त्य उ च्या मागें जोडव्यंजन नसलें तर त्या उ चा वकारादि व मकारादि अविकारक प्रत्ययापूर्वी विकल्पानें लोप होतो. जसें, सुनुवः–सुन्वः, सुनुमः–सुन्मः; पण आप्नुवः, आप्नुमः, कारण उ च्या मागें जोडव्यंजन आहे.

या गणांतील धातूंच्या अंगाच्या अन्त्य उ च्या मागें जोडव्यंजन असेल तर त्या उ चा स्वरादि अविकारक प्रत्ययापूर्वी उव् होतो. पण मागें जोड-व्यंजन नसेल तर उ चा व् होतो. हा १३१ ( ३ ) ला अपवाद होय. जसें आप् + नु + अन्ति = आप्नु + अन्ति =आप्नुव् + अन्ति=आप्नुवन्ति सु + नु + अन्ति=सुनु + अन्ति = सुन्वन्ति.

पांचव्या व आठव्या गणांतील धातूंच्या अंगाच्या अन्त्य उ मागें जोड व्यंजन नसल्यास आज्ञार्थ म. पु. ए. हि प्रत्ययाचा लोप होतो. जसें सु + नु + हि = सुनु; पण आप्नुहि.

### सु उ. पिळून रस काढणें.

**वर्तमान.** प. सुनोति सुनुतः सुन्वन्ति,, सुनोषि सुनुथः सुनुथ, सुनोमि सुनुवः–सुन्वः सुनुमः–सुन्मः, आ. सुनुते सुन्वाते सुन्वते, सुनुषे सुन्वाथे सुनुध्वे, सुन्वे सुनुवहे–सुन्वहे सुनुमहे–सुन्महे.

**अनद्यतनभूतकाळ.** प. असुनोत् असुनुताम् असुन्वन्, असुनोः असु-नुतम् असुनुत, असुनवम् असुनुव-न्व असुनुम-न्म; आ. असुनुत असुन्वाताम् असुन्वत, असुनुथाः असुन्वाथाम् असुनुध्वम्, असुन्वि असुनुवहि-न्वहि असुनुमहि-न्महि.

**आज्ञार्थ.** प. सुनोतु सुनुताम् सुन्वन्तु, सुनु सुनुतम् सुनुत, सुनवानि सुनवाव सुनवाम; आ. सुनुताम् सुन्वाताम् सुन्वताम्, सुनुष्व सुन्वाथाम् सुनुध्वम्, सुनवै सुनवावहै सुनवामहै.

**विध्यर्थ.** प. सुनुयात् सुनुयाताम् सुनुयुः, इ.; आ. सुन्वीत सुन्वीयाताम् सुन्वीरन्, इ.

**श्रु** ( शृ ) प. ऐकणें–शृणोति ( २३ ) शृणुतः शृण्वन्ति; अशृणोत् अशृणुताम् अशृण्वन्; शृणोतु शृणुताम् शृण्वन्तु, शृणु शृणुतम् शृणुत; शृणुयात् शृणुयाताम् शृणुयुः

**आप्** प. मिळविणें–आप्नोति आप्नुतः आप्नुवन्ति; आप्नोत् आप्नुताम् आप्नुवन्; आप्नोतु आप्नुताम् आप्नुवन्ति, आप्नुहि आप्नुतम् आप्नुत; आप्नुयात् आप्नुयाताम् आप्नुयुः

**अश्** आ. व्यापणें–अश्नुते अश्नुवाते अश्नुवते; आश्नुत अश्नुवाताम् आश्नुवत; इत्यादि.

**१६५. सातवा ( रुधादि ) गण**–या गणांतील धातूंना, धातूंतील स्वर व त्याच्या पुढील व्यंजन यांच्यामध्यें, न हें विकरण लागून अंग बनतें; परंतु अविकारक प्रत्ययापूर्वी या न मधील अ चा लोप होतो. जसें रुध् चें वर्तमान प्र. पु. ए. रुध् + ति = रुनध् + ति = रुणद्धि ( २३, १९, १७ ), रुध् + तः = रुनध् + तः = रुन्ध् + तः = रुन्द्धः, रुध् + अन्ति = रुनध् + अन्ति = रुन्ध् + अन्ति = रुन्धन्ति.

( अ ) या न विकरणापुढें धातूंतील अनुनासिक असेल तर त्याचा लोप होतो. जसें इन्ध् चें वर्तमान प्र. पु. ए, इन्ध् + ते = इनन्ध् + ते = इनध् + ते = इन्ध् + ते = इन्द्धे; भञ्ज् + ति = भनञ्ज् + ति = भनज् + ति = भनक्ति.

(आ) अंगाच्या अन्तीं अनुनासिक व अन्तःस्थ यांखेरीज कोणतेंहि व्यंजन असेल तर आज्ञार्थ प्र. पु. ए. चा प्रत्यय हि ऐवजीं धि लागतो. हु ३ प. धातूलाहि धि च लागतो. (हुझल्भ्यो हेर्धिः ।)

रुध् उ. अडविणें

## वर्तमानकाळ

| | परस्मैपद | | | आत्मनेपद | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | ए. | द्वि. | ब. | ए. | द्वि. | ब. |
| प्र. | रुणद्धि | रुन्द्धः | रुन्धन्ति | रुन्द्धे | रुन्धाते | रुन्धते |
| म. | रुणत्सि | रुन्द्धः | रुन्द्ध | रुन्त्से | रुन्धाथे | रुन्द्ध्वे |
| उ. | रुणध्मि | रुन्ध्वः | रुन्ध्मः | रुन्धे | रुन्ध्वहे | रुन्ध्महे |

## अनद्यतनभूतकाळ

| | परस्मैपद | | | आत्मनेपद | | |
|---|---|---|---|---|---|---|
| प्र. | अरुणत् | अरुन्द्धाम् | अरुन्धन् | अरुन्द्ध | अरुन्धाताम् | अरुन्धत |
| म. | अरुणत्-अरुणः | अरुन्द्धम् | अरुन्द्ध | अरुन्द्धाः | अरुन्धाथाम् | अरुन्द्ध्वम् |
| उ. | अरुणधम् | अरुन्ध्व | अरुन्ध्म | अरुन्धि | अरुन्ध्वहि | अरुन्ध्महि |

## आज्ञार्थ

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| प्र. | रुणद्धु | रुन्द्धाम् | रुन्धन्तु | रुन्द्धाम् | रुन्धाताम् | रुन्धताम् |
| म. | रुन्द्धि | रुन्द्धम् | रुन्द्ध | रुन्त्स्व | रुन्धाथाम् | रुन्द्ध्वम् |
| उ. | रुणधानि | रुणधाव | रुणधाम | रुणधै | रुणधावहै | रुणधामहै |

## विध्यर्थ

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| प्र. | रुन्ध्यात् | रुन्ध्याताम् | रुन्ध्युः | रुन्धीत | रुन्धीयाताम् | रुन्धीरन् |
| म. | रुन्ध्याः | रुन्ध्यातम् | रुन्ध्यात | रुन्धीथाः | रुन्धीयाथाम् | रुन्धीध्वम् |
| उ. | रुन्ध्याम् | रुन्ध्याव | रुन्ध्याम | रुन्धीय | रुन्धीवहि | रुन्धीमहि |

अञ्ज् प.—अनक्ति अङ्क्तः अञ्जन्ति; आनक्-ग् आङ्क्ताम् आञ्जन्; अनक्तु अङ्क्ताम् अञ्जन्तु, अङ्ग्धि; अञ्ज्यात् अञ्ज्याताम् अञ्ज्युः.

**पिष्** प.—पिनष्टि पिंष्टः पिंषन्ति, पिनक्षि; अपिनट्—ड् अपिंष्टाम् अपिंषन्. पिनष्टु पिंष्टाम् पिंषन्तु, पिण्ड्ढि पिंष्टम्, पिंष्ट, पिनषाणि (२३), इ. पिंष्यात्, इ.

**१६६. आठवा ( तनादि ) गण**—या गणांतील धातूंचें अंग धातूंना उ विकरण लागून बनतें. जसें, **तन्** उ. धातूचें वर्तमान प्र. पु. ए. **तन्** + उ + ति = तनु + ति = तनोति ( १३९ ); तन् + उ + ते = तनुते.

पांचव्या गणाप्रमाणेंच व्कारादि व म्कारादि अविकारक प्रत्ययापूर्वी अंगाच्या अन्त्य उ चा विकल्पानें लोप होतो.

तन् उ. ताणणें, पसरणें.

**वर्तमान.** प. तनोति तनुतः तन्वन्ति, तनोषि तनुथः तनुथ, तनोमि तनुवः—न्वः तनुमः—न्मः आ. तनुते तन्वाते तन्वते, तनुवहे—न्वहे इत्यादि.

**अनद्यतनभूत.** अतनोत् अतनुताम् अतन्वन्, अतनोः अतनुतम् अतनुत, अतनवम् अतनुव—न्व अतनुम—न्म; आ. अतनुत अतन्वाताम् अतन्वत, अतनुवहि—न्वहि इत्यादि.

**आज्ञार्थ.** तनोतु तनुताम् तन्वन्तु, तनु तनुतम् तनुत, तनवानि, इ.; आ. तनुताम्, तनवै तनवावहै, इ.

**विध्यर्थ.** तनुयात् तनुयाताम् तनुयुः; आ. तन्वीत तन्वीयाताम् तन्वीरन् इत्यादि.

**१६७. कृ** धातूचें अंग विकारक प्रत्ययांपूर्वी करु व अविकारक प्रत्ययांपूर्वी कुरु असें होतें. आणि वकारादि, मकारादि व यकारादि अविकारक प्रत्ययांपूर्वी उ चा लोप होतो.

कृ उ. करणें.

**वर्तमानकाळ.** प. करोति कुरुतः कुर्वन्ति, करोषि कुरुथः कुरुथ, करोमि कुर्वः कुर्मः; आ. कुरुते कुर्वाते कुर्वते, कुरुषे कुर्वाथे कुरुध्वे, कुर्वे कुर्वहे कुर्महे.

**अनद्यतनभूतकाळ.** अकरोत् अकुरुताम् अकुर्वन्, अकरोः अकुरुतम् अकुरुत, अकरवम् अकुर्व अकुर्म; अकुरुत अकुर्वाताम् अकुर्वत, अकुरुथाः अकुर्वाथाम् अकुरुध्वम्, अकुर्वि अकुर्वहि अकुर्महि.

**आज्ञार्थ.** करोतु कुरुताम् कुर्वन्तु; कुरु कुरुतम् कुरुत; करवाणि करवाव करवाम; कुरुताम् कुर्वाताम् कुर्वताम्; कुरुष्व कुर्वाथाम् कुरुध्वम्; करवै करवावहै करवामहै.

**विध्यर्थ.** कुर्यात् कुर्याताम् कुर्युः इ.; कुर्वीत कुर्वीयाताम् कुर्वीरन् इ.

(अ) सम्, परि व उप ह्या उपसर्गांनीं युक्त अशा कृ धातूचा 'भूषविणें' इत्यादि विशिष्ट अर्थ असतां त्या कृ च्या मागें स् लागतो. जसें, संस्करोति, समस्करोत्, संस्करोतु, संस्कुर्यात्. याचप्रमाणें परिष्करोति, उपस्करोति, पर्यष्करोत् (किंवा पर्यस्करोत्), उपास्करोत् इत्यादि.

**१६८. नववा (क्र्यादि) गण**—या गणांतील धातूंना ना हें विकरण लागून अंग बनतें; परंतु व्यंजनादि अविकारक प्रत्ययांपूर्वी ना तील आ चा ई होतो व स्वरादि अविकारक प्रत्ययांपूर्वी ना तील आ चा लोप होतो. जसें, **क्री** उ. धातूंचीं वर्तमान प्र. पु. रूपें क्री+ना+ति=क्रीणाति (२३), क्री+ना+तः=क्री+नी+तः=क्रीणीतः, क्री+ना+अन्ति क्री+न्+अन्ति= क्रीणन्ति.

या गणांतील व्यंजनान्त धातूंना लागलेल्या ना विकरणाला आज्ञार्थ म. पु. ए. हि प्रत्ययापूर्वी आन असा आदेश होतो व हि प्रत्ययाचा लोप होतो. जसें, **मुष्** प.–मुषाण.

या गणांतील ई, ऊ किंवा ॠ अन्तीं असणाऱ्या बऱ्याच धातूंचा अन्त्य स्वर ह्रस्व होतो. जसें, **ली** प.–लिनाति, इ. **पू** उ.– पुनाति, पुनीते, इ. **गॄ** प.–गृणाति.

या गणांतील बन्ध्, स्तम्भ्, मन्थ् इत्यादि कांहीं धातूंच्या उपान्त्य अनुनासिकाचा लोप होतो. जसें, **बन्ध्** प.–बध्नाति; **स्तम्भ्** प.–स्तभ्नाति; **मन्थ्** प.–मथ्नाति.

तसेंच कांहीं धातूंना विशिष्ट आदेश होतात. जसें, **ज्ञा** ला जा, **ग्रह्** ला गृह्, इ. **ज्ञा**–जानाति; **ग्रह्**–गृह्णाति.

## क्री उ. विकत घेणें

### वर्तमानकाळ

| परस्मैपद | | | आत्मनेपद | | |
|---|---|---|---|---|---|
| क्रीणाति | क्रीणीतः | क्रीणन्ति | क्रीणीते | क्रीणाते | क्रीणते |
| क्रीणासि | क्रीणीथः | क्रीणीथ | क्रीणीषे | क्रीणाथे | क्रीणीध्वे |
| क्रीणामि | क्रीणीवः | क्रीणीमः | क्रीणे | क्रीणीवहे | क्रीणीमहे |

### अनद्यतनभूतकाळ

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अक्रीणात् | अक्रीणीताम् | अक्रीणन् | अक्रीणीत | अक्रीणाताम् | अक्रीणत |
| अक्रीणाः | अक्रीणीतम् | अक्रीणीत | अक्रीणीथाः | अक्रीणाथाम् | अक्रीणीध्वम् |
| अक्रीणाम् | अक्रीणीव | अक्रीणीम | अक्रीणि | अक्रीणीवहि | अक्रीणीमहि |

### आज्ञार्थ

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| क्रीणातु | क्रीणीताम् | क्रीणन्तु | क्रीणीताम् | क्रीणाताम् | क्रीणताम् |
| क्रीणीहि | क्रीणीतम् | क्रीणीत | क्रीणीष्व | क्रीणाथाम् | क्रीणीध्वम् |
| क्रीणानि | क्रीणाव | क्रीणाम | क्रीणै | क्रीणावहै | क्रीणामहै |

### विध्यर्थ

क्रीणीयात् क्रीणीयाताम् क्रीणीयुः, क्रीणीत क्रीणीयाताम् क्रीणीरन्, इ.

**ज्ञा ( जा )** उ. जाणणें—जानाति जानीतः जानन्ति; जानीते जानाते जानते; अजानात् अजानीताम् अजानन्; अजानीत अजानाताम् अजानत; जानातु जानीताम् जानन्तु, जानीहि; जानीताम् जानाताम् जानताम्, इ. जानीयात्, इ.; जानीत. इ.

**ग्रह् ( गृह् )** उ. घेणें—गृह्णाति गृह्णीतः गृह्णन्ति; गृह्णीते गृह्णाते गृह्णते, इ.; अगृह्णात् अगृह्णीताम् अगृह्णन्, इ.; अगृह्णीत अगृह्णाताम् अगृह्णत, इ.; गृह्णातु गृह्णीताम् गृह्णन्तु, गृहाण इ.; गृह्णीयात्, इ.; गृह्णीत, इत्यादि.

**बन्ध् ( बध् )** प. बांधणें—बध्नाति बध्नीतः बध्नन्ति; अबध्नात् अबध्नीताम् अबध्नन्; बध्नातु बध्नीताम् बध्नन्तु, बधान; बध्नीयात् इ.

**लू ( लु )** उ. कापणें—लुनाति लुनीतः लुनन्ति; अलुनात् अलुनीताम् अलुनन्; लुनातु लुनीताम् लुनन्तु, लुनीहि; लुनीयात्, इ.

## गणनिरपेक्षकाळ व अर्थ

१६९. परोक्षभूतकाळ, अनद्यतन भविष्यकाळ, सामान्य भविष्यकाळ क्रियातिपत्त्यर्थ, सामान्य भूतकाळ व आशीर्वादार्थ या काळीं व अर्थीं धातूंना पुरुषवाचक प्रत्ययांपूर्वीं गणविकरणें लागत नाहींत; म्हणून हे काळ व अर्थ गणनिरपेक्ष आहेत ( १२६ ).

**१७०. गणसापेक्ष काळ व अर्थ यांच्या व वर्तमान धातुसाधिताच्या प्रत्ययांखेरीज कोणत्याही प्रत्ययापूर्वीं धातूंतील अन्त्य ए, ऐ व ओ यांना आ आदेश होतो.** जसें, धे–धा; गै–गा, ध्यै–ध्या; सो–सा. ( **आदेच उपदेशेऽशिति ।** )

१७१. धातूंचीं गणनिरपेक्ष काळीं व अर्थीं रूपें करतांना आणि धातुसाधितें बनवितांना बहुतेक धातूंना लागणाऱ्या व्यंजनादि ( यकारादि प्रत्यय सोडून ) प्रत्ययामागें इ ( इट् ) आगम होतो त्यांना ‘ सेट् ’ ( स + इट्= इ आगम होणारे ) धातु म्हणतात. कांहीं धातूंना हा इ आगम होत नाहीं. त्यांना ‘ अनिट् ’ ( अन् + इट् = इ आगम न होणारे ) धातु म्हणतात. व कांहीं थोड्या धातूंना हा इ आगम विकल्पानें होतो त्यांना ‘ वेट् ’ ( वा + इट् = इ आगम विकल्पानें होणारे ) धातु म्हणतात. विशिष्ट प्रसंगीं अनिट् धातु सेट् होतात व सेट् धातु अनिट् होतात. ते त्या त्या स्थळीं सांगितले आहेत.

अनिट् व वेट् धातूंची यादी पुढें दिली आहे; ते सोडून बाकीचे धातु सेट् आहेत.

( १ ) ऊदृदन्तैर्यौतिरुक्ष्णुशीस्नुनुक्षुश्विडीङ्श्रिभिः ।
वृङ्वृञ्भ्यां च विनैकाचोऽजन्तेषु निहताः स्मृताः ॥

अन्तीं ऊ व ॠ असणारे धातु, तसेच यु, रु, क्ष्णु, शी, स्नु, नु, क्षु, श्वि, डी, श्रि, वृ ९ आ. आणि वृ ५ उ. हे धातु खेरीजकरून बाकीचे सर्व एकाक्षरी स्वरान्त धातु अनिट् (=निहत ) आहेत. अनेकाक्षरी धातु सेट् असतात.

(२) शक्लृ पच् मुचि रिच् वच् विच् सिच् प्रच्छि त्यज् निजिर् भजः ।
भञ्ज् भुज् भ्रस्ज् मस्जि यज् युज् रुज् रञ्ज् विजिर् स्वञ्जि सञ्ज् सृजः ॥

अद् क्षुद् खिद् छिद् तुदि नुदः पद्य भिद् विद्यतिर् विनद् । शद् सदी स्विद्यतिः स्कन्दि हदी क्रुध् क्षुधिबुध्यती ॥ बन्धिर् युधि रुधी राधि व्यध् शुधः साधिसिध्यती । मन्य हन् आप् क्षिप् छुपि तप् तिपस्तृप्यतिदृप्यती ॥ लिप् लुप् वप् शप् स्वप् सृपि यभ् रभ् लभ् गम् नम् यमो रमिः । क्रुशिर् दंशि दिशी दृश् मृश् रिश् रुश् लिश् विश् स्पृशः कृषिः ॥ त्विष् तुष् द्विष् दुष् पुष्य पिष् विष् शिष् शुष् श्लिष्यतयो घसिः । वसतिर् दह् दिहि दुहो नह् मिह् रुह् लिह् वहिस्तथा ॥ अनुदात्ता हलन्तेषु धातवो द्व्यधिकं शतम् । व्यंजनान्त धातूंपैकीं ह्या कारिकांमध्यें दिलेले १०२ धातु अनिट् (=अनुदात्त) आहेत. बाकीचे सेट् आहेत. ह्या कारिकांत वृत्ताच्या सोयीसाठीं कांहीं धातूंना इ जोडला आहे व कांहींना गणविकरण व ति जोडले आहेत.

( ३ ) सू २,४ आ. धू, स्यन्द्, क्षम्, नश्, द्रुह्, मुह्, स्निह् इत्यादि कांहीं धातु वेट् आहेत.

## परोक्षभूतकाळ

१७२. प्रत्यय

| | परस्मैपद | | | आत्मनेपद | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | ए. | द्वि. | ब. | ए. | द्वि. | ब. |
| प्र. | अ | अतुस् | उस् | ए | आते | इरे |
| म. | थ | अथुस् | अ | से | आथे | ध्वे |
| उ. | अ | व | म | ए | वहे | महे |

१७३. हे प्रत्यय लागतांना बहुतेक धातूंचें द्वित्व होऊन अंग बनतें. द्वित्वासंबंधाचे **सामान्य नियम** ( १५८ ) मध्यें दिले आहेत. ज्या धातूंचें द्वित्व न होतां निराळ्या प्रकारें अंग बनतें ते ( १८० ) मध्यें दिले आहेत.

( अ ) वरील प्रत्ययांपैकीं फक्त परस्मैपदी एकवचनी तीन प्रत्यय विकारक असून बाकीचे सर्व अविकारक आहेत. विकारक प्रत्यय लागतांना धातूंतील अन्त्य ह्रस्व किंवा दीर्घ इ, उ, ऋ ची व उपान्त्य अ ची वृद्धि होते, आणि उपान्त्य ह्रस्व इ, उ, ऋ, ऌ चा गुण होतो.

(आ) परंतु म. पु. ए. थ प्रत्ययापूर्वी अन्त्य स्वराचा गुण होतो व उपान्त्य अ चा वृद्धि होत नाहीं. तसेंच उ. पु. ए. अ प्रत्ययापूर्वी अन्त्य स्वराची व उपान्त्य अ ची विकल्पानें वृद्धि होते; व वृद्धि होत नाहीं तेव्हां अन्त्य स्वराचा गुण होतो.

परोक्षभूतकाळाचीं प्रायः फक्त प्र. पु. चींच रूपें वाङ्मयांत येतात; म्हणून तेवढींच दिलीं आहेत.

**१७४. आकारान्त धातु**—आकारान्त धातूंना लागतांना प्र. पु. ए. अ प्रत्ययाला औ आदेश होतो, आणि अविकारक प्रत्ययांपूर्वी ह्या धातूंच्या अन्त्य आ चा लोप होतो. जसें, **दा**–ददा + अ = ददा + औ = ददौ (११). ददा + अतुस् = दद् + अतुस् = ददतुः. ( **आत औ णलः । आतो लोप इटि च ।** )

**दा** उ.–ददौ ददतुः ददुः, ददे ददाते ददिरे; **स्था** प.–तस्थौ तस्थतुः तस्थुः **ध्यै** प.–दध्यौ दध्यतुः दध्युः; **वा** प.–ववौ ववतुः ववुः. **ज्ञा** उ.–जज्ञौ जज्ञतुः जज्ञुः; जज्ञे जज्ञाते जज्ञिरे.

**१७५. इकारान्त व उकारान्त धातु**— इकारान्त व उकारान्त धातु चालतांना १३१ ( ३ ) व १५७ अ लागू होतात. जसें, **श्रि** + अ=शिश्रि + अ = शिश्रै + अ = शिश्राय ( १३ ); **श्रि** + अतुस् = शिश्रि + अतुस् = शिश्रिय् + अतुस् = शिश्रियतुः, **नी** - निनी + अतुस् = निन्यतुः.

**श्रि** उ. शिश्राय शिश्रियतुः शिश्रियुः; शिश्रिये शिश्रियाते शिश्रियिरे.

**नी** उ.—निनाय निन्यतुः निन्युः; निन्ये निन्याते निन्यिरे.

**क्री** उ.—चिक्राय चिक्रियतुः चिक्रियुः; चिक्रिये चिक्रियाते चिक्रियिरे.

**जि** प.—( जिगि असें अनियमित अंग होतें )–जिगाय जिग्यतुः जिग्युः.

**हु** प.—जुहाव जुहुवतुः जुहुवुः; **नु** प.–नुनाव नुनुवतुः नुनुवुः.

**स्तु** उ.—तुष्टाव ( २४ ) तुष्टुवतुः तुष्टुवुः; तुष्टुवे तुष्टुवाते तुष्टुविरे.

**लू** उ. लुलाव लुलुवतुः लुलुवुः; **श्रु** प.—शुश्राव शुश्रुवतुः शुश्रुवुः.

**१७६. ऋकारान्त धातु**—धातूंतील अन्त्य ऋ च्या मागें जोडव्यंजन असेल तर त्या ऋ चा व अन्त्य ऋ चा अविकारक प्रत्ययांपूर्वी गुण होतो. तसेंच जागृ, ऋ १ प. जाणें यांच्या अन्त्य ऋ चा व ऋच्छ् ६ प. च्या ऋ चा गुण होतो.

कृ उ.—चकार चक्रतुः चक्रुः; चक्रे चक्राते चक्रिरे. स्मृ प.—सस्मार सस्मरतुः सस्मरुः गृ प.—जगार जगरतुः जगरुः मृ (सामान्यभूत व आशीर्वादार्थ यांखेरीज इतर गणनिरपेक्ष काळीं प. होतो )—ममार मम्रतुः मम्रुः

## १७७. व्यजनान्त धातु

हस् प.—जहास जहसतुः जहसुः; शास्—प.—शशास शशासतुः शशासुः.
भिद् उ.—बिभेद बिभिदतुः बिभिदुः; बिभिदे बिभिदाते बिभिदिरे.
पुष् प.—पुपोष पुपुषतुः पुपुषुः दृश् प. ददर्श ददृशतुः ददृशुः.
दुह् उ.—दुदोह दुदुहतुः दुदुहुः; दुदुहे दुदुहाते दुदुहिरे.
पूर् आ.—पुपूरे पुपूराते पुपूरिरे.
क्लृप् आ.—चक्लृपे चक्लृपाते चक्लृपिरे.
सेव् आ.—सिषेवे ( २४ ) सिषेवाते सिषेविरे.

( अ ) ज्या धातूंमध्यें अ असून त्या अ च्या मागें व पुढें एकेकच व्यंजन असतें व आद्य व्यंजन 'अभ्यासांत' तसेंच राहतें, त्यांच्या 'अभ्यासा' चा अविकारक प्रत्ययांपूर्वी लोप होऊन धातूंतील अ चा ए होतो. परंतु वकारादि धातूंना हा नियम लागू नाहीं. जसें,

तन् + अतुस् = ततन् + अतुस् = तेन् + अतुस् = तेनतुः; तन् + उस् = तेनुः.

तन् उ.—ततान तेनतुः तेनुः; तेने तेनाते तेनिरे.
पत् प. पपात पेतुतः पेतुः; चर् प.—चचार चेरतुः चेरुः
नश् प.—ननाश नेशतुः नेशुः पद् आ. पेदे पेदाते पेदिरे.
पण गद्—जगाद जगदतुः जगदुः; नन्द् पं.—ननन्द ननन्दतुः ननन्दुः; वम् प. ववाम ववमतुः ववमुः.

अपवाद. तॄ, फल्, भज्, त्रप्, राध् या धातूंनाहि वरील नियम लागतो आणि जॄ भ्रम्, त्रस्, फण्, राज्, भ्राज्, भ्लाश्, स्वन् या धातूंना विकल्पानें लागतो. जसें, तॄ + अतुस् = ततॄ + अतुस् = ततर् + अतुस् (१७६). तेर् + अतुस् = तेरतुः; तॄ—ततार तेरतुः तेरुः; भज्—बभाज भेजतुः भेजुः; त्रप् आ.—त्रेपे त्रेपाते त्रेपिरे; भ्रम्—बभ्राम बभ्रमतुः–भ्रेमतुः बभ्रमुः–भ्रेमुः; राज्—रराज रराजतुः–रेजतुः रराजुः रेजुः.

**(आ) स्वरादि व्यंजनान्त धातु**–(१) 'अभ्यासांत' आरंभीं अ असेल तर त्याचा आ होतो. जसें, अट्+अ = अट्अट् + अ = अअट् + अ = आ अट्+ अ = आ आट् + अ (१७३ अ) = आट् + अ (९) = आट; अट् + अतुस् = आटतुः. (अट्अट्–अ अट्–आ अट् आट्).

अद् प.–आद आदतुः आदुः १७९ (इ) पहा.

अश् ९ प. खाणें–आश आशतुः आशुः.

अन् प.–आन आनतुः आनुः, अस् २, ४ प.–आस आसतुः आसुः.

(२) अन्तीं जोडव्यंजन असणारे अकारादि धातु, तसेंच ऋकारादि धातु व अश् व्यापणें यांच्या 'अभ्यासा' पुढें न् आगम होतो. जसें, अर्ह् + अ = अर्ह् अर्ह् + अ = अ अर्ह् + अ = आ अर्ह् + अ = आन् अर्ह् + अ = आनर्ह आनर्हतुः आनर्हुः.

अञ्ज् प.–आनञ्ज आनञ्जतुः आनञ्जुः; अर्द् प.–आनर्द आनर्दतुः आनर्दुः; ऋध् व.–आनर्ध आनृधतुः आनृधुः, ऋज् आ.–आनृजे आनृजाते आनृजिरे; अश् ५ आ.–आनशे आनशाते आनशिरे.

ऋच्छ् प.–आनर्च्छ आनर्च्छतुः आनर्च्छुः

आप् प.–आप आपतुः आपुः

**(३) इकारादि व उकारादि व्यंजनान्त धातु**–अभ्यासांतील इ च्या व उ च्या पुढें असवर्ण स्वर आला तर त्यांना अनुक्रमें इय् व उव् आदेश होतात. जसें, इष् + अ = इष् इष् + अ = इ इष् + अ = इ एष् + अ = इय् + एष् + अ = इयेष, इष् + अतुस् = इइष् + अतुस् = ईष् + अतुस् (९) = ईषतुः

उष् प.–उष्उष् + अ = उउष् + अ = उओष् + अ = उव् ओष् + अ = उवोष; पण उउष + अतुस् = ऊष् + अतुस् = ऊषतुः.

इष् प.–इयेष ईषतुः ईषुः; उष् प.–उवोष ऊषतुः ऊषुः; इ.

१७८. यज्, वद्, वच्, वह्, व्यध्, स्वप्, ग्रह् इत्यादि कांहीं धातूंतील य्, व्, र् यांना अविकारक प्रत्ययांपूर्वी संप्रसारण होतें, म्हणजे त्यांबद्दल अनुक्रमें इ, उ, ऋ आदेश होतात (६) व संप्रसारणाच्या पुढील स्वराचा लोप

होतो. जसें, यज् – इअज्–इज्, वच् – उअच् –उच्, स्वप्—सुप्, ग्रह् –गृह्. जेथें दोन वर्णांचें संप्रसारण एकदम संभवेल तेथें पहिल्याचें न होतां दुसऱ्याचें होतें. जसें व्यध् – व इ अध्–विध्.

यज् + अतुस् = इज्इज् + अतुस् = इइज् + अतुस् = ईज् + अतुस् = ईजतुः.

( अ ) वरील धातूंना परोक्षभूतकाळाच्या विकारक प्रत्ययांपूर्वी फक्त अभ्यासांत सम्प्रसारण होतें. जसें, वच् + अ = ववच् + अ = उवच्+अ = उवाच् + अ = उवाच.

वच् प.–उवाच ऊचतुः ऊचुः; यज् उ.–इयाज ईजतुः ईजुः, इजे इ.

स्वप् प.–सुष्वाप सुषुपतुः सुषुपुः; वस् १ प.–उवास ऊषतुः ऊषुः

ग्रह् उ. जग्राह जगृहतुः जगृहुः; जगृहे जगृहाते जगृहिरे.

व्यध् प.–विव्याध विविधतुः विविधः

पण वस् २ आ.–ववसे ववसाते ववसिरे; व्रज् प.-वव्राज वव्रजतुः वव्रजुः. व्यथ् आ. चें सर्व प्रत्ययांपूर्वी फक्त अभ्यासांत संप्रसारण होतें; विव्यथे विव्यथाते विव्यथिरे.

ह्वे उ. चें सर्व प्रत्ययांपूर्वी संप्रसारण होऊन जुहु असें अंग होतें व श्वि चें शु असें संप्रसारण होऊन शुशु असें अंग विकल्पानें होतें.

ह्वे–जुहाव जुहुवतुः जुहुवुः; जुहुवे जुहुवाते जुहुविरे.

श्वि—शिश्वाय-शुशाव शिश्वियतुः-शुशुवतुः शिश्वियुः-शुशुवुः.

१७९. अनियमित. ( अ ) भू चें बभूव् असें अंग होतें. बभूव बभूवतुः बभूवुः.

( आ ) जि चें जिगि, हि चें जिघि, चि चें विकल्पानें चिकि, हन् चें जघन् अशीं परोक्षभूतकाळीं अंगें होतात.

( इ ) गम्, हन्, जन्, खन् व घस् ( अद् ला घस् असा विकल्पानें आदेश होतो ) या धातूंतील अ चा अविकारक प्रत्ययांपूर्वी लोप होतो.

गम्–जगाम जग्मतुः जग्मुः; हन्–जघान जघ्नतुः जघ्नुः

जन् आ.–जज्ञे जज्ञाते जज्ञिरे ( जजन् + ए = जज्न् + ए = जज्ञ्+ए (२०) = जज्ञे; अद् (घस्)-घस्+ अतुस्=जघस् + अतुस् = जघ्स् + अतुस् =जक्स् + अतुस् ( १७ )= जक्ष् + अतुस् ( २४ ) = जक्षतुः

( ई ) परोक्षभूतांत ब्रू ला वच् आणि अस् ला भू आदेश होतात.

( उ ) इ २ प. धातूच्या अभ्यासांतील इ अविकारक प्रत्ययांपूर्वीं दीर्घ होतो. इ २ प.–इयाय ईयतुः ईयुः

( ऊ ) अधि + इ आ. ला गा आदेश होतो. अधिजगे अधिजगाते अधिजगिरे.

१८०.इ पासून औ पर्यंतच्या स्वरांपैकीं कोणताही गुरु[1] स्वर ज्यांच्या आरंभीं आहे अशा ( ऋच्छ् खेरीज ) धातूंचें परोक्षभूतकाळाचें अंग आम् प्रत्यय लागून बनतें व या अंगाला भू किंवा अस् धातूचीं परोक्षभूताचीं रूपें जोडलीं म्हणजे धातूंचीं परोक्षभूताचीं रूपें होतात. अनेकाक्षरी धातु, दहाव्या गणाचे धातु व साधित धातु ( १२५ ) ह्यांचींहि परोक्षभूताचीं रूपें वरीलप्रमाणेंच बनतात.

आत्मनेपदी धातूंना कृ चीं आत्मनेपदी रूपें जोडतात व परस्मैपदी धातूंना कृ चीं परस्मैपदी रूपें जोडतात.

आम् प्रत्ययापूर्वीं धातूंतील अन्त्य ऱ्हस्व किंवा दीर्घ इ, उ, ऋ चा व उपान्त्य ऱ्हस्व इ, उ, ऋचा गुण होतो. विद् चा मात्र होत नाहीं.

कांहीं धातूंचीं रूपें नमुन्याकरितां पुढें दिलीं आहेतः—

इन्ध् आ. इन्धांचक्रे इन्धांचक्राते इन्धांचक्रिरे, इन्धांबभूव-इन्धामास, इ.

ईक्ष् आ. ईक्षांचक्रे ईक्षांचक्राते ईक्षांचक्रिरे, ईक्षांबभूव–ईक्षामास, इ.

उक्ष् प. उक्षांचकार उक्षांचक्रतुः उक्षांचक्रुः, उक्षांबभूव–उक्षामास, इ.

एध् आ.–एधांचक्रे–एधांबभूव–एधामास, इत्यादि.

चकास् प.–चकासांचकार–चकासांबभूव–चकासामास, इत्यादि.

---

१. दीर्घस्वर व जोडव्यंजनापूर्वीचा ऱ्हस्व स्वर यांस गुरु म्हणतात.

चुर् १० प.–चोरयांचकार–चोरयांबभूव–चोरयामास, इत्यादि.

कृ (प्रयोजक)–कारयामास–कारयांबभूव–कारयांचकार, इ.

(अ) दय्, अय्, कास् व आस् (सर्व आत्मनेपदी) या धातूंचीं परोक्षभूताचीं रूपें आम् प्रत्यय लागून बनतात. जसें. दय्–दयांचक्रे–दयांबभूव–दयामास, इ.

(आ) उष्, विद् व जागृ यांना विकल्पानें आम् लागतो. जसें, उष्–ओषांचकार–ओषांबभूव–ओषामास, इ.; विद्–विदांचकार–बभूव–आस, इ. जागृ–जागरांचकार–बभूव–आस, इ. शिवाय यांचीं उवोष ऊषतुः ऊषुः, (१७७ आ (३)) विवेद विविदतुः विविदुः, जजागार जजागरतुः जजागरुः अशीं रूपें होतात.

(इ) भी, ह्री, भृ आणि हु यांचीं रूपेंहि विकल्पानें आम् प्रत्यय लागून बनतात; परंतु यांचें अंग गणसापेक्ष काळांप्रमाणेंच बनतें; नंतर त्याला आम् प्रत्यय लागतो. जसें,

भी – बिभी + आम् + चकार = बिभयांचकार; ह्री-जिह्रयांचकार; भृ–बिभरांचकार; हु–जुहवांचकार. यांशिवाय बिभाय बिभ्यतुः बिभ्युः, जिह्राय जिह्रियतुः जिह्रियुः, बभार बभ्रतुः बभ्रुः, जुहाव जुहुवतुः जुहुवुः अशीं रूपें होतात.

## अनद्यतन भविष्यकाळ

१८१. प्रत्यय

| | परस्मैपद | | | आत्मनेपद | | |
|---|---|---|---|---|---|---|
| प्र. | ता | तारौ | तारः | ता | तारौ | तारः |
| म. | तासि | तास्थः | तास्थ | तासे | तासाथे | ताध्वे |
| उ. | तास्मि | तास्वः | तास्मः | ताहे | तास्वहे | तास्महे |

१८२. हे प्रत्यय विकारक आहेत. म्हणून धातूंतील अन्त्य ह्रस्व किंवा दीर्घ इ, उ, ऋ चा व उपान्त्य ह्रस्व इ, उ, ऋ, ऌ चा गुण होतो.

१८३. सेट् धातूंना लागतांना ह्या प्रत्ययांमागें इ आगम होतो व वेट् धातूंना लागतांना इ आगम विकल्पानें होतो.

भू–भविता भवितारौ भवितारः, भवितासि भवितास्थः भवितास्थ, भवितास्मि भवितास्वः भवितास्मः; लिख्–लेखिता, लेखितासि, लेखितास्मि; रुद्–रोदिता, इ.

जि–जेता जेतारौ जेतारः; जेतासि जेतास्थः जेतास्थ, जेतास्मि, इ.

दा–प. दाता दातारौ दातारः, दातासि दातास्थः दातास्थ, इ; आ. दाता दातारौ दातारः, दातासे दातासाथे दाताध्वे, दाताहे दातास्वहे दातास्महे.

गै–गाता ( १७० ), गातासि, गातास्मि, कृ–कर्ता, कर्तासि, कर्तास्मि; गम्–गन्ता (२७); गन्तारौ गन्तारः, गन्तासि गन्तास्थः गन्तास्थ; गन्तास्मि इ.

**शब्दाच्या पोटांतील न्, म् चा ' झल् ' ( ३ ) पूर्वी अनुस्वार होतो.**

( अ ) इष्, सह्, लुभ्, रुष् व रिष् हे सेट् धातु ह्या काळीं विकल्पानें सेट् होतात. जसें, इष्–एषिता–एष्टा, एषितारौ–एष्टारौ, एषितारः–एष्टारः, इ. लुभ्–लोभिता–लोब्धा, लोभितासि–लोब्धासि इ.

**१८४. ऋकारान्त धातु व वृ यांना होणारा इ आगम परोक्षभूत, आशीर्वादार्थ आ. व सामान्यभूत प. यांखेरीज बाकीच्या गणनिरपेक्षकाळीं व अर्थीं विकल्पानें दीर्घ होतो.** जसें, तॄ--तरिता--तरीता, इ. वृ--वरिता--वरीता, इ. ग्रह् ला होणारा इ आगम परोक्षभूताखेरीज कोणत्याहि गणनिरपेक्ष काळीं व अर्थीं दीर्घ होतो. जसें, ग्रहीता, ग्रहीतासि, ग्रहीतास्मि इ.

अनियमित. नश्--नशिता--नंष्टा, इ. मस्ज्--मङ्क्ता इ.

**१८५. उपान्तीं ऋ असणाऱ्या अनिट् धातूंतील ऋ चा अनुनासिक व अन्तःस्थ यांखेरीज कोणतेंही व्यंजन आरंभीं असणारा विकारक प्रत्यय लागतांना विकल्पानें र होतो. आणि सृज् व दृश् यांतील ऋचा नित्य र होतो. ( अनुदात्तस्य च ऋदुपधस्यान्यतरस्याम् । )**

जसें; स्पृश + ता =स्प्रश् + ता =स्प्रष् + ता ( ६८ अ ) स्प्रष् + टा (२२) = स्प्रष्टा, स्पर्ष्टा. सृज्–स्रष + ता ( ६८ अ ) स्रष्टा (२०). तृप् (वेट्)–त्रप्ता–तर्प्ता–तर्पिता, इ.

१८६. सह् व वह् चा (७०) प्रमाणें ढ् होऊन त्या ढ् चा जेव्हां लोप होतो तेव्हां धातूंतील अ चा ओ होतो. जसें, सह् + ता = सढ् + ता (७०) = सढ् + धा (१९) = सढ् + ढा (२०) = स + ढा (३१) = सोढा, सोढारौ सोढारः, सोढासे इ. तसेंच वह्-वोढा, वोढासि, वोढास्मि.

## सामान्य भविष्यकाळ

१८७. ह्या काळीं धातूंना स्य विकरण लागून त्यांचें अंग अकारान्त बनतें व पहिल्या गणांतील धातूंच्या वर्तमानकाळाच्या रूपांप्रमाणें रूपें होतात. स्य विकरण विकारक आहे म्हणून धातूंतील अन्त्य ह्रस्व किंवा दीर्घ इ, उ, ऋ व उपान्त्य ह्रस्व इ, उ, ऋ, ऌ यांचा गुण होतो.

**१८८. धातूच्या अन्त्य स् चा, पुरुषवाचक प्रत्यय, गणविकरणें आणि वर्तमानधातुसाधितांचे प्रत्यय खेरीज करून कोणत्याहि स् कारादि प्रत्ययापूर्वी, त् होतो.** जसें, वस् प.-वस्+स्य-वत्स्य-वत्स्यति.

१८९. सेट् धातूंना स्य विकरणामागें इ आगम होतो व वेट् धातूंना विकल्पानें होतो.

भू-भविष्यति भविष्यतः भविष्यन्ति, भविष्यसि भविष्यथः भविष्यथ, भविष्यामि भविष्यावः भविष्यामः.

जि-जेष्यति जेष्यतः जेष्यन्ति, इ. श्रु श्रोष्यति इत्यादि.

दा-दास्यति दास्यतः दास्यन्ति इ.; दास्यते दास्येते दास्यन्ते, दास्यसे, दास्येथे दास्यध्वे, दास्ये दास्यावहे दास्यामहे.

छिद् उ.-छेत्स्यति छेत्स्यतः छेत्स्यन्ति, छेत्स्यते इ. मुद्-मोदिष्यते, मोदिष्यसे, मोदिष्ये इ. वस् प.-वत्स्यति वत्स्यतः वत्स्यन्ति.

यज्-यक्ष्यति (६८ अ) यक्ष्यतः यक्ष्यन्ति, आ. यक्ष्यते, यक्ष्यसे, यक्ष्ये इत्यादि.

दृश्—द्रक्ष्यति (५८ अ); स्पृश्—स्प्रक्ष्यति—स्पर्क्ष्यति (१८५).

वह्—वक्ष्यति (७०, १४६, २४) वक्ष्यतः वक्ष्यन्ति इ.

वच्—वक्ष्यति (३२, ३४) वक्ष्यतः वक्ष्यन्ति इत्यादि.

तॄ—तरिष्यति—तरीष्यति, इ. ग्रह् उ.—ग्रहीष्यति—ते, इ.

दह्-धक्ष्यति ( ७० अ, ३४ ) धक्ष्यतः धक्ष्यन्ति, इत्यादि.

१९०. ऋकारान्त धातु व गम् ( परस्मैपदी असेल तेव्हांच ) आणि हन् हे अनिट् धातु ह्या काळीं सेट् होतात. जसें:—

कृ उ.- करिष्यति करिष्यतः करिष्यन्ति, इ; करिष्यते इत्यादि.

गम् प.-गमिष्यति, गमिष्यसि, गमिष्यामि, इ. पण सम् + गम् आ. संगंस्यते इत्यादि.

हन्—हनिष्यति हनिष्यसि हनिष्यामि, इ.

१९१. क्लृप्, वृत्, वृध्, शृधू व स्यन्द् हे धातु सामान्यभविष्य, क्रियातिपत्त्यर्थ व आशीर्वादार्थ यांमध्यें विकल्पानें परस्मैपदी होतात; व परस्मैपदी होतात तेव्हां त्यांना इ आगम होत नाहीं. जसें:—

क्लृप् ( वेट् )—कल्पिष्यते–कल्प्स्यते; कल्प्स्यति, इ.

वृत्—वर्तिष्यते--वर्त्स्यति, इ. वृध--वर्धिष्यते--वर्त्स्यति, इ.

अनियमित. नश्—नशिष्यति--नङ्क्ष्यति, इ. मस्ज्—मङ्क्ष्यति, इ.

## क्रियातिपत्त्यर्थ

१९२. सामान्य भविष्यकाळीं धातूंचें जें अंग बनतें तेंच क्रियातिपत्त्यर्थीहि बनतें व पहिल्या गणांतील धातूंच्या अनद्यतनभूताच्या रूपांप्रमाणें रूपें बनतात. जसें, भू--भविष्य- अभविष्यत्.

भू—अभविष्यत् अभविष्यताम् अभविष्यन्, अभविष्यः अभविष्यतम् अभविष्यत, अभविष्यम् अभविष्याव अभविष्याम.

कृ—अकरिष्यत् अकरिष्यताम् अकरिष्यन्, इ.; अकरिष्यत अकरिष्येताम् अकरिष्यन्त, इ.

आप्—आप्स्यत्, आप्स्यः, आप्स्यम्, इ.

ईक्ष्—ऐक्षिष्यत–११३ ( ३ ) ऐक्षिष्येताम् ऐक्षिष्यन्त, इ.

## सामान्यभूतकाळ

१९३. अनद्यतन भूतकाळाप्रमाणेंच ह्या काळींहि धातूच्या मागें अ (आ) आगम (नियम १२२ पहा.) लागतो. ह्या काळीं कांहीं धातूंचें अंग अका-

रान्त बनतें व कांहींचें अकारान्ताहून भिन्न बनतें. तेव्हां येथें अकारान्त अंगाचे व अकारान्ताहून भिन्न अंगाचे असे धातूंचे दोन वर्ग होतात. पहिल्या वर्गांत, अ ( अङ् ) विकरणात्मक, अ ( चङ् ) विकारणात्मक आणि स ( क्स ) विकारणात्मक धातूंचा अन्तर्भाव होतो व दुसऱ्या वर्गांत स् ( सिच् ) विकरणात्मक धातु येतात.

## पहिला वर्ग ( अकारान्त अंगाचा )

**१९४. अ ( अङ् ) विकरणात्मक धातु**—या प्रकारांतील धातूंना अ ( अङ् ) विकरण लागून अंग बनतें व पृष्ठ ६४ वरील अनद्यतनभूत काळाचे प्रत्यय लागून सहाव्या गणांतील धातूंच्या अनद्यतनभूताच्या रूपांप्रमाणें रूपें होतात. थोडे अपवाद सोडून हा प्रकार परस्मैपदी आहे.

ह्या विकरणापूर्वी धातूंतील उपान्त्य अनुनासिकाचा लोप होतो.

( अ ) पुष्, तुष्, शुष्, सिध्, नश्, अस् ( अस्थ् ), शम् इत्यादि चतुर्थ गणांतील कांहीं धातूंना हें विकरण लागतें.

( आ ) द्युत्, रुच्, शुभ्, स्रंस्, वृत्, वृध्, ध्वंस्, भ्रंश्, क्षुभ् स्पन्द्, क्लृप् व स्विद् हे पहिल्या गणांतील आत्मनेपदी धातु सामान्य भूतकाळीं विकल्पानें परस्मैपदी होतात व तेव्हां त्यांना हें विकरण लागतें.

( इ ) आप्, गम्, पिष्, मुच्, विद् ६, पत् ( पप्त् ), सद्, शास् (शिष् ), सृप् इत्यादि कांहीं धातूंना हें विकरण लागतें.

( ई ) दृश् ( दर्श् ), रुद्, छिद्, रुध्, भिद्, युज्, स्तम्भ्, स्कन्द्, श्वि ( श्व् ) इत्यादि कांहीं धातूंना परस्मैपदामध्यें हें विकरण विकल्पानें लागतें.

( उ ) वच् ( वोच् ), ख्या ( ख्य् ), अस् ( अस्थ् ) यांना दोनहि पदांमध्यें हें विकरण लागतें.

( ऊ ) लिप्, सिच्, ह्वे ( ह्व ) यांना परस्मैपदांत नित्य व आत्मनेपदांत विकल्पानें हें विकरण लागतें.

**पुष्**—अपुषत् अपुषताम् अपुषन् १३३ ( १ ), अपुषः अपुषतम् अपुषत, अपुषम् अपुषाव १३३ ( १ ) अपुषाम; **स्रंस्**—अस्रसत्, इ.

**द्युत्**—अद्युतत् अद्युतताम् अद्युतन्; **वृत्**—अवृतत् अवृतताम् अवृतन्.

गम्=अगमत्; पत्—अपप्तत्; आप्—आपत्; शास्—आशिषत्; दृश्—अदर्शत्; अस् ४ प.—आस्थत्, निरास्थत्; वच् अवोचत्—अवोचत; ख्या—अख्यत्—अख्यत; सिच्—असिचत्—असिचत; ह्वे—अह्वत्—अह्वत.

१९५. अ ( चङ् ) विकरणात्मक धातु—दहाव्या गणाच्या धातूंना अ ( चङ् ) विकरण लागून अंग बनतें व पृष्ठ ६४ वरील अनद्यतनभूत काळाचे प्रत्यय लागतात. हें विकरण लागतांना इ प्रत्ययाचा ( पृष्ठ ६६ वरील टीप पहा; हा इ प्रत्यय विकारक आहे. अर्थात् कलम १३२ प्रमाणें धातूंत जे फेरफार व्हावयाचे ते होतातच. ) लोप होतो व धातूंतील उपान्त्य स्वर ऱ्हस्व होतो. ( ए, ऐ चा ऱ्हस्व इ आणि ओ औ चा ऱ्हस्व उ होय. ) नंतर धातूंचें द्वित्व होतें. कलम १५८ पहा.

१९६. अभ्यासाच्या पुढील स्वर लघु असेल तर अभ्यासामध्यें पुढील फेरफार होतातः—( १ ) अ चा इ होतो; व ( २ ) लघु स्वर दीर्घ होतो.

१९७. धातूंतील उपान्त्य ऋ विकल्पानें तसाच राहतो व तो दीर्घ असल्यास ऱ्हस्व होतो.

तड्—ताडि—ताड्—तड्—ततड्—तितड्—तीतड्; अ + तीतड् + अ + त् = अतीतडत्, अतीतडताम् अतीतडन् इत्यादि.

तिज्—तेजि—तेज्—तिज्—तितिज्—तीतिज्; अ + तीतिज् + अ + त् = अतीतिजत् इत्यादि.

चुर्—चोरि—चोर्—चुर्—चुचुर्—चूचुर्—अचूचुरत् इ.

धृ—धारि—धार्—धर्—दधर्—दिधर्—दीधर्—अदीधरत् इ.

पण दण्ड्—दण्डि—दण्ड्—ददण्ड्—अददण्डत्, इ.

मन्त्र्—अममन्त्रत; चिन्त्—अचिचिन्तत्; पूज्—अपुपूजत् इ.

मृष्—अमीमृषत्—त किंवा अममर्षत्—त; कृत्—अचीकृतत्—अचिकीर्तत्

१९८. १३२ ( १ ) नियमाखालीं येणाऱ्या धातूंतील स्वर तसाच राहतो. जसें, कथ्—अचकथत्, अपस्पृहत्.

१९९. श्रि, द्रु, स्रु ह्या धातूंना हें अ ( चङ् ) विकरण लागतें व धे, श्वि यांना विकल्पानें लागतें.

श्रि—अशिश्रियत् आशिश्रियताम् आशिश्रियन्, इ.

धे ( धा )-अदधत् अदधताम् अदधन्, श्वि–आशिश्वियत्, इ.

अनियमित-गण्–अजगणत्-अजीगणत्, पीड्–अपिपीडत् अपीपिडत्.

२००. धातु अनेकाक्षरी असून स्वरादि असल्यास त्याच्या दुसऱ्या अक्षराचें द्वित्व होतें. १५८ ( १ ) पहा. परंतु आद्य स्वरापुढें जोडव्यंजन असून त्यांतील पहिलें व्यंजन न्, द् किंवा र् असेल तर दुसऱ्या व्यंजनाचें पुढील स्वरासह द्वित्व होतें. ( नन्द्राः संयोगादयः । )

( अ ) १० व्या गणाचा धातु स्वरादि असल्यास त्याचीं सामान्य भूतकाळचीं रूपें बनतांना आधीं द्वित्व होऊन मग (१९५) मध्यें सांगितलेला इ चा लोप होतो. जसें, ईर्-ईरि-ईरिरि-ईरिर्-ऐरिरत्; अर्ज्-अर्जि-आर्जिजि-आर्जिज्-आर्जिजत्;. अर्ह्-आर्जिहत् १५८ ( ५ ).

२०१. स ( क्स ) विकरणात्मक धातु–अन्तीं श्, ष्, स्, ह् यांपैकीं कोणतेंही व्यंजन असून उपान्तीं इ, उ किंवा ऋ आहे अशा अनिट् धातूंनाच हें स (क्स) विकरण लागतें व (१३८) मध्यें दिलेल्या दुसऱ्या वर्गांतील गुणांना लागणारे अनद्यतनभूतकाळाचे प्रत्यय लागतात. फक्त आ. अत ऐवजीं अन्त लागतो.

( अ ) दृश् ला हें विकरण लागत नाहीं; आणि स्पृश्, कृष् व मृश् यांना विकल्पानें लागतें.

( आ ) दुह्, दिह्, लिह् व गुह् यांना दन्त्य व्यंजन आरंभीं असणारे प्रत्यय लागतांना स विकरणाचा विकल्पानें लोप होतो.

दिश् प.–अदिक्षत् ६८ अ, १३३ (२) अदिक्षताम् अदिक्षन्, अदिक्षः अदिक्षतम् अदिक्षत, अदिक्षम् अदिक्षाव अदिक्षाम; आ. अदिक्षत अदिक्षाताम् अदिक्षन्त, अदिक्षथाः अदिक्षाथाम् अदिक्षध्वम्, अदिक्षि[1] अदिक्षावहि अदिक्षामहि.

दुह्–प. अधुक्षत् अधुक्षताम् अधुक्षन्, इत्यादि; आ. अधुक्षत–अदुग्ध अधुक्षाताम् अधुक्षन्त, अधुक्षथाः–अदुग्धाः अधुक्षाथाम् अधुक्षध्वम् अधुग्ध्वम् ( ३४, ७० अ ), अधुक्षि अधुक्षावहि अधुक्षामहि.

---

१ या इ प्रत्ययापूर्वीं स तील अ चा लोप होतो.

## सामान्यभूत–दुसरा वर्ग (अकारान्ताहून भिन्न अंगाचा)

**२०२.** दुसऱ्या वर्गांत स् (सिच्) विकरणात्मक धातु येतात. कित्येक धातूंना हें विकरण लागून त्याचा लोप होतो व कांहींना हें लागतांना ह्यास सिस् असा आदेश होतो. तेव्हां लोप होणारे, सिस् आदेश होणारे व बाकीचे स् (सिच्) विकरणात्मक असे या वर्गांतील धातूंचेहि तीन प्रकार होतात.

या वर्गांतील धातूंना दुसऱ्या वर्गाचे अनद्यतनभूतकाळाचे प्रत्यय (१३८) लागतात. फक्त प. अन् ऐवजीं उस् लागतो.

**२०३ स् विकरणाचा लोप होणारे धातु**–हा प्रकार परस्मैपदी आहे. उस् पूर्वी धातूंतील अन्त्य आ चा लोप होतो.

पा (पिणें), स्था, भू, इ २ प. (गा), दा, धा व दा धा अशीं रूपें होणारे (दा कापणें व दै सोडून) धातु यांना स् विकरण लागून त्याचा लोप होतो आणि घ्रा, धे, सो, छो व शो यांना लागणाऱ्या स् चा विकल्पानें लोप होतो.

**पा** (पिणें)—अपात् अपाताम् अपुः, अपाः अपातम् अपात, अपाम् अपाव अपाम. **दा**-अदात्, इ. **स्था**-अस्थात् इ. इ २ प. (**गा**) अगात्, इ.

**घ्रा**–अघ्रात्, इ. **धे**–धा–अधात्, इ.

**भू** ला स्वरादि प्रत्ययापूर्वी व् आगम होतो व अन् चा उस् होत नाहीं.

अभूत् अभूताम् **अभूवन्**, अभूः अभूतम् अभूत, **अभूवम्** अभूव अभूम.

**२०४. सिस् विकरणात्मक धातु**–हा प्रकार परस्मैपदी आहे. कलम २३३ मधील आकारान्त धातूंखेरीज इतर सर्व आकारान्त धातु आणि यम् रम् व नम् ह्यांना स् ऐवजीं सिस् विकरण लागतें.

**२०५.** ह्या व पुढील प्रकारांतील धातूंना त् व स् हे प्रत्यय लागतांना त्यापूर्वी ई लागून ते ईत् व ईस् होतात व त्यांच्यापूर्वी सिस् च्या स् चा लोप होतो. जसें **या** – अ + या + सिस् + ईत् = अयासि + ईत् = अयासीत्.

**या**–अयासीत् अयासिष्टाम् (२४, २०). अयासिषुः, अयासीः अयासिष्टम् अयासिष्ट, अयासिषम् अयासिष्व अयासिष्म.

वि + **रम्** प. व्यरंसीत् व्यरंसिष्टाम् व्यरंसिषुः इ. **रम्** प्रमाणेंच यम् आणि नम् चालतात.

**२०६. स् विकरणात्मक धातु**–मागील पांचहि प्रकारांमध्यें न आलेले धातु या प्रकारांत येतात. तसेंच पूर्वींच्या प्रकारांमध्यें विकल्पानें आलेल्या धातूंचीं रूपें त्या त्या प्रकाराप्रमाणें होऊन शिवाय ह्या शेवटल्या प्रकाराप्रमाणेंहि होतात. त्याचप्रमाणें पूर्वींच्या प्रकारांमध्यें फक्त परस्मैपदांत येणारे किंवा आत्मनेपदांत विकल्पानें येणारे धातु आत्मनेपदांत या प्रकारांत नित्य येतात. ह्या स् विकरणापूर्वीं सेट् धातूंना इ आगम नित्य होतो व वेट् धातूंना विकल्पानें होतो.

२०७. ह्या स् विकरणामागें ह्रस्व स्वर असून पुढें अनुनासिक आणि अन्तःस्थ यांखेरीज कोणतेंहि व्यंजन आल्यास त्या स् चा लोप होतो. जसें, कृ–आत्मनेपदी प्र. पु. ए. अ + कृ + स् + त = अकृत.

२०८. स् विकरणामागें व पुढें अनुनासिक आणि अन्तःस्थ यांखेरीज कोणतेंहि व्यंजन आल्यास त्या स् चा लोप होतो. जसें क्षिप्-.आत्मनेपदी म. पु. ए. अ + क्षिप्+स्+थास्=अक्षिप्थाः; पण कृ–परस्मैपदी म. पु. द्वि. अ+ कृ + स् + तम् = अकार् + स् + तम् = अकार्ष्टम् ( २०९, २४, २०. )

२०९. परस्मैपदी प्रत्ययांपूर्वीं (१) अनिट् धातूंतील स्वराची वृद्धि होते, (२) सेट् धातूंतील अन्त्य ह्रस्व किंवा दीर्घ इ, उ, ऋ ची वृद्धि होते व उपान्त्य ह्रस्व इ, उ, ऋ चा गुण होतो. (३) र्‌कारान्त व ल्‌कारान्त सेट् धातु आणि वद्, व्रज् हे सेट् धातु यांतील उपान्त्य अ ची वृद्धि होते, (४) व्यंजनादि सेट् धातूंच्या अन्तीं र् व ल् खेरीज कोणतेंहि व्यंजन असेल तर त्यांतील उपान्त्य अ ची विकल्पानें वृद्धि होते, जसें:—

(१) जि-अजैषीत् अजैष्टाम् अजैषुः, अजैषीः अजैष्टम् अजैष्ट, अजैषम् अजैष्व अजैष्म; नी अनैषीत् अनैष्टाम् अनैषुः इ.; श्रु–अश्रौषीत् अश्रौष्टाम् अश्रौषुः, इ.; कृ–अकार्षीत् अकार्ष्टाम् अकार्षुः इ.; छित्-अछैत्सीत् अच्छैत्ताम् अछैत्सुः इ.; रुध्–अरौत्सीत् अरौत्ताम् [ २०८, १७ ] अरौत्सुः इ.; स्वप्-अस्वाप्सीत् अस्वाप्ताम् आस्वाप्सुः इ.; दह्- अधाक्षीत् [२४, ७० अ, २४ ] अदाग्धाम् अधाक्षुः इ.; भञ्ज् अभाङ्क्षीत् अभाङ्क्ताम् अभङ्क्षुः इ.; बंन्ध् अभान्त्सीत् [ ७० अ, १७ ] अबान्द्धाम् [ १९, १७ ] अभान्त्सुः

इ.; वस्- अवात्सीत् [ १८८ ] अवात्ताम्. [ १८८, २०८ ] अवात्सुः इ.; प्रच्छ् अप्राक्षीत् [ ६८ अ, १४६, २४ ] अप्राष्टांम् [ ६८ अ, २० ] अप्राक्षुः इ.; दृश्--अद्राक्षीत् [ १८५ ] अद्रांष्टाम् अद्राक्षुः इ.; स्पृश्--अस्प्राक्षीत्--अस्पार्क्षीत् [ १८५ ] अस्प्राष्टाम्--अस्पार्ष्टाम् अस्प्राक्षुः--अस्पार्क्षुः इ.;

( २ ) यु--अयावीत् अयाविष्टाम् अयाविषुः इ.; लू- अलावीत् अलाविष्टाम् अलाविषुः इ.; वृ--अवारीत् अवारिष्टाम् अवारिषुः इ.; तृ- अतारीत् अतारिष्टाम् अतारिषुः इ.;

बुध्-अबोधीत् अबोधिष्टाम् अबोधिषुः इ.; नृत् -अनर्तीत् अनर्तिष्टाम् अनर्तिषुः इ.; लिख्--अलेखीत् अलेखिष्टाम् अलेखिषुः इ.;

( ३ ) ज्वल्--अज्वालीत् अज्वालिष्टाम् अज्वालिषुः इ.; क्षर्- अक्षारीत् अक्षारिष्टाम् अक्षारिषुः इ.; वद् अवादीत् अवादिष्टाम् अवादिषुः इ.;

( ४ ) पठ्--अपठीत्--अपाठीत् अपठिष्टाम्- अपाठिष्टाम् अपठिषुः--अपाठिषुः इ.; गद्- अगदीत् -अगादीत् इ.

२१०. आत्मनेपदी प्रत्ययांपूर्वी (१) अनिट् धातूंतील फक्त अन्त्य ऱ्हस्व किंवा दीर्घ इ, उ चा गुण होतो, (२) सेट् धातूंतील अन्त्य ऱ्हस्व किंवा दीर्घ इ, उ, ऋ चा व उपान्त्य ऱ्हस्व इ, उ, ऋ, लृ चा गुण होतो.

**( अ ) ऋकारान्त धातुच्या ऋ पूर्वी ओष्ठ्य व्यंजन असेल तर त्या ऋ चा अविकारक प्रत्ययापूर्वी उर् होतो. ( उदोष्ठ्यपूर्वस्य )** शिवाय कलम १३१ ( २ ) व १३० ( १ ) पहा. वृ-अवूर्ष्ट.

**( आ ) परोक्षभूत, सामान्यभूत व आशीर्वादार्थ यांच्या म. पु. ब. ध्वे, ध्वम् व षीध्वम् प्रत्ययांपूर्वी अ, आ खेरीज कोणताहि स्वर किंवा य्, र्, ल्, व्, ह्, यांपैकीं कोणतेंहि व्यंजन आलें तर त्यांच्या ध् चा ढ् होतो. या प्रत्ययांपूर्वी इ आगम आला असून त्या इ मागें वरील व्यंजनांपैकीं कोणतेंहि व्यंजन असेल तर ध् चा ढ् विकल्पानें होतो.**

( १ ) वि+जि आ.--व्यजेष्ट व्यजेषाताम् व्यजेषत, व्यजेष्ठाः व्यचेषाथाम् व्यजेढ्वम् , व्यजेषि व्यजेष्वहि व्यजेष्महि.

नी–अनेष्ट अनेषाताम् अनेषत इ.; कृ–अकृत अकृषाताम् अकृषत, अकृथाः अकृषाथाम् अकृढ्वम्, अकृषि अकृष्वहि अकृष्महि; क्षिप्–अक्षिप्त अक्षिप्साताम् अक्षिप्सत इ.

युज्–अयुक्त अयुक्षाताम् अयुक्षत इ.; लभ्- अलब्ध अलप्साताम्, अलप्सत इ.; रम्–अरंस्त अरंसाताम् अरंसत इ.; मन्–अमंस्त.

( २ ) शी- अशयिष्ट अशयिषाताम् अशयिषत, अशयिष्ठाः अशयिषाथाम् अशयिध्वम्–ढ्वम्, अशयिषि अशयिष्वहि अशयिष्महि.

लू–अलविष्ट अलविषाताम् अलविषत इ.; वृ–अवरिष्ट–अवरीष्ट (१८४) अवरिषाताम्–अवरीषाताम् अवरिषत-अवरीषत; वृत्–अवर्तिष्ट अवर्तिषाताम् अवर्तिषत इ.; सह्–असहिष्ट इ

२११. दा, धा व स्था यांच्या आ चा आत्मनेपदामध्यें इ होतो. जसें; दा–अदित अदिषाताम् अदिषत, अदिष्ठाः इ.; प्र+स्था आ–प्रास्थित.

२१२. दीप्, जन्, बुध् ४ आ., पूर् ४ आ., ताय्, प्याय् यांच्या प्र. पु. ए. मध्यें स् विकरणाबद्दल विकल्पानें इ आदेश होऊन पुढील त प्रत्ययाचा लोप होतो. पद् च्या प्र. पु. ए. मध्यें हा फेरफार नित्य होतो ह्या इ पूर्वी धातूंमध्यें १० व्या गणाच्या धातूंप्रमाणें फरक होतो ( १३२ ). जसें जन्–अजनि-अजनिष्ट अजनिषाताम् अजनिषत इ.; बुध्–अबोधि–अबुद्ध; पद् अपादि अपत्साताम् अपत्सत इ.

## आशीर्वादार्थ

२१३. प्रत्यय

| | परस्मैपद | | | आत्मनेपद | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | ए. | द्वि. | ब. | ए. | द्वि. | ब. |
| प्र. | यात् | यास्ताम् | यासुस् | सीष्ट | सीयास्ताम् | सीरन् |
| म. | यास् | यास्तम् | यास्त | सीष्ठाः | सीयास्थाम् | सीध्वम् |
| उ. | यासम् | यास्व | यास्म | सीय | सीवहि | सीमहि |

२१४. परस्मैपदी प्रत्यय अविकारक आहेत व हे यकारादि असल्यामुळें कोणत्याहि धातूला लागतांना ह्यांच्यामागें इ आगम होत नाहीं [१७१].

भू–भूयात् भूयास्ताम् भूयासुः, भूयाः भूयास्तम् भूयास्त, भूयासम् भूयास्व भूयास्म. तॄ-तीर्यात्–१३१ (२), १३० (१), तीर्यास्ताम् तीर्यासुः; पॄ–पूर्यात् (२१०). जीव्–जीव्यात् जीव्यास्ताम् जीव्यासुः, इत्यादि.

२१५. धातूंतील अन्त्य इ व उ दीर्घ होतात. जसें, जि–जीयात् जीयास्ताम् जीयासुः, इ. स्तु–स्तूयात्, स्तूयाः, स्तूयासम्, इ.

२१६. धातूंतील अन्त्य ऋ चा रि होतो; परंतु त्याच्यामागें जोडव्यंजन असल्यास गुण होतो. जसें, कृ–क्रियात्; स्मृ–स्मर्यात्.

२१७. दा, धा व ह्रीं रूपें धारण करणारे धातु (२०३), मा, स्था, गै, पा (पिणें), हा (त्यागणें) व सो यांच्या अन्त्य स्वराचा ए होतो. इतर आकारान्त धातूंच्या अन्त्य आ मागें जोडव्यंजन असल्यास त्या आ चा विकल्पानें ए होतो. जसें, दा–देयात्, पा–पेयात्, गै–गेयात्, स्था–स्थेयात्; ग्लै–ग्लेयात्;-ग्लायात्; घ्रा–घ्रेयात्-घ्रायात्; पण पा (रक्षणें) =पायात्.

२१८. दहाव्या गणांतील धातूंना लागणाऱ्या इ प्रत्ययाचा (तन्निमित्तक गुणवृद्धि कार्यें होऊन) लोप होतो. जसें, चुर् चोरि-चोर्-चोर्यात् इ.

२१९. अञ्च्, अञ्ज्, भञ्ज्, रञ्ज्, सञ्ज्, स्वञ्ज्, ग्रन्थ्, मन्थ्, स्यन्द्, स्कन्द्, इन्ध्, बन्ध्, दम्भ्, दंश्, भ्रंश्, ध्वंस्, शंस्, स्रंस्, ह्या धातूंतील उपान्त्य अनुनासिकाचा लोप होतो. जसें, बन्ध्–बध्यात्; रञ्ज्–रज्यात् इ.

२२०. संप्रसारण होणाऱ्या धातूंचें (१७८) संप्रसारण होतें. जसें, यज्-इज्यात्, ग्रह्-गृह्यात्; स्वप्-सुप्यात्, व्यध्–विध्यात्.

अनियमित. शास् चें शिस् होऊन शिष्यात् (२४) इ. रूपें होतात.

२२१. आत्मनेपदी प्रत्यय विकारक आहेत. हे प्रत्यय सेट् धातूंना लागतांना ह्यांच्यामागें इ आगम होतो व वेट् धातूंना लागतांना विकल्पानें इ आगम होतो (१७१).

(अ) ऋकारान्त धातु, अन्त्य ऋ च्या मागें जोड व्यंजन असणारे धातु व वृ यांना इ आगम विकल्पानें होतो.

२२२. हे प्रत्यय लागतांना सेट् धातूंतील अन्त्य ह्रस्व किंवा दीर्घ इ, उ, ऋ चा आणि उपान्त्य ह्रस्व इ, उ, ऋ, ऌ चा गुण होतो. अनिट् धातूंतील फक्त अन्त्य ह्रस्व किंवा दीर्घ इ, उ चा गुण होतो.

शी–शयिषीष्ट शयिषीयास्ताम् शयिषीरन्, शयिषीष्ठाः शयिषीयास्थाम् शयिषीध्वम्, शयिषीय शयिषीवहि शयिषीमहि; नी–नेषीष्ट नेषीयास्ताम् नेषीरन्, इ. पू-पविषीष्ट; कृ–कृषीष्ट; वृ–वरिषीष्ट–वृषीष्ट; दा–दासीष्ट; मुच्-मुक्षीष्ट; मुद्-मोदिषीष्ट; यज्–यक्षीष्ट; वह्–वक्षीष्ट; वृत्–वर्तिषीष्ट.

## साधित किंवा प्रत्ययान्त धातु

२२३. साधित किंवा प्रत्ययान्त धातु (कलम १२५ पहा) चार प्रकारचे आहेत. सिद्ध धातूंना ( १ ) 'प्रेरणा' ( २ ) 'इच्छा', (३) 'पौनःपुन्य किंवा 'अतिशय' या अर्थी विशिष्ट प्रत्यय लागून अनुक्रमें ( १ ) प्रयोजक, ( २ ) इच्छार्थक व ( ३ ) पौनःपुन्यार्थक किंवा अतिशयार्थक धातु बनतात. त्याचप्रमाणें नामांना 'इच्छा,' 'आचार,' इत्यादि अर्थी विशिष्ट प्रत्यय लागून (४) नामधातु बनतात. हे साधित धातु कसे बनतात हें पुढें सांगितलें आहे.

### प्रयोजक धातु ( णिजन्त )

२२४. कोणत्याहि धातूला प्रेरणार्थी इ हा प्रत्यय लागून प्रयोजक धातु बनतात व मूळ धातूनें दर्शविलेली 'क्रिया करविणें' असा ह्या धातूंचा अर्थ होतो हे धातु उभयपदी असतात.

२२५. ह्या इ प्रत्ययापूर्वी दहाव्या गणांतील धातूंप्रमाणें (१३२) धातूंतील अन्त्य ह्रस्व दीर्घ इ, उ, ऋ ची व उपान्त्य अ ची वृद्धि होते आणि उपान्त्य ह्रस्व इ, उ, ऋ, ऌ चा गुण होतो. जसें भू + इ = भौ + इ = भावि (१३), कृ + इ=कार् + इ = कारि, बुध् + इ=बोधि; यज् + इ = याजि.

२२६. दहाव्या गणांतील धातूंचें प्रयोजक रूप मूळ धातूंप्रमाणेंच होतें.

२२७. शम् (पाहणें) चम्, कम् यांखेरीज म् कारान्त धातु व घट्, व्यथ्, जन्, ज्वल्, त्वर्, ज्वर्, मद्, त्रप्, जॄ ४ प. इत्यादि कांहीं धातूंच्या प्रयोजक धातूंचा उपान्त्य स्वर ह्रस्व होतो. जसें जन् + इ = जानि–जनि, जॄ + इ=

जारि–जरि. वम्, नम्, ज्वल् हे उपसर्गरहित असतांना यांचा उपान्त्य स्वर विकल्पानें ऱ्हस्व होतो. जसें, ज्वल्–ज्वलि–ज्वालि.

**२२८.** आकारान्त धातु आणि ऋ, ह्री इत्यादि कांहीं धातूंना लागतांना ह्या इ पूर्वी प् आगम होतो. जसें, **दा** + इ = दा + प् + इ=दापि, **स्था**–स्थापि, **गै**- गा ( १७० )–गापि, **ऋ**–अर्पि, **ह्री**–ह्रेपि. ( **अर्तिह्री-ब्लीरीक्नूयीक्ष्माय्यातां पुग्णौ।** )

( अ ) ग्लै ( ग्ला ) व स्ना हे उपसर्गरहित असतांना यांच्या आ चा विकल्पानें अ होतो. जसें–**स्ना**–स्नापि किंवा स्नपि.

( **आ** ) जि, क्री व अधि+इ ( अध्ययन करणें ) यांतील स्वराचा आ होतो- जसें, **जि**–जा+इ = जापि, अधि + इ–अध्यापि.

**२२९.** शो, छो, सो, ह्वे, व्ये, वे; पा (पिणें) यांना प्रेरणार्थी लागणाऱ्या इ पूर्वी य् आगम होतो. जसें, **सो**–सा ( १७० )+इ=सायि, **पा**+इ=पायि.

**अनियामित.** रुह्–रोहि किंवा रोपि, पा· (रक्षणें)–पालि. भिवविणाराच भयाचें कारण असतांना भी चें भीषि किंवा भापि असें प्रयोजक रूप होतें व नित्य आत्मनेपदी प्रत्यय लागतात; एरवीं भायि असें सरळ रूप होतें. **स्मि**-स्मायि किंवा स्मापि, **हन्**–घाति, **रभ्**–रम्भि, **लभ्**–लम्भि इ.

**२३०.** प्रयोजक धातूंना गणसापेक्षकाळीं व अर्थी ( १२६ पहा ) अ(शप्) हें विकरण लागतें व ते दहाहि काळीं व अर्थी दहाव्या गणांतील धातूप्रमाणें चालतात. जसें, कृ–कारि + अ + ति=कारयति.

**कृ**–कारि–कारयति–ते, अकारयत्, कारयतु, कारयेत्, कारयामास, कारयिता, कारयिष्यति, अकारयिष्यत्, अचीकरत्, कार्यात् इ.

**दा**–दापि–दापयति–ते, अदापयत्, दापयतु, दापयेत्, दापयामास, दापयिता, दापयिष्यति, अदापयिष्यत्, अदीदपत्, दाप्यात्

वुध्–वोधि–बोधयति–ते इ.

**२३१.** प्रयोजक धातु सामान्यभूतकाळीं दहाव्या गणांतील धातूंप्रमाणेंच चालतात. मात्र ( २३५ ) नें अभ्यासांतील उ किंवा ऊ चा इ होतो.

**नी**–नायि–अनीनयत्–त इ. **कृ**-कारि अचीकरत्–त; **पत्**–पाति–अपीपतत्; **भिद्**–भेदि–अबीभिदत्; **तुद्**–तोदि–अतूतुदत्–त; **नु**–नुनु + इ–नुनावि–

नुनाव्–नुनव्– नूनव्–अनूनवत्; लू–लुलू + इ – लुलावि–लिलावि २३५ (२) लिलाव्–लिलव् – अलीलवत्, भू – अबीभवत् , पू–अपीपवत्, अञ्ज् आञ्जिजत्.[1]

शास्, याच्, लोक्, लोच्, बाध्, सेव्, वेप्, राज् इत्यादि कांहीं धातूंतील स्वर तसाच राहतो. जसें, शास्–अशशासत्.

जीव्, दीप् पीड्, भाष्, भास्, भ्राज्, मील्, लुप्, भण् इत्यादि कांहीं धातूंतील स्वर विकल्पानें तसाच राहतो. जसें, जीव्–अजीजिवत्–अजिजीवत्; भाष्–अबीभषत्–अबभाषत्.

श्रु, द्रु, प्लु, च्यु, प्रु यांच्या अभ्यासांतील उ चा विकल्पानें इ होतो. जसें, श्रु–अशुश्रवत्–अशिश्रवत्.

## इच्छार्थक धातु ( सनन्त )

**२३२.** धातूला इच्छार्थी स प्रत्यय लागून इच्छार्थक धातु बनतात व मूळ धातूनें दर्शविलेली 'क्रिया करूं इच्छिणें' असा ह्या इच्छार्थक धातूचा अर्थ होतो. मूळ धातूचा जो कर्ता तोच इच्छार्थक धातूचा कर्ता असावा लागतो. 'त्यानें जावें असें मी इच्छितों' याबद्दल गम् धातूचा इच्छार्थक धातु वापरतां येणार नाहीं. ( धातोः कर्मणः समानकर्तृकादिच्छायां वा। )

**२३३.** ह्या स प्रत्ययापूर्वी सेट् धातूंना इ आगम नित्य होतो व वेट् धातूंना तो विकल्पानें होतो. जसें, पठ् + स–पठ् + इस; तृप् ( वेट् )– तृप् + स–तृप् + इस; पा + स–पास; भुज् + स–भुक्ष.

**२३४.** ग्रह्, गुह् आणि ह्रस्व किंवा दीर्घ उकारान्त धातूंना स पूर्वी इ आगम होत नाहीं. जसें, ग्रह् + स; भू + स ( सनि ग्रह गुहोश्च। )

( अ ) ऋ, कॄ, गॄ, दॄ, धृ, स्मि, पू, अञ्ज्, प्रच्छ्, अश् यांना स पूर्वी इ आगम होतो.

( आ ) ॠकारान्त धातु, इव् अन्तीं असणारे धातु आणि श्रि, यु, वृ,

---

१ उकारान्त धातूंच्या प्रयोजकाचीं सामान्यभूतकाळीं रूपें करतांना आधीं द्वित्व करून नंतर प्रयोजकाच्या इ चीं कार्ये करावीं.

वृ, दम्भ्, पत्; नृत् इत्यादि कांहीं धातूंना इ आगम विकल्पानें होतो.

२३५. स प्रत्यय लागल्यावर धातूंचें द्वित्व होतें. द्वित्वाचे सामान्य नियम कलम ( १५८ ) मध्यें पहा. शिवाय अभ्यासामध्यें पुढील फेरफार होतातः— ( १ ) अभ्यासांतील अ चा इ होतो. ( २ ) त्याचप्रमाणें अभ्यासांतील उ च्या पुढें पवर्ग, अन्तःस्थ आणि जकार यांपैकीं कोणतेंहि व्यंजन असून त्याच्यापुढें अ असेल तर त्या उ चा इ होतो. ( सन्यतः। ओः पुयण्ज्यपरे। )

२३६. इ आगमरहित स पूर्वी अन्त्य इ, उ, ऋ दीर्घ होतात. जसें, नु–नुस–नूस–नुनूष.　　( अज्झनगमां सनि । )

२३७. इ आगमयुक्त स विकारक आहे; तेव्हां त्यापूर्वी धातूंतील अन्त्य व उपान्त्य ह्रस्व स्वराचा गुण होतो.

२३८. ज्या व्यंजनादि धातूंच्या उपान्तीं इ किंवा उ असून अन्तीं य् आणि व् खेरीज कोणतेंहि व्यंजन आहे अशा धातूंच्या उपान्त्य इ किंवा उ चा इ आगमयुक्त स पूर्वी विकल्पानें गुण होतो. ( रलो व्युपधाद्धलादेः संश्च । ) रुद्, विद्, मुष् यांच्या उपान्त्याचा गुण मुळींच होत नाहीं.

( अ ) ग्रह्, स्वप्, प्रच्छ् यांचें संप्रसारण होतें.

२३९. इच्छार्थक धातूंना गणसापेक्ष काळीं व अर्थीं अ ( शप् ) हें विकरण लागून ते पहिल्या गणांतील धातूंप्रमाणें चालतात. कलम १३३ ( २ ) पहा. त्यांचें परोक्षभूतकाळीं आम् प्रत्ययान्त अंग बनून रूपें होतात ( १८० ). इतर गणनिरपेक्ष काळीं व अर्थीं ते सेट् धातूंप्रमाणें चालतात. इ आगमापूर्वी अन्त्य अ चा लोप होतो. इच्छार्थक धातूंचें पद मूळ धातूंप्रमाणें असतें.

**पा**–पास–पपास–पिपास–पिपासति, अपिपासत् इ.; पिपासांचकार, पिपासिष्यति, अपिपासीत्, पिपास्यात् इ.

**नी**–नीस–निनीस–निनीषति–ते, अनिनीषत्–त, निनीषतु–ताम्, इ.

**द्रु**–द्रुस–द्रूस–दुद्रूष–दुद्रूषति इ.

**भू**–भूस–बुभूस बुभूषति, बुभूषांचकार, बुभूषिष्यति इ.

सं. ८

कृ—कृस—कृस—१३१ ( २ ) नें किर्स—कीर्स ( १३०·(१) )—चिकीर्ष ( २४ ) चिकीर्षति इ. तॄ—तॄस—तीर्स—तितीर्ष—तितीर्षति, तितीर्षांचकार इ.

मृ—मृस—मृस—मुर्स—( २१० अ ) मूर्स—मुमूर्ष—मुमूर्षति ( १७६ ) इ.; पॄ—पुपूर्षति.

पच्—पच्स—पपच्स—पिपक्ष—पिपक्षति; यज्—यज्स—ययज्स—यियक्ष—यियक्षति—ते. वच्—विवक्षति; भिद्—बिभित्सति, मुच्—मुमुक्षति; भुज्—बुभुक्षति, दुह्—दुधुक्षति ( ७० अ, ३४ ).

ग्रह्—ग्रह्स—गृह् स—जगृह्स—जिगृह्स—जिघृक्ष ( ७०, ३४, १४६, २४ ) —जिघृक्षति; स्वप्—सुषुप्सति.

पठ्—पठ्स—पठ्इस पपठ्इस—पिपठ्इस—पिपठिष—पिपठिषति.

दिव्—दिदेविषति; मुद्—मुमुदिषते (२३८)-मुमोदिषते; स्मि-सिस्मयिषते; यु—यिप्रविषति ( २३७ )—युयूषति; पू आ.—पिपविषते २३५ ( २ ); धृ-दिधरिषते; गॄ जिगरिषति.

तॄ ( २३४ आ )—तितरिषति-तितरीषाति ( १८४ ); प्रच्छ्—पिपृच्छिषति-विद् ६ उ.—विविदिषति—ते; जीव्—जिजीविषति.

२४०. मि, मी, मा, दा, धा, दा धा रूप धारण करणारे धातु आणि रभ्, लभ्, शक्, पत्, पद् यांतील स्वराचा स पूर्वी इस् होतो व यांच्या अभ्यासाचा लोप होतो.

दा—दा स—दिस्स-दिदिस् स—दिस् स—दित्स (१८८)-दित्सति-ते.

रभ्—रभ् स—रिस्भ् स—रिरिस्भ् स—रिस्भ् स—रिभ् स ( १४६ अ ) —रिप्स ( १७ )—रिप्सते; पत्—पित्सति—( पिपतिषति ); लभ्-लिप्सते; शक्—शिक्षति; पद्—पित्सते.

( अ ) वृत् वृध्, शृध्, क्लृप् व स्यन्द् हे विकल्पानें परस्मैपदी होतात व तेव्हां यांना स पूर्वी इ लागत नाहीं. मात्र स्यन्द् ला विकल्पानें लागतो. जसें, वृत्—विवृत्सति—विवर्तिषते.

२४१. चुर्—चोरि इस—चुचोरि इस—चुचोरयिष-चुचोरयिषति.

भू प्रयोजक भूइ इस--वुभूइ इस--वुभावि इस--विभावि इस २३५ (२) --विभावे इस--विभावयिष--विभावयिषति--ते; पण नु प्रयोजक--नुनावयिषति.

२४२. ह्या स प्रत्ययाचा कलम २४ नें ष होत असल्यास व धातूंतील स् चाहि २४ नें ष् होण्यासारखा असल्यास तो फक्त प्रयोजक धातूंतील स् चा होतो, इतर धातूंतील स् चा होत नाहीं. ( स्तौतिण्योरेव षण्यभ्यासात् ।) जसें, सिच्--सिसिक्षति; सिध् प्रयोजक--सिषाधयिषति.

अनियमित. स्तु--तुष्टूषति.

२४३. वकारान्त धातूच्या अन्त्य व् चा अनुनासिक व अन्तःस्थ यांखेरीज कोणतेंहि व्यंजन आरंभीं असणाऱ्या अविकारक प्रत्ययापूर्वीं ऊ होतो. जसें, दिव्--दिव्स- दिऊस--द्यूस ( १२ )--दुद्यूषति ( २३४ आ ).

२४४. स्वरादि धातूंचें द्वित्व होतांना कलम २०० लागू पडतें.

अट्--अट् इस--अटिस--अटिटिष--अटिटिषति.

इष्--इष् इस--एषिस--एषिषिष--एषिषिषति.

ईक्ष्--ईचिक्षिषते; अञ्ज्--अञ्जिजिषति--ते; ऋज्--अर्जिजिषति.

२४५. गुप्, तिज्, कित्, मान्, बध् ह्या धातूंचीं अंगें ह्या स प्रत्यय विशिष्ट अर्थीं लागून बनतात व त्यांना स्वतंत्र धातु मानतात. जसें, जुगुप्स निंदणें--जुगुप्सते; तितिक्ष सहन करणें--तितिक्षते; चिकित्स उपचार करणें --चिकित्सति--ते; मीमांस विचार करणें--मीमांसते; बीभत्स वीट येणें--बीभत्सते. ह्या धातूंपासून पुनः यांचे इच्छार्थक धातु बनतात. जसें, जुगुप्सिषते.

२४६. अनियमित. जि--जिगीषति; हि--जिघीषति; हन्--जिघांसति; चि---चिचीषति--ते होऊन शिवाय चिकीषति--ते होतात; आप्--ईप्सति.

( आ ) ज्ञा, श्रु, स्मृ, दृश् यांचे इच्छार्थक धातु आत्मनेपदी होतात.

## पौनःपुन्यवाचक किंवा अतिशयार्थक धातु

२४७. पहिल्या नऊ गणांतील कोणत्याहि व्यंजनादि एकाक्षरी धातूला 'पौनःपुन्य' किंवा 'अतिशयपणा' या अर्थीं य प्रत्यय लागून हे धातु बनतात व मूळ धातूनें दर्शविलेली 'क्रिया पुनःपुनः किंवा अतिशय करणें' असा ह्या

धातूंचा अर्थ होतो. ( धातोरेकाचो हलादेः क्रियासमभिहारे यङ्। )

( अ ) हा लागण्यापूर्वी मूळ धातूंत २१५, २१६, २१७, २१९, २२० या कलमांत सांगितलेले फेरफार होतात.

२४८. हा पौनःपुन्यवाचक य प्रत्यय लागल्यानंतर धातूंचें द्वित्व होतें आणि अभ्यासांतील अ ची वृद्धि होते व इ, उ, ऋ चा गुण होतो. जसें, वद् य –ववद् य–वावद्य; लप् य-लालप्य; दीप् य–दिदीप् य–देदीप्य; लिह् य–लिलिह् य–लेलिह्य; भू य–बुभू य–बोभूय. ( गुणो यङ्लुकोः । दीर्घोऽकितः )

२४९. अनुनासिकान्त धातूंचें द्वित्व होतांना वरील नियमाप्रमाणें अभ्यासांतील अ चा आ न होतां अभ्यास अनुस्वारयुक्त होतो. जसें, क्रम् य – चंक्रम्य; नम् य – नंनम्य; जन्–जंजन्य. ( नुगतोऽनुनासिकान्तस्य। )

२५०. उपान्तीं ऋ असणाऱ्या धातूंचा अभ्यास व धातु यांच्यामध्यें री येतो. जसें, दृश् य–ददृश् य–दरीदृश्य; नृत् य–ननृत् य–नरीनृत्य; वृत् य–ववृत् य – वरीवृत्य. ( रीगृदुपधस्य च। )

२५१. ह्या धातूंचीं गणसापेक्ष काळांचीं व अर्थांचीं रूपें पृष्ठ ७१ वरील आत्मनेपदी प्रत्यय लागून बनतात. कलम १३३ (२) पहा. गणनिरपेक्षकाळीं हे धातु सेट् धातूंप्रमाणें चालतात आणि य प्रत्ययापूर्वी व्यंजन असेल तर त्या य चा लोप होतो.

लिह्—लेलिह्य–लेलिह्यते लेलिह्येते लेलिह्यन्ते; अलेलिह्यत; लेलिह्यताम्; लेलिह्येत; लेलिहांचक्रे–बभूव–आस; लेलिहिता; लेलिहिष्यते.

दृश्—दरीदृश्य–दरीदृश्यते; दीप्–देदीप्य–देदीप्यते; क्रम्–चंक्रम्य–चंक्रम्यते; सृप्–सरीसृप्य–सरीसृप्यते; ज्वल्–जाज्वल्य–जाज्वल्यते; गम्–जंगम्य–जंगम्यते.

२५२. ह्या य प्रत्ययाचा लोप होऊनहि अतिशयार्थक धातूंचीं रूपें होतात. य चा लोप होतो तेव्हां २५० नें धातूंत किंवा अभ्यासांत होणारे फेरफार तसेच राहातात. पृष्ठ ७१ वरील परस्मैपदी प्रत्यय लागतात. व्यंजनादि विकारक प्रत्यय

लागतांना त्यांच्यामागें विकल्पानें ई लागतो. ह्या ई पूर्वी व्यंजनान्त अंगाच्या उपान्त्य ऱ्हस्व स्वराचा गुण होत नाहीं.

भू–बोभवीति–बोभोति; वद्–वावदीति–वावत्ति; वृत्–वरीवृतीति–वरीवर्ति; सृप्–सरीसृपीति–सरीसर्प्ति; यज्–यायजीति–यायष्टि.

२५३. अनियमित. चर्–चंचूर्यते–चंचुरीति; दंश्–दंदश्यते–दंदशीति; दह्–दंदह्यते, दंदहीति; जप्–जंजप्यते.

## नामधातु

२५४. य ( क्यच् ), काम्य ( काम्यच् ), य ( क्यङ् ), इ ( णिच् ) हे प्रत्यय नामांना लागून नामधातु बनतात.

२५५. य ( क्यच् ) व काम्य हे प्रत्यय 'इच्छा' या अर्थी सामान्यतः कोणत्याहि नामाला लागतात; मात्र त्या नामानें दर्शविलेला पदार्थ इच्छा करणाऱ्यानें इच्छिलेला असला पाहिजे. ( **सुप आत्मनः क्यच् । काम्यच ।** ) य प्रत्यय लागतांना नामाचा अन्त्य अ व आ यांचा ई होतो, अन्त्य इ व उ दीर्घ होतात व अन्त्य ऋ चा री होतो. न् कारान्त नामांच्या अन्त्य न् चा लोप होतो. ( **क्यचि च । अकृत्सार्वधातुकयोर्दीर्घः । रीङ् ऋतः न लोपः प्रातिपदिकान्तस्य ।** ) जसें, आत्मनः **पुत्रं** इच्छति–पुत्र + य –पुत्रीय–पुत्रीयति; आत्मनः **मालां** इच्छति–मालीयति; **अग्नि**–अग्नीयति **वसु**–वसूयति; **राजन्**–राजीयति; **स्वामिन्**–स्वामीयति; **समिध्**+ समिध्यति; **दातृ**=दात्रीयति; **पुत्र** + काम्य = पुत्रकाम्यति ( आत्मनः पुत्रं इच्छति ); **यशस्**–यशस्काम्यति.

२५६. या धातूंना १२८ मधील परस्मैपदी प्रत्यय लागतात व ते गणसापेक्ष काळीं व अर्थी पहिल्या गणाप्रमाणें चालतात. १३१ (२) पहा. व गणनिरपेक्ष काळीं व अर्थी इच्छार्थक धातूंप्रमाणें चालतात. कलम २३९ पहा.

२५७. य ( क्यच् )-हा प्रत्यय उपमानदर्शक अशा कर्मवाचक व अधिकरणवाचक शब्दांना 'वागणें,' 'आचरणें,' 'मानणें' या अर्थीहि लागतो. (**उपमानादाचारे ।** ) जसें, छात्रं **पुत्रं इव** आचरति-पुत्रीयति; **प्रासादे इव**

कुट्यामाचरति--प्रासादीयति. यांचे वाक्यांत प्रयोग--पुत्रीयति छात्रं गुरुः। प्रासादीयति कुट्यां भिक्षुः । प्रावारीयति कम्बलम् ।

२५८. य ( क्यङ् )-हा प्रत्यय उपमानवाचक प्रथमान्त कर्त्याला 'वागणें' आचरणें' या अर्थी लागतो. ( **कर्तुः क्यङ् सलोपश्च** । ) हा प्रत्यय लागतांना वरील य प्रत्ययापूर्वीप्रमाणेंच प्रकृतींत फेरफार होतात. मात्र अन्त्य अ चा आ होतो व १२८मधील आत्मनेपदी प्रत्यय लागतात. अन्त्य स् चा विकल्पानें लोप होतो. स्त्रीप्रत्ययान्त नाम असल्यास त्याचें रूप पुलिंगासारखें होतें. ( **क्यङ् मानिनोश्च** ) जसें, **गरुडः इव आचरति--गरुड + य--** गरुडायते; **तरुण**--तरुणायते; **जल**--जलायते ( पाण्याप्रमाणें शीतल होतो ); **अग्नि**--अग्नीयते ( अग्नीप्रमाणें प्रखर भासतो ); **धेनु**--धेनूयते; **राजन्**-राजायतें; **दातृ**--दात्रीयते; **यशस्** ( यशस्वी अर्थी ) य[illegible]-यशस्यते ( यशस्वी होतो ); **कुमारी**--कुमारायते ( कुमारीप्रमाणें वागतो ); **सपत्नी**-सपत्नायते ( सवतीप्रमाणें वागतो, मत्सर करतो ).

२५९. **अनियमित. ओजस्**--ओजायते; **अप्सरायते.** भृश, शीघ्र, चपल, मंद, पंडित, उत्सुक, सुमनस्, दुर्मनस्, उन्मनस्, रहस् इत्यादि कांहीं शब्दांना हा य ( क्यङ् ) प्रत्यय ' नसलेलें होणें ' ह्या अर्थी लागतो. जसें, अपंडितः पंडितः भवति--पंडितायते ( पंडित होतो ); शीघ्रायते; मन्दायते.

२६०. हा प्रत्यय निरनिराळ्या अर्थी लागतो:--**बाष्प**-बाष्पायते ( अश्रु टाकतो--ढाळतो ), **उष्मन्**--उष्मायते ( वाफ बाहेर टाकतो ); **शब्द**-शब्दायते ( आवाज करतो ), **फेन**--फेनायते ( फेंस टाकतो ), **वैर**-वैरायते (वैर करतो) **कलह**--कलहायते, **सुख**--सुखायते ( सुख अनुभवतो ), **दुःख**--दुःखायते ( दुःख अनुभवतो ).

२६१. इ ( णिच् ) हा प्रत्यय कांहीं द्वितीयान्त नामांला 'करणें' या अर्थी लागून नामधातु बनतात. हा प्रयत्य लागतांना नामामध्यें इष्ठ तद्धित प्रत्ययांपूर्वी होणारे फेरफार [ ११४ ] होतात व हे धातु गणसापेक्ष काळीं दहाव्या गणांतील धातूंप्रमाणें चालतात. जसें,आविलं करोति-आविल+अय+ति=

ल्यति ( गड्बड करतो ), लघु + अय + ति = लघयति, दृढ + अय + ति = द्रढयति, मिश्र + अय + ति = मिश्रयति.

## कर्मणि व भावे क्रियापदें

२६२. धातूंना त्या त्या काळाचे व अर्थाचे आत्मनेपदी प्रत्यय लागून दहाहि काळांचीं व अर्थांचीं कर्मणि व भावे क्रियापदें बनतात. हे प्रत्यय सकर्मक धातूंना लागतात तेव्हां त्या रूपांवरून कर्माचा बोध होतो व अकर्मक धातूंना लागतात तेव्हां भावाचा (धात्वर्थाचा–धातूनें दर्शविलेल्या क्रियेचा) बोध होतो. भावे क्रियापदें केवळ क्रियावाचक असल्यामुळें तीं नेहमीं प्रथमपुरुषी एकवचनीच असतात. ( **भावकर्मणोः ।** )

२६३. वर्तमानकाळ, अनद्यतन भूतकाळ, आज्ञार्थ व विध्यर्थ या काळीं व अर्थीं कर्मणि व भावे क्रियापदें बनतांना धातूंना य विकरण लागतें व नंतर कलम १२८ मधील त्या त्या काळाचे व अर्थाचे आत्मनेपदी प्रत्यय लागतात. जसें, **नी**–नीय–नीयते, अनीयव, नीयताम्, नीयेत; **भू**–भूयते, अभूयत, भूयताम्, भूयेत; **जीव्**–जीव्यते, अजीव्यत, जीव्यताम्, जीव्येत इ. ( **सार्वधातुके यक् ।** )

२६४. ह्या य विकरणापूर्वीं धातूंमध्यें पुढीलप्रमाणें फेरफार होतातः—

( १ ) अन्त्य इ, उ दीर्घ होतात. जसें, **जि**–जीयते, अजीयत, जीयताम्, जीयेत; **श्रु**–श्रूयते, अश्रूयत, श्रूयताम्, श्रूयेत.

( २ ) अन्त्य ऋ चा रि होतो; पण अन्त्य ऋ च्या मागें जोड व्यंजन असल्यास ऋचा गुण होतो. जसें, **कृ**–क्रियते, अक्रियत, क्रियताम्, क्रियेत; **स्मृ**–स्मर्यते, अस्मर्यत; इ.

( ३ ) अन्त्य ॠ चा १३१ (२) व १३० (१) नें ईर् होतो; पण अन्त्य ॠ च्या मागें ओष्ठ्य व्यंजन असल्यास ॠ चा ऊर् होतो ( २१० अ ). जसें, **तॄ**–तीर्यते, अतीर्यत, तीर्यताम्, तीर्येत; **पॄ**–पूर्यते, अपूर्यत, पूर्यताम् इ.

( ४ ) दा ( देणें ), दे, दो, धा, धे, मा, स्था, गै, पा ( पिणें ), सो व हा ( त्यागणें ) ह्यांच्या अन्त्य आ चा ई होतो. जसें, **दा**–दीयते, अदी-

यत, दीयताम्, दीयेत; गै (गा) (१७०)–गीयते इ.; पण ज्ञा–ज्ञायते इ.; ध्यै–ध्यायते इ.

(५) बन्ध्, मन्थ्, भञ्ज्, शंस् इत्यादि कांहीं धातूंतील (२१९) उपान्त्य अनुनासिकाचा लोप होतो. जसें, बन्ध्–बध्यते, अबध्यत, बध्यताम्, बध्येत.

(६) संप्रसारण होणाऱ्या धातूंचें संप्रसारण होतें (६, १७८). जसें, वह्–उह्यते, औह्यत १३३ (२), उह्यताम्, उह्येत; वस् १ प. उष्यते इ.; पण वस २ आ. वस्यते इ.

(७) दहाव्या गणांतील धातु व प्रयोजक धातु यांच्या इ प्रत्ययाचा लोप होतो व त्यापूर्वी झालेले धातूंतील फेरफार तसेच राहतात. जसें, चुर्–चोर्यते, अचोर्यत, चोर्यताम्, चोर्येत; तड्–ताड्यते इ. कृ–प्रयोजक कारि–कार्यते इ.

२६५. **अनियमित.** (१) खन्, जन्, तन् यांच्या न् चा विकल्पानें लोप होतो व त्यावेळीं अ चा आ होतो. जसें, खन्–खन्यते, खायते इ. (२) शी–शय्यते इ. (३) शास्–शिष्यते, इ. (४) ब्रू आणि अस् यांना वच् व भू हे आदेश होतात. जसें, ब्रू–उच्यते; अस्–भूयते.

२६६. सामान्यभूत खेरीज कोणत्याहि गणनिरपेक्ष काळीं व अर्थीं कर्मणि व भावे रूपें त्या त्या काळाच्या व अर्थाच्या कर्तरि आत्मनेपदी रूपांप्रमाणेंच होतात.

२६७. परंतु स्वरान्त धातूंचीं अनद्यतन व सामान्य भविष्य, क्रियातिपत्त्यर्थ व आशीर्वादार्थ या काळीं व अर्थीं कर्मणि व भावे रूपें बनतांना विकल्पानें अन्त्य स्वराची वृद्धि होते. व वृद्धि होते त्यावेळीं प्रत्ययांपूर्वी इ आगम होतो. आकारान्त धातूंना ह्या इ पूर्वीं य् लागतो. जसें, दा–दाता–दायिता [दा य् इ ता], दास्यते–दायिष्यते, अदास्यत–अदायिष्यत, दासीष्ट–दायिषीष्ट; नी–नेता–नायिता–नेष्यते, नायिष्यते, इ.

**अनियमित.** हन्, ग्रह्, दृश् यांचीं हन्ता–घानिता, हनिष्यते, घानिष्यते, वधिषीष्ट, घानिषीष्ट; ग्रहीता, ग्राहिता, ग्रहीष्यते–ग्राहिष्यते, ग्रहिषीष्ट–ग्राहिषीष्ट; द्रष्टा दर्शिता, द्रक्ष्यते दर्शिष्यते अशीं रूपें होतात.

२६८. सामान्यभूतकाळीं सर्व धातूंचें कर्मणि प्र. पु. ए. रूप धातूंना इ प्रत्यय लागून बनतें ( २१२ ). ह्या इ प्रत्ययापूर्वी धातूंतील ( १ ) अन्त्य स्वराची वृद्धि होते; ( २ ) अम् अन्तीं असणारे सेट् धातु व जन् यांखेरीज इतर धातूंतील उपान्त्य अ ची वृद्धि होते; ( ३ ) उपान्त्य ह्रस्व इ, उ, ऋ, ऌ चा गुण होतो. जसें, ( १ ) नी--अनायि, श्रु--अश्रावि, कृ--अकारि इ.; ( २ ) पद्--अपादि, गम्--अगामि; पण दम् ( सेट् )- अदमि, जन्--अजनि; ( ३ ) भिद्--अभेदि, मुच्--अमोचि, दृश्--अदर्शि, चुर्--अचोरि, रच्--अरचि १३२ (१ ), कृ--प्रयोजक कारि-अकारि. ( ४ ) आकारान्त धातूंना ( १७० पहा ) ह्या इ पूर्वी य् लागतो. जसें, दा--अदायि, गै--अगायि.

( अ ) अनियमित. रभ्--अरम्भि, लभ्- अलम्भि- अलाभि, पॄ-अपूरि; हन् ( वध् )--अवधि, आचम्--आचामि, कम्--अकामि.

२६९. स ( क्स ) विकरणात्मक धातूंचीं सामान्य भूतकाळचीं बाकीचीं कर्मणि व भावे रूपें कर्तरि आत्मनेपदी रूपांप्रमाणेंच होतात. सामान्यभूताच्या इतर प्रकारांतील धातूंचींहि कर्मणि व भावे रूपें ह्याच दोन प्रकारांतील आत्मनेपदी रूपांच्या नियमाप्रमाणें होतात.

## परस्मैपद व आत्मनेपद यासंबंधीं नियम

२७०. ( १ ) विशिष्ट उपसर्गांमुळें, ( २ ) धातूंचा विशिष्ट अर्थ असतांना किंवा ( ३ ) विशिष्ट काळीं चालतांना धातूंचें मूळचें पद बदलतें.

( १ ) उपसर्गनिमित्तानें पदांत बदलः—विश् ६ प.- विशति, निविश् आ.--निविशते; गम् १ प.--गच्छति, सम्+गम् आ.--संगच्छते; जि १ प. जयति, वि -परा--जि आ.--विजयते, पराजयते; स्था १ प.--तिष्ठति, सम्--अव--प्र--वि--स्था आ.--संतिष्ठते, अवतिष्ठते, प्रतिष्ठते, वितिष्ठते; शास् १ प.-आशास् आ.-आशास्ते; युज् ७ उ.--युनक्ति-युङ्क्ते, प्र- उप--युज् आ. प्रयुङ्क्ते; स्वरान्त उपसर्ग लावला असतांहि युज् आत्मनेपदींच चालतो. नियुङ्क्ते; रम् १ आ.- रमते, वि--आ-परि रम् प.--विरमति, आरमति, परिरमति; वद् १

उ.--वहति-ते, प्रवह् प.--प्रवहति; कृ ८ उ.-करोति कुरुते, अनु-परा कृ प.--अनुकरोति, पराकरोति. प्रच्छ् ६ प.--पृच्छति, आप्रच्छ् आ.--आपृच्छते.

( २ ) विशिष्ट अर्थी पदांत बदलः—भुज् ७ आ. ( 'रक्षणें' याखेरीज इतर अर्थी )-भुङ्क्ते, भुज् प. ( रक्षणें )-भुनक्ति; यम् १ प.--यच्छति, उपयम् आ. ( लग्न करणें )-उपयच्छते; ह्वे १ उ--ह्वयति-ते, आह्वे आ. ( आव्हान करणें )-आव्हयते; कॄ ६ प. किरति, अप+कॄ=अपस्कॄ आ. ( उकरणें )-अपस्किरते; क्रम् १ प. क्रामति, क्रम् आ. ( अप्रतिहत चालणें, उत्साहानें झटणें, वाढ पावणें )-क्रमते, आक्रम् आ. ( सूर्य इ. चें उगवणें )-आक्रमते, प्र--उप क्रम् आ. आरंभणें --प्रक्रमते, उपक्रमते.

( ३ ) काळनिमित्तानें पदांत बदलः—मृ ६ आ.-म्रियते, पण परोक्षभूत —ममार, भविष्य-मरिष्यति इ. ( १७६ ). शिवाय १९१, १९४ आ. २४६ अ. हीं कलमें पहा.

## उपसर्ग

**२७१.** प्र, परा, अप, सम्, अनु, अव, निस् ( निर् ), दुस् ( दुर् ), वि, आ, नि, अधि, अपि, अति, सु, उद्, अभि, प्रति, परि, उप हीं अव्ययें धातूंना जोडलीं असतां ह्यांना **उपसर्ग** म्हणतात आणि हे धातूंच्या मागें जोडतात. कांहीं उपसर्गांचे प्रमुख अर्थ पुढें दिले आहेत. अति=फार, मर्यादेबाहेर, अनु=मागून, अप=दूर, अव=खालीं, आ--कडे, जवळ, उलट; उद्=वर, उप=जवळ, परि=सभोंवतीं, वि=विरुद्ध, उलट, फार; सम् = सहित, बरोबर.

**२७२.** धातूंना उपसर्ग जोडल्यानें ( १ ) उपसर्गांच्या अर्थाची धातूंच्या अर्थांत भर पडते व ( २ ) पुष्कळदां उपसर्गांच्या योगानें धातूंच्या अर्थांत विलक्षण बदल होतो. जसें, ( १ ) नी १ उ. ( नेणें )--नयति - ते, अपनी--अपनयति-ते ( दूर नेतो ), आनी-आनयति ( आणतो ), पत् १ प. ( पडणें )-पतति, उत्पत् --उत्पतति (उडतो); स्मृ १ प. (स्मरणें )-स्मरति, विस्मृ--विस्मरति (विसरतो); ( २ ) गम् १ प. ( जाणें )--गच्छति, आगम्--आगच्छति ( येतो ); नी १ उ.

( नेणें ), उपनी--उपनयति ( मुंज करतो ), परिणी ( २३ )--परिणयति ( लग्न करतो ), यम् १ प. ( आवरून धरणें )--यच्छति, उपयम् आ.--उपयच्छते ( लग्न करतो ); हृ १ उ. ( हरण करणें )--हरति, विहृ-विहरति ( क्रीडा करतो ); अनुहरति ( अनुकरण करतो ); विशति ( शिरतो ), संविशति ( निजतो ).

( ३ ) कित्येकदां उपसर्ग लागूनहि अर्थांत मुळींच बदल होत नाहीं. जसें विश् ६ प.--विशति ( शिरतो ), प्रविशति ( शिरतो ).

( ४ ) धातूंना एकाच वेळीं वरील तीनहि प्रकारांनीं अनेक उपसर्ग लावतां येतात. जसें, उप आ विश्--उपाविशति ( वसतो ), समुपाविशति, समभिव्याहृ -- समभिव्याहराति ( बोलतो, सांगतो ), अभ्यवहृ--अभ्यवहरति ( खातो ).

( ५ ) उपसर्गनिमित्तानें पुष्कळ वेळां अकर्मक धातु सकर्मक होतात. जसें, भू १ प.- भवति ( होतो ), सुखं अनुभवति; वृत् १ आ; वर्तते ( होतो ), पितरं अनुवर्तते ( अनुसरतो, वळणावर जातो ).

( ६ ) उपसर्गांमुळें पुष्कळदां धातूंचें पदहि बदलतें ( २७० ).

---

# धातुसाधित शब्द ( कृदन्त )

---:o:---

२७३. धातूंना निरनिराळे प्रत्यय लागून धातुसाधित शब्द बनतात. या प्रत्ययांना ' कृत् ' प्रत्यय म्हणतात. एकाच धातूपासून अनेक धातुसाधितें होऊं शकतात. जसें, कृ--कुर्वत्, क्रियमाण, करिष्यत्, करिष्यमाण, कृत, कृतवत्, चकृवस्, कृत्वा, कर्तुम्, कारंकारं,कार्य, कर्तव्य, करणीय, कर्तृ, कारक, करण, ( कुंभ ) कार, ०कारिन्, ०कृत्, इत्यादि.

## कालवाचक धातुसाधितें

२७४. वर्तमानधातुसाधितें--परस्मैपदी धातूंना अत् ( शतृ ) आणि आत्मनेपदी धातूंना आन ( शानच् ) लागून कर्तरि वर्तमान धातुसाधितें बन-

तात. वर्तमान प्र. पु. ब. प्रत्ययापूर्वी धातूंचें जें अंग बनतें तेंच अंग ह्या अत् व आन पूर्वी बनतें. अंगाच्या अन्तीं अ असल्यास त्याचा अत् पूर्वी लोप होतो १३२ (२) आणि आन प्रत्ययास मान असा आदेश होतो. ( **लटः शतृ-शानचौ । आने मुक् ।** ) जसें, भू १ प.–भवत् ( होणारा, असणारा ), गम् १ प.–गच्छत् ( जाणारा ), अस् २ प.–सत्, हन् २ प.–घ्नत्, दा ३ उ.–ददत्, पुष् ४ प.–पुष्यत्, विश् ६ प.–विशत्, सु. ५ उ.–सुन्वत्, युज् ७ उ.–युञ्जत्, कृ ८ उ.–कुर्वत्, ग्रह् ९ उ.–गृह्णत्, चुर् १० प.–चोरयत्, कृ प्रयोजक–कारयत्, जीव् इच्छार्थक–जिजीविषत्, पुत्रीयत्; वृध् १ आ. वर्धमान, विद् ४ आ.–विद्यमान, कृ ८ उ.–कुर्वाण, भुज् ७ आ. ( खाणें )–भुञ्जान, धा उ.–दधान, ईश्–ईशान, ग्रह् उ.–गृह्णान, लिह् पौनःपुन्यवाचक–लेलिह्यमान.

**अनियमित.** विद् २ प.–विदत् व **विद्वस्**; आस् २ आ.–आसीन.

( अ ) कर्मणि वर्तमानधातुसाधितें–वर्तमानकाळीं धातूचीं कर्मणि रूपें बनतांना जें अंग होतें त्याला मान प्रत्यय लागून बनतात. जसें, नी १ उ. नीय –नीयमान, कृ–क्रियमाण, दा–दीयमान इत्यादि.

२७५. **भविष्यधातुसाधितें**—सामान्यभविष्यकाळीं धातूंचें जें अंग बनतें त्याला धातु परस्मैपदी असल्यास **अत्** व आत्मनेपदी असल्यास **मान** लागून कर्तरि भविष्यधातुसाधितें बनतात. अत् पूर्वी अंगाच्या अन्त्य अ चा लोप होतो. जसें, भू–भविष्यत्, या–यास्यत्, जि–जेष्यत्, कृ–करिष्यत्–करिष्यमाण, युध्–योत्स्यमान

( अ ) कर्मणि भविष्यधातुसाधितें कर्तरि आत्मनेपदी भविष्यधातुसाधितां-प्रमाणेंच होतात. जसें, कृ–करिष्यमाण.

२७६. **भूतकालवाचक धातुसाधितें**—धातूंना **त** ( क्त ) प्रत्यय लागून कर्मणि व भावे भूतकालवाचक आणि **तवत्** ( क्तवतु ) प्रत्यय लागून कर्तरि भूतकालवाचक धातुसाधितें बनतात. जसें, कृ–कृत ( केलेलें )–कृतवत् ( ज्यानें केलें आहे असा ). संधि व इतर फेरफार दोहोंपूर्वी सारखेच होतात. म्हणून फक्त कर्मणि भूतकालवाचक धातुसाधितांचींच उदाहरणें येथें दिलीं आहेत. यांनाच पुढें वत् जोडला कीं कर्तरि रूपें होतात.

(अ) दहाव्या गणांतील धातु व प्रत्ययान्त धातु यांना आणि इतरहि बऱ्याच सेट् धातूंना त व तवत् प्रत्ययांपूर्वी इ आगम होतो. इ पूर्वी दहाव्या गणाचा इ (पान ६६ टीप), प्रयोजक धातूंचा इ, पौनःपुन्यवाचक धातूंचा य, आणि इच्छार्थक धातु व नामधातु यांचा अन्त्य अ यांचा लोप होतो.

या--यात, जि--जित, नी--नीत, श्रु--श्रुत, भू--भूत, कृ--कृत, मुच् मुक्त (३२), त्यज्--त्यक्त, रुह्--रूढ (७०, २०, ३१) दह्--दग्ध (७० अ, १९, १७), मुह्--मूढ, मुग्ध (७० आ), सृज्--सृष्ट (६८ अ, २०) दृश्--दृष्ट (६८ अ, २०), लभ्--लब्ध (१९, १७), जीव्--जीवित, चुर् --चोरित, गण्--गणित; कृ प्रयोजक कारि--कारित, भुज् इच्छार्थक--बुभुक्षित, लिह् पौनःपुन्यार्थक लेलिह्य--लेलिहित, गरुड--गरुडाय--गरुडायित.

(आ) द्कारान्त व ऱ्कारान्त धातूंना लागतांना त व तवत् (इ आगम रहित असतील तेव्हां) यांच्या आद्य त् चा न् होतो. जसें, भिद्--भिन्न (१८) सद्--सन्न, स्तॄ--स्तीर्ण १३१ (३), १३० (१); पॄ--पूर्ण २१० अ, १३० (२), क्षुद्--क्षुण्ण (२७, २३ २०).

(इ) य्, र्, ल् किंवा व् ज्यांत आहे असें जोडव्यंजन आरंभीं असणाऱ्या आकारान्त धातूंना आणि तसेंच आणखी कांहीं धातूंना लागतांना इ आगमरहित अशा त चा न होतो. जसें, म्लै म्लान (१७०) द्रा--द्राण (२३), स्त्यै--स्त्यान (१७०), ली--लीन, लू--लून, भञ्ज्--भग्न (३२ व खालील उ नियम पहा).

(ई) संप्रसारण होणाऱ्या धातूंचें संप्रसारण होतें (६, १७८). जसें, वच्--उक्त, स्वप्--सुप्त, प्रच्छ्--पृष्ट (६८ अ, २०), व्यध्--विद्ध, वस्--उषित.

(उ) कांहीं धातूंच्या (२१९) उपान्त्य अनुनासिकाचा ह्या प्रत्ययांपूर्वी लोप होतो. जसें, बन्ध्--बद्ध (१९) भञ्ज्--भग्न; ग्रन्थ्--ग्रथित.

(ऊ) इ आगमरहित त पूर्वी अनुनासिकान्त धातूंतील उपान्त्य स्वर प्रायः दीर्घ होतो. जसें, शम्--शान्त, श्रम्--श्रान्त. परंतु गम्, नम्, यम्, रम्, मन्, हन् व ८ व्या गणांतील सर्व अनुनासिकान्त धातु यांचा उपान्त्य स्वर दीर्घ न होतां अन्त्य अनुनासिकाचा लोप होतो. जसें, गम्--गत, नम्--नत, तन्--तत, क्षण्--क्षत.

(ऋ) व् कारान्त धातूंच्या अन्त्य व् चा २४३ प्रमाणें इ आगमरहित त प्रत्ययापूर्वी ऊ होतो. जसें, दिव्–द्यूत; पण सेव्–सेवित.

(ॠ) **अनियमित**. स्था–स्थित, मा–मित, सो–सित, शो–शित, धा–हित; पा–पीत, गै–गीत; दा–दत्त; आदा–आत्त, उपआदा–उपात्त, जन्–जात, खन्–खात; अद्–जग्ध; स्फाय्–स्फीत; प्याय्–प्यान, पीन; धाव् (धुणें)–धौत; पच्–पक्व; शुष्–शुष्क; कृश्–कृश, फल्–फुल्ल; हा–हीन, हा (जाणें) हीन इत्यादि.

(ऌ) हा त (क्त) प्रत्यय गतिवाचक धातु आणि अकर्मक धातु व स्था, रुह् अशा कांहीं धातूंना **कर्तरिसुद्धां** लागतो.

(ए) हा त प्रत्यय कांहीं धातूंना **वर्तमानकालार्थींहि** लागतो. जसें, राज्ञः मतः पूजितः = राजाला मान्य पूज्य असणारा. इ.

**२७७. परोक्षभूत धातुसाधितें**–परस्मैपदी धातूंना वस् प्रत्यय लागून कर्तरि परोक्षभूत धातुसाधितें बनतात व परोक्षभूतकाळीं अविकारक प्रत्ययापूर्वी धातूंचें जें अंग बनतें तेंच ह्या वस् पूर्वी बनतें. (**क्वसुश्च**।) जसें, श्रु शुश्रु–शुश्रुवस्, कृ–चकृ–चकृवस्, भिद्–बिभिद्–बिभिद्वस्; इ ईय्–ईयिवस्, चोरयांचकृवस् आसिवस् बभूवस्.

(अ) आकारान्त धातु (१७०) व द्वित्व झाल्यावर एकाक्षरी अंग बनणारे धातु यांना वस् पूर्वी इ आगम होतो. जसें, स्था-तस्थ्-तस्थिवस्, सद्-सेद्–सेदिवस्, वच्-ऊच्–ऊचिवस्.

**आनियमित**. गम्–जग्मिवस्–**जगन्वस्**, हन्–जघ्निवस् **जघन्वस्**, इ. ॠकारान्त धातूंमध्यें १३१ (२), २१० अ, १३० (१) प्रमाणें फेरफार झाल्यावर मग द्वित्व होऊन हा वस् प्रत्यय लागतो. तसें तॄ–तीर्–तितीर्–तितीर्वस्, पॄ–पुपूर्वस्.

आत्मनेपदी धातूंना आन प्रत्यय लागून कर्तरि परोक्षभूत धातुसाधितें बनतात, आणि धातूंचें परोक्षभूतकाळीं जें अंग होतें तेंच ह्या आन पूर्वी होतें. जसें, कृ चक्राण (१२), नी–निन्यान (१५७ अ), दा–ददान, स्तु–तुष्टुवान [१३१ (३)], भिद्–बिभिदान, यज्–ईजान, वच्–ऊचान.

कर्मणि परोक्षभूत धा. सा. अर्थात् आत्मनेपदी कर्तरि धा. सा. प्रमाणें.

## धातुसाधित अव्ययें

**२७८. पूर्वकालवाचक धातुसाधित अव्ययें**—एकाच कर्त्याच्या अनेक क्रियांपैकीं पूर्वींच्या एक किंवा अनेक क्रिया दर्शविणाऱ्या धातूंना त्वा प्रत्यय लागून पूर्वकालवाचक अव्ययें बनतात. त( क्त )प्रत्ययांपूर्वी धातूचें जें अंग होतें प्रायः तेंच त्वा पूर्वी होतें. जसें, भुक्त्वा व्रजति ( जेवून जातो ); स्नात्वा भुक्त्वा पीत्वा व्रजति; त्रै-त्रात्वा (१७०), जि-जित्वा, श्रु–श्रुत्वा, भू–भूत्वा, हन्–हत्वा, तॄ--तीर्त्वा, पॄ-पूर्त्वा ( **समानकर्तृकयोः पूर्वकाले।** )

( १ ) दहाव्या गणांतील धातु व प्रत्ययान्त धातु आणि श्वि, डी, शी, पू, जॄ हे स्वरान्त धातु व व्यंजनान्त सेट् धातु यांना त्वा पूर्वी इ आगम होतो; वेट् धातूंना व अन्, अम् अन्ताच्या पुष्कळ धातूंना व इतर कांहीं धातूंना इ आगम विकल्पानें होतो. त्वा प्रत्यय अविकारक आहे; पण इ आगमयुक्त त्वा पूर्वी धातूंतील अन्त्य स्वराचा व उपान्त्य ह्रस्व स्वराचा गुण होतो. मात्र व् खेरीज कोणतेंहि व्यंजन अन्तीं असणाऱ्या व्यंजनादि धातूंच्या उपान्त्य इ, उ चा विकल्पानें गुण प्रायः होतो. दहाव्या गणांतील धातु व प्रयोजक धातु यांच्या इ चा त्वा पूर्वी लोप होत नाहीं. जसें,जीव्-जीवित्वा, शी-शयित्वा, चुर्-चोरि-चोरयित्वा, कृ प्रयोजक कारि-कारयित्वा, तन्-तनित्वा-तत्वा, खन्-खनित्वा-खात्वा,दम्-दमित्वा-दान्त्वा; लिख्-लिखित्वा-लेखित्वा; द्युत्–द्युतित्वा, द्योतित्वा; पण दिव्–देवित्वा.

( २ ) न खेरीज कोणतेंहि अव्यय पूर्वपद असून त्याचा त्वा प्रत्ययान्त धातुसाधिताशीं समास होत असेल तर त्वा ला य आदेश होतो; आणि धातूच्या अन्तीं ह्रस्व स्वर असेल तर य पूर्वी त् आगम होतो. जसें, आनीय, वियुज्य, अधिकृत्य, अधीत्य, प्रतिश्रुत्य, अलंकृत्य, नमस्कृत्य, अन्तर्धाय, द्विधाभूय; पण अकृत्वा ( ३४० आ ).

( ३ ), दा, धा किंवा हीं रूपें धारण करणारे धातु व मा, स्था, गै ( गा ), पा, हा ( टाकणें ), सो ( सा )यांचा आ ह्या य पूर्वी तसाच राहतो. जसें, आदाय, प्रस्थाय, विहाय; पण दत्त्वा स्थित्वा, हित्वा इ.

(४) २७६ (ऊ) मध्यें सांगितलेले धातु उपसर्गयुक्त असतां त्यांच्या अन्त्य अनुनासिकाचा ह्या य पूर्वी विकल्पानें लोप होतो व लोप होतो तेव्हां मागें

ह्रस्व स्वर असल्यास वरील (२) प्रमाणें य ला त् आगम होतो. जसें, प्रणम्य-प्रणत्य, निहन्य--निहत्य.

(५) १० व्या गणांतील धातूंच्या व प्रयोजक धातूंच्या इ चा य पूर्वी लोप होतो; पण इ मागचा स्वर लघु असल्यास इचा अय् होतो. जसें, विगणय्य, प्रबुध् प्रयोजक प्रबोधि--प्रबोध्य, प्रशमय्य.

**२७९. पौनःपुन्यार्थक धातुसाधित अव्ययें**—धातूंना त्वा किंवा अम् प्रत्यय लागून पूर्वकालवाचक पौनःपुन्यार्थक अव्ययें बनतात व त्यांचें द्वित्व होतें. सामान्यभूतकाळीं धातूंचें कर्मणि प्र. पू. ए. मध्यें जें अंग बनतें ( २७० ) तेंच ह्या अम् प्रत्ययापूर्वी बनतें. अर्थात् अ आगमरहित अंग घ्यावयाचें. जसें, स्मृ—स्मारंस्मारं किंवा स्मृत्वास्मृत्वा = वारंवार स्मरून, भुज्—भोजं भोजं—भुक्त्वाभुक्त्वा, पा—पायंपायं—पित्वापीत्वा, श्रु—श्रावंश्रावं—श्रुत्वाश्रुत्वा, कृ—कारंकारं--कृत्वाकृत्वा.

कांहीं विशिष्ट उपपदें मागें असतां धातूंना हा अम् प्रत्यय लागतो व तेव्हां त्याचें द्वित्व होत नाहीं. जसें, अग्रेभोजं व्रजति = आधीं जेवून मग जातो; समूलघातं हन्ति = समूळ नाश करतो, यावज्जीवं, इ.

**२८०. हेत्वर्थक धातुसाधित अव्ययें**—धातूंना तुम् प्रत्यय लागून हेत्वर्थक अव्ययें बनतात. अनद्यतन भविष्यकाळीं धातूंचें जें अंग बनतें (१८१ तें १८६ ) तेंच ह्या तुम् पूर्वी बनतें. जसें, दा—दातुं, जि—जेतुं, तॄ—तरितुं,—तरीतुं, गै—गातुं, वह्—वोढुं, चुर्—चोरयितुं, जीव्—जीवितुं, शम्—शमयितुं, दृश्—द्रष्टुं. ( **तुमुन्ण्वुलौ क्रियायां क्रियार्थायाम् ।** )

**२८१. विध्यर्थक धातुसाधित विशेषणें**—धातूंना तव्य, अनीय आणि य हे प्रत्यय लागून विध्यर्थक विशेषणें बनतात. तीं ‘ योग्यता, आवश्यकता, शक्यता ’ हेहि अर्थ दर्शवितात. हे तीनहि प्रत्यय सकर्मक धातूंना कर्मणि व अकर्मक धातूंना भावे लागतात.

( क ) तव्य प्रत्ययापूर्वी धातूंचें अनद्यतन भविष्यकाळाप्रमाणेंच अंग बनतें ( १८१ ते १८६ ). जसें, जि—जेतव्य, श्रु—श्रोतव्य, भू—भवितव्य, कृ—कर्तव्य, छिद्--छेत्तव्य, दृश्--द्रष्टव्य ( ६८ अ, २० ), गम्--गन्तव्य, चुर्--चोरयितव्य, पातयितव्य, बुभुक्षितव्य, पा पेपीय पेपीयितव्य इ.

( ख ) **अनीय** प्रत्ययापूर्वी धातूंतील अन्त्य ऱ्हस्व किंवा दीर्घ इ, उ, ऋ चा व उपान्त्य ऱ्हस्व इ, उ, ऋ, ऌ चा गुण होतो. जसें, श्रु–श्रवणीय, कृ–करणीय, छिद्–छेदनीय, गम्–गमनीय, दृश्–दर्शनीय, पा–पानीय, इ.

ह्या अनीयपूर्वी १० व्या गणांतील धातु व प्रयोजक धातु यांच्या इ प्रत्ययाचा ( धातूंतील तन्निमित्तक फेरफार कायम राहून ) व इच्छार्थक धातूंच्या अन्त्य अ चा लोप होतो. तसेंच पौनःपुन्यार्थक धातूंच्या य प्रत्ययामागें स्वर असल्यास अन्त्य अ चा व य मागें व्यंजन असल्यास य चा लोप होतो. जसें, तड्–ताडनीय, पत् प्रयोजक–पातनीय, पा इच्छार्थक–पिपासनीय, पा–पेपीय–पेपीयनीय, लिह्–लेलिह्य–लेलिहनीय.

( ग ) य प्रत्यय लागतांना स्वरान्त धातूंत पुढील फरक होतातः—(१) अन्त्य आ चा ( १७० ) ए होतो. जसें, दा–देय, गै–गेय, धे--धेय, सो–सेय. (२) अन्त्य इ, ई चा गुण होतो. जसें, जि–जेय, नी–नेय. (३) अन्त्य ऋ, ॠ ची वृद्धि होते. जसें, कृ–कार्य, तॄ–तार्य. ( ४ ) अन्त्य उ, ऊ चा गुण होतो, पण य प्रत्ययान्त धातुसाधित जर ' आवश्यकता ' दर्शवीत असेल तर वृद्धि होते. जसें, श्रु–श्रव्य ( ऐकण्याजोगें ); श्राव्य–(अवश्य ऐकण्याजोगें ); लू–लव्य, लाव्य.

( घ ) य लागतांना व्यंजनान्त धातूंत पुढील फेरफार होतातः—( १ ) उपान्त्य ऱ्हस्व इ, उ, ऌ चा गुण होतो. जसें, भिद्–भेद्य, बुध्–बोध्य, क्लृप्–कल्प्य; पण पूज्–पूज्य, कृष्–कृष्य, नृत् नृत्य, निन्द्–निन्द्य.(२) उपान्त्य अ ची वृद्धि होते, परंतु अन्त्य व्यंजन प वर्गांतील असल्यास अ तसाच राहतो. जसें, पठ्–पाठ्य, वच्–वाच्य, त्यज्–त्याज्य, ग्रह्–ग्राह्य; पण क्षम्–क्षम्य, शप्–शप्य, लभ्–लभ्य, रम्–रम्य.

( ङ ) ह्या य प्रत्ययापूर्वी प्रायः अन्त्य च् चा क्, ज् चा ग् होतो. जसें, वच्–वाच्य, वाक्य, पच्--पाक्य, सिच्--सेक्य, युज्--योग्य, योज्य; भज्–भाग्य, भाज्य; भुज्--भोग्य, भोज्य.

(च) **अनियमित**. कृ—कार्य, कृत्य. भृ–भृत्य, मृज्--मृग्य–मार्ग्य ( ३२ ), शंस्--शंस्य, शस्य, शास्--शिष्य, स्तु--स्तुत्य, हन्--वध्य, घात्य, जन्--जन्य, सह्–सह्य, गद्--गद्य, शक्--शक्य.

# धातुसाधित नामें व विशेषणें

२८२. अ (अच्, अप्) हा प्रत्यय धातूंना लागून कर्तृभिन्न कारक किंवा क्रियावाचक पुंल्लिंगी नामें बनतात. ह्या अ पूर्वी धातूंच्या अन्त्य इ,उ,ऋ चा व उपान्त्य ऱ्हस्व इ, उ, ऋ, ऌ चा गुण होतो. जसें, जि--जय, नी--नय, स्तु--स्तव, भू--भव, ग्रह्--ग्रह, जप्--जप, छिद्--छेद, बुध्--बोध, स्पृश्--स्पर्श, क्लृप्--कल्प, उद् इ--उदय, भी--भयं. ( एरच् । ऋदोरप् )

( अ ) अ ( घञ् ) हा प्रत्यय धातूंना लागून प्रायः क्रियावाचक पुँल्लिंगी नामें बनतात. ह्या अ पूर्वी ऱ्हस्व किंवा दीर्घ अन्त्य इ, उ, ऋ ची व उपान्त्य अ ची वृद्धि होते, आणि उपान्त्य ऱ्हस्व इ, उ, ऌ चा गुण होतो. व अन्त्य च, ज्चे क्, ग् प्रायः होतात. जसें, स्रु--स्राव, भू--भाव, तॄ-तार, नश्--नाश, पच्--पाक, रञ्ज्--राग, रंग, भज् --भाग, भिद्--भेद, भुज्--भोग, युज् -योग.

( आ ) कांहीं धातूंना अ ( अच्, अप् ) आणि अ ( घञ् ) हे दोनहि प्रत्यय लागतात. जसें, ग्रह्-ग्रह, ग्राह; स्वन्--स्वन, स्वान, चर्--चर, चार, नद्--नद, नाद.

२८३. उपपद जवळ असतां अ प्रत्यय लागून धातुसाधितें बनतात, आणि उपपदांचा व त्यांचा समास होतो. ह्या अ पूर्वी कांहीं धातूंच्या अन्त्य स्वराची व उपान्त्य अ ची वृद्धि होते, कांहीं धातूंतील अन्त्य स्वराचा व उपान्त्य ऱ्हस्व स्वराचा गुण होतो, अकारान्त धातूंच्या अन्त्य आ चा लोप होतो, व हा अ प्रत्यय लागून बनलेल्या कांहीं धातुसाधितांचा व उपपदांचा समास होतांना उपपदांच्या अन्तीं म् आगम होतो. जसें, कुम्भकार ( कुम्भं करोति इति ), कर्णधार, पुरःसर ( पुरः सरति इति ), पादप ( पादैः--मूलैः पिबति इति ), पयोद, कच्छप, विषमस्थ, विश्वंभर, ( विश्वं भरति इति), भयंकर, विधुंतुद, अभ्रंलिह, पतिंवरा.

ईषत्, दुस् व सु हीं उपपदें जवळ असतां हा अ कर्मणि व भावे लागून धातुसाधितें बनतात. जसें, ईषत्कर, सुकर, दुष्कर, सुलभ, दुर्लभ.

२८४. अ ( अच् ), अक ( ण्वुल् ) प्रत्यय कर्तरि लागून विशेषणें किंवा नामें बनतात. ह्या अकपूर्वी सामान्यभूतकाळच्या कर्मणि प्र. पु. ए. प्रमाणेंच

धातूचें अंग बनतें ( २६८ ). जसें, कृ–कर, शॄ–शर, चर्–चर, दिव्–देव; गै–गायक(१७०),नी–नायक, कृ–कारक, पू–पावक, भिद्–भेदक,वुध्–बोधक.

२८५. तृ–हा प्रत्यय धातूंना कर्तरि लागून नामें व विशेषणें बनतात. ह्या तृ पूर्वीं धातूंत अनद्यतन भविष्यकाळाप्रमाणेंच (१८३ते१८६) फेरफार होतात जसें, जि–जेतृ, दा–दातृ, कृ–कर्तृ, सृज्–स्रष्टृ, गम्–गन्तृ, जन्–जनितृ.

(अ) कधीं कधीं हा तृ प्रत्यय धातूनें दर्शविलेली क्रिया ' नेहमीं करणें, ' 'चांगलें करणें,' 'तसा धर्म असणें' ह्या अर्थींहि लागतो. जसें, कर्ता कटान्.

२८६. इन् हा प्रत्यय धातूंच्या मागें उपपद असेल तर 'नेहमीं करणारा' ह्या अर्थीं लागतो. सामान्यभूतकाळीं कर्मणि प्र. पु. ए. मध्यें धातूंचें जें अंग बनतें, ( २६८ ) तेंच ह्या इन् पूर्वीं बनतें. जसें, अनुया–अनुयायिन्, नगर-वासिन् इ०

(अ) उपमानवाचक उपपद असतांनाहि हा प्रत्यय लागतो. जसें, सिंह-नादिन् ( सिंह इव नदति इति ), इ.

२८७. क्विप् ( ० ) हा प्रत्यय धातूंना कर्तरि लागून त्याचा लोप होतो व कर्ता, क्रिया किंवा साधन दर्शविणारीं नामें बनतात. जसें, द्विष्, क्षुध्, दृश् इत्यादि. धातु ऱ्हस्वस्वरान्त असल्यास अन्तीं त् आगम् होतो. जसें, विश्वजित्, कर्मकृत्, इ–इत् ( जाणणारा ) (३) मर्थाल टीप पहा.

२८८. अन हा प्रत्यय धातूंना कर्तरि लागून पुल्लिंगी नामें व विशेषणें बन-तात. ह्या अन पूर्वीं धातूंतील अन्त्य स्वराचा व उपान्त्य ऱ्हस्व स्वराचा गुण होतो. जसें, रम्–रमण, नन्द्–नन्दन, तप्–तपन, वृध्–वर्धन.

(अ) परंतु हा अन प्रत्यय जेव्हां क्रिया, साधन किंवा स्थल या अर्थीं लागतो तेव्हां नपुंसकलिंगी नामें बनतात. जसें, दा–दानं, गै–गानं, ध्यै–ध्यानं, या–यानं, नी–नयनं, शी–शयनं, गम्–गमनं, भुज्–भोजनं, दृश्–दर्शनं भू–भवनं, तप्—तपनं, वृध्–वर्धनं इ.

(आ) प्रयोजकधातूंना व आणखी कांहीं धातूंना हा प्रत्यय लागून स्त्रीलिंगी नामें बनतात. जसें, घट्—घटना, वेदना, याचना.

२८९. त (क्त) हा प्रत्यय लागून क्रियावाचक व स्थलवाचक नपुंसक

नामें बनतात. जसें, गै–गीतं ( गाणें ), गम्–गतं, हस्–हसितं, जीव्–जीवितं इ.; आसितं ( बसायची जागा ), शयितं ( निजण्याची जागा ) इत्यादि.

**२९०. ति** हा प्रत्यय धातूंना लागून क्रियावाचक स्त्रीलिंगी नामें बनतात. ह्या ति पूर्वी (२७६) प्रमाणेंच प्रायः फेरफार होतात. जसें, कृ–कृति, स्तु–स्तुति, गम्–गति, नी–नीति, बुध्–बुद्धि, वच्–उक्ति, स्था–स्थिति, गै–गीति, ज्ञा–ज्ञाति, रुह्–रूढि. क्वचित् ति मधील त् चा न् होतो. जसें, ग्लानि.

**२९१. आ** हा प्रत्यय प्रयोजक धातूंखेरीज ( २८८ आ ) इतर प्रत्ययान्त धातूंना व व्यंजनांत गुरुस्वरात्मक व इतरहि कांहीं धातूंना लागून स्त्रीलिंगी नामें बनतात. जसें,पा इच्छार्थक–पिपासा,बुभुक्षा,पुत्रकाम्या,लू पौनःपुन्यवाचक–लोलूया, ईह्–ईहा, ईक्ष्–ईक्षा, चिन्ता, पूजा, निन्दा, पीडा, कथा, जॄ–जरा.

**२९२. या**–क्रियावाचक. विद्–विद्या, चर्–चर्या, कृ–क्रिया, यज्–इज्या

**२९३ उ** हा प्रत्यय इच्छार्थक धातूंना व इतरहि थोड्या धातूंना कर्त्रर्थी लागून विशेषणें बनतात. जसें, तॄ–तितीर्षु, पा–पिपासु, ज्ञा–जिज्ञासु, मृ–मुमूर्षु, इष्–इच्छु.

**२९४.** मन्, त्र, इत्र, अथु, स्नु, इष्णु, वर, उक, अस् हे प्रत्यय कांहीं विशिष्ट धातूंना लागून धातुसाधितें बनतात. क्रमानें उदाहरणें–जन्मन्, कर्मन्,–भर्मन्, वर्मन्, छद्मन्; पा–पात्रं, श्रु–श्रोत्रं, शस्–शस्त्रं, नी–नेत्रं, मिह्–मेढ्रं, शास–शास्त्रं, खन्–खनित्रं, चर्–चरित्रं, पू–पवित्रं, श्वि–श्वयथु, वेप्–वेपथु, स्फूर्ज्–स्फूर्जथु; स्थास्नु, अलंकरिष्णु; स्थावर; हन्–घातुक, भू–भावुक; मन्–मनस्, वच्–वचस्, नम्–नमस्, चित्–चेतस्.

---

## वाक्यविचार

---

**२९५.** संस्कृतमध्यें वाक्यांतील शब्दांची जुळणी अमुक प्रकारचीच असावी असा म्हणण्यासारखा निर्बंध नाहीं[1]. शब्दांची जुळणी वाटेल तशी

---

१. ‘ संस्कृत्य संस्कृत्य पदान्युत्सृज्यन्ते तेषां यथेष्टमभिसंबंधो भवति। तद्यथा—आहर पात्रं, पात्रमाहरेति । ’–पातञ्जलमहाभाष्य.



केलेली असली तरी कोणत्या शब्दाचा कोणत्या शब्दाशीं संबंध आहे हें त्या शब्दाचा अर्थ, लिंग, वचन, विभक्ति, पुरुष व संदर्भ यांवरून ओळखतां येतें.

वाक्यांतील क्रियापद प्रथम शोधावें. त्याच्या रूपावरून प्रयोग ओळखावा. तसेंच क्रियापदाच्या रूपावरून ( म्हणजे त्याचा पुरुष व वचन यांवरून ) उद्देश्याचा पुरुष व वचन हीं ओळखतां येतात. उद्देश्याची नेहमीं प्रथमा विभक्ति असते. कर्तरिप्रयोगांत कर्ता हाच उद्देश्य असतो; अर्थात् प्रथमान्त नाम ( किंवा सर्वनाम ) हें त्या वाक्यांतील कर्ता होय; क्रियापद सकर्मक असल्यास कर्माची द्वितीया असते, म्हणून द्वितीयान्त नाम हें कर्म होय. कर्मणिप्रयोगांत कर्म हेंच उद्देश्य असतें, तेव्हां त्यांतील प्रथमान्त नाम हें कर्म समजावें; आणि कर्त्याची तृतीया असते तेव्हां तृतीयान्त नाम हा कर्ता होय. विशेष्याचें लिंग, वचन व विभक्ति यांप्रमाणेंच विशेषणाचें लिंग, वचन व विभक्ति हीं होत असल्यानें त्याचा अन्वय सहज लावतां येतो. अर्थात् प्रथमान्त विशेषणाचा उद्देश्याशीं अन्वय होतो. कर्तरि प्रयोगांत द्वितीयान्त विशेषणाचा अन्वय कर्माशीं व कर्मणि प्रयोगांत तृतीयान्त विशेषणाचा अन्वय कर्त्याशीं होतो. भावे प्रयोगांत प्रथमान्त नाम नसतें; तृतीयान्त नाम हें क्रियेचा कर्ता असतें. कर्ता व कर्म यांशिवाय विभक्त्यांचे आणखीहि अर्थ असतात. त्या अर्थांच्या अनुरोधानें विभक्त्यांचे संबंध क्रियापदाशीं किंवा इतर शब्दांशीं लावावे लागतात. कोणत्या विभक्तीचा संबंध कोणीकडे आहे हें पुढें जे निरनिराळ्या विभक्त्यांचे अर्थ सांगितले आहेत, त्यांवरून ओळखावें. निरनिराळ्या विभक्तींतील विशेषणांचा अन्वय अर्थात् त्या त्या विभक्तींतील विशेष्यांकडे लावावा. अव्ययांचा संबंध वाटेल त्या शब्दाशीं असूं शकतो. तो अर्थाच्या अनुरोधानें जाणावा.

२९६. पुष्कळदां वाक्यामध्यें उद्देश्य वापरलेलें नसतें. अशा वेळीं क्रियापदाचें रूप किंवा संदर्भ यावरून तें ओळखतां येतें. जसें, अद्य ग्रामं गच्छामि ।। किं करोषि । अहरहः सन्ध्यामुपासीत । या वाक्यांमध्यें अनुक्रमें अहं, त्वं, द्विजः हे उद्देश्य होत. तसेंच कित्येक वेळां वाक्यांत

क्रियापदहि वापरलेलें नसतें. अशा वेळीं अस्, भू इत्यादि अस्तित्ववाचक धातूंचें योग्य तें रूप अध्याहृत घेतात. जसें, यः क्रियावान् ( अस्ति ) स पण्डितः ( अस्ति ) । निःस्पृहस्य तृणं जगत् ।

२९७. हि, च, वा, तु, चेत्, नु, एव, इव हीं अव्ययें वाक्यारंभीं किंवा पद्याच्या चरणारंभींहि वापरीत नाहींत.

तसेंच अपि, एव, इव ह्या अव्ययांचा ज्या शब्दाशीं संबंध असेल त्या शब्दाजवळच तीं योजतात. जसें, प्रासादशिखरारूढः काकोऽपि गरुडायते । कर्मण्येवाधिकारस्ते । आदित्य इव तेजसा ।

यद् ( जो ) व तद् ( तो ) यांचा नित्य संबंध असल्यानें तीं जोडीनें वापरतात. जसें, बुद्धिर्यस्य बलं तस्य ।

## लिंग

२९८. पुष्कळ संस्कृत नामांचें लिंग त्यांच्या व्युत्पत्तीवरून ठरतें. नामसाधित शब्द व धातुसाधित शब्द या प्रकरणांमध्यें या संबंधाची माहिती जागोजाग दिली आहे. उदाहरणार्थ, इमन् ११२ ( ३ ), अ ( २८२ ) इत्यादि प्रत्यय लागून बनलेलीं ना. सा. व धा. सा. पुंल्लिंगी असतात. ता ११२ ( १ ) व ता, या ( ११९ ), ति ( २९० ), आ, या २९१ ( २ ) इ. प्रत्यय लागून बनलेलीं ना. सा. व धा. सा. स्त्रीलिंगी असतात; तसेंच त्व, य, अ ( ११२ ), य ( ११८ ), अ, अक ( ११९ ), अन २८८ ( अ ). त ( २८९ ) इत्यादि प्रत्यय लागून बनलेलीं ना. सा. व धा. सा. नपुंसकलिंगी असतात.

( अ ) कांहीं संस्कृत नामांचें लिंग मराठीहून भिन्न असतें. जसें, राशि पुं., मित्र ( स्नेही ) न., विघ्न पुं. इत्यादि.

( आ ) कांहीं संस्कृत नामें भिन्न अर्थीं भिन्न लिंगाचीं असतात. जसें, आम्र पुं. = आंब्याचें झाड, आम्र न. = आंवा ( फळ ); बदरी, बदरं; आमलकी=आंवळी, आमलकं=आंवळा.

( इ ) कांहीं संस्कृत नामांनीं दर्शविलेली व्यक्ति पुरुष किंवा स्त्री असून त्या नामांचें लिंग मात्र त्याहून भिन्न असतें. जसें, कलत्रं न. = पत्नी; दाराः [ दार पुं. ] = पत्नी; बन्दि-वन्दी स्त्री. = कैदी; व्यक्ति स्त्री. = व्यक्ति.

## वचन

२९९. संस्कृतामध्यें एकवचन, द्विवचन व वहुवचन अशीं तीन वचनें आहेत. द्विवचन दोन व्यक्ति दर्शवितें व वहुवचन तीन किंवा तिर्हीपेक्षां अधिक व्यक्ति दर्शवितें.

कांहीं नामें नित्य द्विवचनी असतात. जसें, अश्विनौ, दम्पती, यमौ.

कांहीं नामें नित्य बहुवचनी असतात. जसें, वर्षाः स्त्री. =पावसाळा;अक्षताः पुं. = तांदूळ ( पूजेचे ), दाराः पुं. = पत्नी, आपः स्त्री. = पाणी.

मराठीप्रमाणेंच कधीं कधीं वहुवचन बहुमानार्थीं वापरतात. जसें, श्रुतं भवद्भिः । एष देवपादान् विज्ञापयति । इति श्रीशंकराचार्याः ।

कधीं कधीं बोलणारा ( विशेषतः तो श्रेष्ठ दर्जाचा असल्यास ) स्वतःसंबंधाचा उल्लेख बहुवचनानें करतो. जसें, साधयामो वयम् । वयं ब्रूमः । अस्मान्साधु विचिन्त्य इ. । शा. ४.

देशांचीं नांवें प्रायः त्या त्या देशांत राहणाऱ्या लोकांवरून पडलेलीं असतात म्हणून तीं नित्य बहुवचनी असतात. जसें, वङ्गाः ( बंगाल ), आन्ध्राः ( तेलंगण ). पण त्या नांवांना देश, विषय इत्यादि शब्द जोडले असल्यास एकवचन होतें. जसें, वङ्गदेशः.

कुलांतील एखाद्या प्रख्यात पुरुषावरून पडलेलीं कुलांचीं नांवें बहुवचनीं वापरतात. जसें, जनकानां रघूणां च संवन्धः कस्य न प्रियः ।

जातिवाचक नामाचा प्रयोग बहुवचनीं केला तरी चालतो. जसें, ब्राह्मणः पूज्यः किंवा ब्राह्मणाः पूज्याः । येथें ब्राह्मणाः =ब्राह्मण जात; संपन्नो व्रीहिः किंवा संपन्ना व्रीहयः।

## पुरुष

३००. संस्कृतमध्यें प्रथम, मध्यम व उत्तम असे तीन पुरुष आहेत ( १२८ ). प्रथमपुरुषी प्रत्यय ‘ तो, ते ’ या अर्थीं लागतात, मध्यमपुरुषी

प्रत्यय ‘ तूं, तुम्ही ’ या अर्थी आणि उत्तमपुरुषी प्रत्यय ‘ मी, आम्ही ’ या अर्थी लागतात. जसें, गच्छति=तो जातो, गच्छन्ति = ते जातात, गच्छसि= तूं जातोस, गच्छामि = मी जातों, गच्छामः = आम्ही जातों.

प्रचलित मराठी व्याकरणांतील पुरुषांबद्दलची परिभाषा इंग्रजीवरून घेत-लेली आहे. परंतु ती पूर्वपरंपरेस सोडून आहे.

## प्रयोग

३०१. क्रियापदाचा पुरुष व वचन हीं उद्देश्याचा पुरुष व वचन यां-प्रमाणें असतात. कर्तरिप्रयोगांत कर्ता उद्देश्य असतो, म्हणून क्रियापदाचा पुरुष व वचन हीं कर्त्याप्रमाणें असतात. जसें, कटं करोति देवदत्तः । ग्रामं गच्छामो वयम् । कर्मणिप्रयोगांत कर्म उद्देश्य असतें, म्हणून क्रियापदाचा पुरुष व वचन हीं कर्माप्रमाणें असतात. कर्माची प्रथमा व कर्त्याची तृतीया असते. जसें, जलं पीयते रामेण। पादौ प्रक्षाल्येते । त्वं सेव्यसे जनैः । भावेप्रयोगांत केवळ भाव म्हणजे क्रियाच उद्देश्य असते, म्हणून क्रियापद नेहमीं प्रथमपुरुषी एकवचनी असतें. जसें, जीव्यते मनुष्यैः मनुष्येण वा ।

३०२. कर्तरिप्रयोगांत निरनिराळे पुरुष दर्शविणारे अनेक कर्ते असले तर धातूला उत्तमपुरुषी प्रत्यय लागतात व उत्तमपुरुषी कर्ता नसेल तर मध्यम-पुरुषी प्रत्यय लागतात. कर्मणिप्रयोगाला हाच नियम लागू आहे; मात्र कर्त्या-ऐवजीं कर्मावरून पुरुष ठरतो. दोनहि प्रयोगांत क्रियापदाचें वचन उद्देश्यांच्या एकंदर संख्येवरून ठरतें. जसें, त्वमहं देवदत्तश्च गच्छामः। त्वमहं च गच्छावः। देवदत्तस्त्वमहं चाहूयामहे आचार्येण । इत्यादि.

मराठींत कर्त्याच्या किंवा कर्माच्या लिंगाप्रमाणें क्रियापदाचें रूप बदलतें तसें संस्कृतांत बदलत नाहीं. जसें, वृक्षः—शाखा—फलं पतति ।

३०३. दुह्, याच्, प्रच्छ्, दण्ड् ह्या किंवा ह्या अर्थाच्या कांहीं द्विकर्मक धातूंच्या ( ३१४ ) व गतिवाचक धातूंच्या प्रयोजकाच्या गौण कर्माची कर्म-णिप्रयोगांत प्रथमा होते. जसें, माणवकं मार्गं पृच्छति देवदत्तः । माणवको मार्गं पृच्छ्यते देवदत्तेन । कृष्णो गोविंदं ग्रामं गमयति। कृष्णेन गोविंदो ग्रामं गम्यते.

( अ ) परंतु नी, हृ, कृष्, वह् ह्या किंवा या अर्थाच्या धातूंच्या प्रधान कर्माची कर्मणिप्रयोगांत प्रथमा होते. जसें, ग्राममजां नयति कृष्णः। ग्राममजा नीयते कृष्णेन.

( आ ) तसेंच ज्ञान,भक्षण व अध्ययन या अर्थाच्या धातूंच्या प्रयोजकाचा कर्मणिप्रयोग करतांना इच्छेप्रमाणें गौण किंवा प्रधान कर्म प्रथमान्त करतां येतें. जसें, बोधयति माणवकं धर्ममाचार्यः। बोध्यते माणवको धर्मं आचार्येण किंवा बोध्यते माणवकं धर्मः आचार्येण। भोजयति पुत्रमपूपाञ्जननी। भोज्यते पुत्रोऽपूपाञ्जनन्या किंवा भोज्यन्ते पुत्रमपूपा जनन्या। अध्याप्यते शिष्यो न्यायमाचार्येण किंवा अध्याप्यते शिष्यं न्याय आचार्येण।

३०४. जेव्हां क्रियेचें अतिसौकर्य दाखवावयाचें असतें तेव्हां कर्त्याखेरीज इतर कारकांना म्हणजे साधन, आधार इत्यादींना कर्तृत्व येतें. जसें, साधु असिश्छिनत्ति ( तरवार चांगली कापते )। येथें असिः या साधनाला कर्तृत्व आलें आहे. साधु स्थाली पचति ( तपेली चांगली शिजवते म्हणजे तपेलींत भात इ. चांगला होतो ) येथें स्थाली या आधाराला कर्तृत्व आलें आहे.

परंतु कर्मास जेव्हां कर्तृत्व येतें तेव्हां सकर्मक क्रियापदें अकर्मक होतात, मात्र त्यांचीं रूपें कर्मणि रूपांप्रमाणें होतात. याला **कर्मकर्तरि** प्रयोग म्हणतात. जसें, पच्यते ओदनः ( भात ) शिजतो )। भिद्यते काष्ठं स्वयमेव(लांकूड आपोआप फुटतें )। याचा भावे प्रयोगहि होतो. जसें, पच्यते ओदनेन। भिद्यते काष्ठेन।

## विशेषण

३०५. संस्कृतांत विशेषणाचें लिंग, वचन व विभक्ति हीं विशेष्याचें लिंग वचन व विभक्ति यांप्रमाणें असतात. जसें, श्रुतं पुराणं, श्रुता कथा, श्रुतो वृत्तान्तः, मधुरया गिरा, नवे भाजने, सकलासु कलासु, मधुराणां आकृतीनाम्, अवनताभिः शाखाभिः, मलिनैः वस्त्रैः.

( अ ) पुष्कळदां नाम विधेयाप्रमाणें वापरतात; अशा विधेयवाचक नामाचा प्रयोग विशेषणासारखा होतो.अशा वेळीं त्याची विभक्ति तेवढी त्याच्या विशेष्या-( उद्देश्यवाचक नामा- ) प्रमाणें होते, व त्याचें मूळचें लिंग व वचन हीं तशींच

राहतात. जसें, भवत्यधर्मो धर्मः । त्वं जीवितं त्वमसि मे हृदयं द्वितीयम् । भवान्मम परमं मित्रं ( अस्ति ) । भवन्तः अत्र प्रमाणं ( सन्ति ) । माता शत्रुः ( अस्ति ) पिता वैरी येन बालो न पाठितः ।

आणखींहि कित्येक प्रसंगीं नामांचा विशेषणासारखा प्रयोग करतात. जसें, मुनिः कुक्कुरं व्याघ्रं कृतवान् । जानामि त्वां प्रकृतिपुरुषम् । अमरान्वै निबोधास्मान् । अधर्मं धर्मं मन्यते । तेषामन्यतमं देवं पतिं वरय शोभने । नलं राजानमब्रवीत् सा । आम्रः वृक्षः । वरील वाक्यांत व्याघ्रं, प्रकृतिपुरुषं, अमरान्, धर्मं, पतिं, राजानं, आम्रः ह्या नामांचा प्रयोग विशेषणाप्रमाणें केलेला आहे; (मराठीच्या मानानें संस्कृतांतील विशेषण शब्द व्यापक आहे.) अर्थात् कर्मणिप्रयोगांत यांची विभक्ति विशेष्याप्रमाणेंच म्हणजे प्रथमा होईल. मुनिना कुक्करो व्याघ्रः कृतः । ज्ञायसे त्वं प्रकृतिपुरुषः । अमरा वै निबुध्यामहे वयम् तेन अधर्मो धर्मो मन्यते । तेषाममन्यतमो देवः पतिः वर्यताम् । नलो राजा औच्यत ।

द्रोणो व्रीहिः ( अदमण भात ) येथें सुद्धां द्रोण ह्या नामाचा विशेषणासारखा प्रयोग झाला आहे.

३०६. जेव्हां एकाच विशेषणाचा दोन किंवा अधिक विशेष्यांशीं संबंध असतो तेव्हां त्याचें वचन एकंदर विशेष्यांच्या वचनाप्रमाणें होतें. तीनहि लिंगांचीं विशेष्यें असल्यास विशेषण नपुंसकलिंगीं वापरतात. विशेष्यें पुँल्लिंगी व स्त्रीलिंगी असल्यास विशेषण पुँल्लिंगीं वापरतात, पुँल्लिंगी व नपुंसकलिंगी किंवा स्त्रीलिंगी व नपुंसकलिंगी असल्यास विशेषण नपुंसकलिंगी वापरतात. जसें, मृगयाक्षास्तथा पानं गर्हितानि महीभुजाम् । वृद्धौ च मातापितरौ साध्वी भार्या सुतः शिशुः । भर्तव्या... ।

परंतु पुष्कळदां विशेषणाचें रूप अगदीं जवळच्या विशेष्याप्रमाणें होतें. जसें, उद्वेगः कलहः कण्डूः सेव्यमाना च वर्धते ।

## संख्यावाचक शब्द

३०७. ' एक ' पासून ' नवदशन् ' पर्यंतचे संख्यावाचक शब्द फक्त विशेषणासारखे वापरतात. जसें, एकः पटः । एका शाटी । एकं वस्त्रम् । त्रीणि वचनानि सन्ति त्रयश्च पुरुषाः । दशभिः पुत्रैः । द्वादश कुलानि ।

( अ ) ' विंशति ' पासून पुढील सर्व संख्यावाचक शब्द ( १ ) विशेषणाप्रमाणें किंवा ( २ ) नामाप्रमाणें वापरतात. विशेषणें असतात तेव्हां ते नित्य एकवचनी असतात व नामें असतात तेव्हां मात्र तीनहि वचनी असतात. जसें, ( १ ) विंशतिः कुमाराः ( वीस मुलगे ) । विंशत्या पुरुषैः कृतम् । सन्ति शतं गावः । षष्ट्यां शरत्सु । ( २ ) गवां विंशतिः—विंशती—विंशतयः ( गाईंचा एक विसा, दोन विसा इ. ) । गवां सहस्राणि ते दास्यामि । पञ्चाशत् दासीनाम् ।

## सर्वनामें

३०८. सर्वनामें विशेषणाप्रमाणेंच वापरतात. तेव्हां ज्या नामाशीं सर्वनामांचा संबंध असतो त्या नामाच्याप्रमाणेंच सर्वनामांचें लिंग, वचन व विभक्ति हीं असतात. ' युष्मद् ', ' अस्मद् ' ह्या सर्वनामांचीं रूपें मात्र तीनहि लिंगांत सारखींच असतात.

युष्मद् व अस्मद् यांचीं मा, मे, नौ, नः आणि त्वा, ते, वां, वः हीं वैकल्पिक रूपें वाक्यारंभीं व कवितेच्या चरणारंभीं कधींहि वापरीत नाहींत ; तसेंच संबोधनानंतर लगेच किंवा च, वा, ह, अह, एव ह्या अव्ययांचा संबंध असतां तीं वापरीत नाहींत. जसें, देव अस्मान् पाहि । ( ' नः पाहि ' नव्हे ); हरिस्त्वां मां च रक्षतु ( ' त्वा मा च ' नव्हे ) ।

३०९. एतद् व इदम् यांचीं एनं, एनेन, एनां, एनया, एनत्, एनयोः इत्यादि वैकल्पिक रूपें एखाद्या व्यक्तीचा किंवा वस्तूचा उल्लेख एतद् किंवा इदम् यांच्या मुख्य रूपानें पूर्वीं केलेला असून त्यावद्दल आणखी कांहीं सांगावयाचें असेल तेथेंच वापरतात. जसें, अनेन व्याकरणमधीतमेनं छन्दोऽध्यापय ।

( अ ) भवत् ( आपण ) याचा अर्थ युष्मद् सारखा आहे. तरी त्यास क्रियापद प्रथमपुरुषीच लागतें. जसें, आस्तां भवान् ( आपण बसावें ) ।

३१०. किमूच्या कोणत्याहि रूपाला चित्, चन, अपि व स्वित् हीं अव्ययें जोडलीं असतां ' कोणी एक, ' ' कांहीं एक ' असा बोध होतो. जसें, कश्चित् बालः । काचित् बाला । कस्मिंश्चिद् ग्रामे । केषांचिन्मते । केनापि मुनिकुमारेण । कोऽपि युवा । कश्चन पुरुषः । कास्वित् नारी । क्वचित् । कुत्रचित् । क्वापि ।

**३११.** आत्मन् हा शब्द 'आपण' याअर्थी नेहमीं पुंल्लिंगी एकवचनी असतो. जसें, आत्मानं बहुमन्यामहे वयम् ।

## विभक्त्यांचे अर्थ

**३१२.** संस्कृतमध्यें सात विभक्त्या आहेत. ( ४३ ). नामाची विभक्ति त्याचा क्रियापदाशीं किंवा इतर शब्दांशीं जो संबंध असेल त्यावरून ठरते. क्रियापदाच्या संबंधामुळें ठरलेल्या विभक्तीला कारकविभाक्ति व इतर शब्दांच्या संबंधामुळें ठरलेल्या विभक्तीला उपपदविभक्ति म्हणतात. निरनिराळ्या विभक्त्या कोणकोणते संबंध दर्शवितात म्हणजे त्या कोणकोणत्या अर्थी वापरतात तें पुढें दिलें आहे.

**३१३. प्रथमा**—ही विभक्ति कर्तरिप्रयोगांत कर्ता व कर्मणि प्रयोगांत कर्म दर्शविते. जसें, कटं ( चटई ) करोति देवदत्तः । देवदत्तेन कटः क्रियते । पदार्थांचा सामान्य निर्देश करतांनाहि ही विभक्ति वापरतात. जसें, बालः, वृक्षौ, फलानि. हाक मारतांनाहि प्रथमेचा उपयोग करतात, तेव्हां तिला संबोधन म्हणतात. जसें, बाल किमिच्छसि ।

**३१४. द्वितीया**—(१) ही विभक्ति कर्तरिप्रयोगांत कर्म दर्शविते. जसें, जलं पिबति । ग्रामं गच्छति । गृहं प्रविशति ।

( २ ) द्वितीया कालावधि व अंतर दर्शविते; मात्र कालावधीचा व अंतराचा क्रियेशीं किंवा गुणाशीं अखंड संबंध असावा लागतो. जसें, मासं ( महिनाभर ) अधीते । योजनं ( योजनभर ) गच्छति । क्रोशं ( कोसभर ) कुटिला नदी । क्रोशं पर्वतः । ( कोसभर डोंगर ) । मासं कल्याणी । मासं गुडधानाः ( महिनाभर गुडदाणी ) । पण मासस्य द्विः ( महिन्यांतून दोनदां ) क्रोशस्यैकदेशे ( कोसाच्या एका भागांत ) पर्वतः ।

(३) दुह्, याच्, पच्, दण्ड्, रुध्, प्रच्छ्, चि, ब्रू, शास्, जि, मन्थ्, मुष् हे व या अर्थाचे धातु आणि नी, हृ, कृष्, वह् हे व या अर्थाचे धातु यांचीं मुख्य व गौण अशीं दोन कर्मैं असतात. मुख्य कर्माशीं संबद्ध असून अर्थदृष्ट्या ज्याला द्वितीयेहून अन्य विभक्ति लागूं शकते, तें गौणकर्म समजावें. गां ( गोः ) दोग्धि पयः । बलिं ( बलेः ) याचते वसुधाम् । तान् ( तेभ्यः ) सहस्रं दण्डयेत् ( =घ्यावे ) । शिष्यान् ( शिष्येभ्यः ) धर्मं शास्त्याचार्यः । सोऽपृच्छल्लक्ष्मणं सीतां । ग्राममजां नयति गोपालः । इत्यादि.

( ४ ) गति, ज्ञान, भक्षण व अध्ययन या अर्थांचे धातु व अकर्मक धातु यांचें प्रयोजक केलें असतां मूळ क्रियेच्या कर्त्याला तृतीयेऐवजीं ३१५ ( २ ) द्वितीया विभक्ति लागते व ते द्विकर्मक होतात.

शिष्यं वेदमध्यापयति गुरुः। शत्रूनगमयत् स्वर्गम् । बोधयति शिष्यं धर्मम्। भोजयति बालं मोदकान् ।

( ५ ) वरील नियमास कांहीं अपवाद आहेत. नी, वह्, अद्, खाद् यांच्या कर्त्याला तृतीयाच लागते. नाययति-वाहयति भारं दासेन । आदयति-खादयति अन्नं बालेन । पण वह् च्या प्रयोजकाचा कर्ता ' हांकविणारा ' असतो तेव्हां मूळ क्रियेच्या कर्त्याला द्वितीयाच लागते. जसें, वाहयति अश्वान् रथं सूतः । हृ व कृ यांचें प्रयोजक वापरतांना मूळ क्रियेच्या कर्त्याला विकल्पानें द्वितीया लागते. जसें, कारयति कटं देवदत्तं देवदत्तेन वा । हारयति संदेशं दूतं दूतेन वा ।

( ५ ) अस्, आन ( मान ), वस्, त, तवत्, त्वा, तुम्, उ, तृ २८५ (अ), स्नु, इष्णु व आणखी कांहीं प्रत्यय लागून बनलेल्या धातुसाधितांचा प्रयोग करतांना मूळ क्रियेच्या कर्माला द्वितीयाच लागते. हा ३१८ ( २ ) नियमाचा अपवाद होय. जसें, जलं पिबन् । सागरं तितीर्षुः । सख्यमीयिवान् । जलं पीत्वा । जलं पातुम् । ग्रामं गतः । स्नेहं कृतवान् । कर्ता कटान्। इत्यादि.

( ७ ) शी, स्था, आस् हे अधि उपसर्गानें युक्त असतां, वस् हा उप, अनु, आ किंवा अधि उपसर्गानें युक्त असतां, आणि विश् हा अभिनि उपसर्गांनीं युक्त असतां, क्रियेच्या आधारास द्वितीया लागते. जसें, शिलातलमध्यास्ते ।

( ८ ) अन्तरा ( दरम्यान ), अन्तरेण ( खेरीज, दरम्यान ), यावत् ( पर्यंत ), धिक् ( धिक्कार ), विना ( खेरीज ), सर्वतः, परितः उभयतः, अभितः, अधोऽधः उपर्युपरि, अध्यधि या अव्ययांशीं संबंध असणाऱ्या नामाला द्वितीया लागते; उत्तरेण, दक्षिणेन इत्यादि एनप्रत्ययान्त अव्ययांच्या योगानें विकल्पानें द्वितीया किंवा षष्ठी होते. जसें, अन्तरा-अन्तरेण त्वां च मां च कमण्डलुः । अन्तरेण पुरुषकारं न किञ्चिल्लभ्यते । धिक् त्वाम् । सर्पकोटरं यावन्मांसशकलानि प्रक्षिप । वेदिं परितः । दक्षिणेन ग्रामम् ( ग्रामस्य वा ) ।

( ९ ) अनु ( मागून, नंतर ), प्रति ( कडे, संबंधीं ), अभि ( कडे ), परि ( सभोंवतीं ) आणि अति ( पलीकडे, पेक्षां ) या अव्ययांशीं संबंध असणाऱ्या नामाला द्वितीया लागते. जसें, अनु पितरं पुत्रः ( बापाच्या वळणावर मुलगा जातो. ) । भोगैश्वर्यगतिं प्रति । अति देवान् हरिः ।

२१५. तृतीया—ही विभक्ति ( १ ) कर्ता, ( २ ) करण ( साधन ), ( ३ ) हेतु ( कारण; उद्देश ), ( ४ ) विशिष्टस्थितिदर्शक चिन्ह (उपलक्षण) ( ५ ) आणि परिसमाप्ति हे अर्थ दर्शविते.

( १ ) कर्मणि व भावे प्रयोगांत कर्त्याला तृतीया लागते. जसें, नृपः सेव्यते जनैः । आस्यतां भवता ।

( २ ) दात्रेण ( कोयत्यानें ) लुनाति । अश्वेन याति । भारं स्कन्धेन वहति । रूपकत्रयेण पुस्तकं क्रीणाति । भरतेनात्मना चाहं शपे । कतमेन मार्गेण प्रनष्टाः काकाः ।

प्रयोजक धातु वापरतांना मूळ क्रियेच्या कर्त्याला तृतीया लागते. जसें, पाचयति ओदनं देवदत्तेन ।

( ३ ) विद्यया यशः । तव भक्त्या प्रीतोऽस्मि । अध्ययनेन वसति । कापुरुषः स्वल्पकेनापि तुष्यति ।

( ४ ) जटाभिस्तापसः ( जटांवरून तपस्वी ) ।

( ५ ) एखाद्या क्रियेची सिद्धि अमुक कालावधींत किंवा अंतरांत झाली असें सांगतांना कालावधिवाचक व अंतरवाचक नामाला तृतीया लागते. जसें, मासेनानुवाकोऽधीतः । क्रोशेन ( कोसभरांत ) पाठोऽधीतः ।

( ६ ) तृतीया ‘ रीत ’ दर्शविते. जसें, सुखेन जीवति । द्विद्रोणेन धान्यं क्रीणाति । पञ्चकेन पशून् क्रीणाति । प्रकृत्या दर्शनीयः । गार्ग्योऽस्मि गोत्रेण । समेन धावति ।

( ७ ) सह ( सहित, समागमें, बरोबर ) या अर्थाचे शब्द, तुल्य, सदृश या अर्थाचे शब्द, युक्त, रहित असे संयोगवियोगदर्शक शब्द, व गरज, उपयोग, प्रयोजन या अर्थाचे शब्द ( उदा०—किं, अर्थः, गुणः; प्रयोजनं, कार्यं, फलं )

यांच्याशीं संबंध असणाऱ्या नामाला तृतीया लागते. जसें, पुत्रेण सहागतः पिता। धनदेन समस्त्यागे। अर्थोष्मणा विरहितः पुरुषः। गुणैरुपेतः। किं नो राज्येन गोविन्द। देवपादनां सेवकैर्न प्रयोजनम्।

( ८ ) व्यक्तीची एखाद्या अवयवामध्यें व्यंगत। वार्णितांना अवयववाचक नामाला तृतीया लागते. जसें, अक्ष्णा काणः। पादेन खञ्जः।

( ९ ) कृतम्–अलम् ( निषेध) यांच्याशीं संबंध असणाऱ्या नामाला तृतीया लागते. जसें, अलं श्रमेण। कृतमभ्युत्थानेन। विना, पृथक्, नाना यांचाहि विकल्पानें तृतीयान्त नामाशीं प्रयोग होतो. जसें, त्वया विना।

३१६ चतुर्थी–(१) ज्याला उद्देशून एखादी गोष्ट केली जाते तद्वाचक नामाला चतुर्थी लागते. जसें, विप्राय गां ददाति।

शिवाय ही विभक्ति पुढील अर्थ दर्शविते:—

( २ ) हेतु ( उद्देश )–कुण्डलाय ( कुण्डलासाठीं ) हिरण्यम्। रन्धनाय स्थाली। मुक्तये (मोक्षासाठीं) हरिं भजति। आर्तत्राणाय (पीडितांच्या रक्षणाकरितां) वः शस्त्रम्। त्यागाय संभृतोऽर्थः। पुष्पेभ्यो (पुष्पाण्याहर्तुम् ) वज्रति।

( ३ ) परिणाम किंवा फल–क्लृप् (समर्थ–योग्य होणें, कारणीभूत होणें) व याच अर्थाचे संपद् ४ आ., जन्, भू इत्यादि धातु परिणामार्थी वापरतात. वाक्यांत क्वचित् क्रियापद नसतें तेव्हां भू चें रूप अध्याहृत घ्यावें. मूत्राय कल्पते संपद्यते जायते–भवति यवागूः (=कण्हेरी )। उपदेशो हि मूर्खाणां प्रकोपाय, न शान्तये ( भवति )।

( ४ ) उत्पातानें सूचित गोष्ट–वाताय कपिला विद्युत्।

( ५ ) 'सांगणें' या अर्थाचे कथ्, शंस् व 'पाठविणें' या अर्थाचे प्रहि, विसृज् इत्यादि धातु वापरतांना ज्याला सांगावयाचें व ज्याच्याकडे पाठवावयाचें त्याची चतुर्थी होते. जसें, कथयामि ते भूतार्थम्। दूतः रघवे विसृष्टः।

( ६ ) रुच् ( आवडणें ) या अर्थाचे धातु वापरतांना ज्याला आवडतें तद्वाचक नामाला चतुर्थी लागते. जसें, मार्जाराय दुग्धं रोचते। बालाय स्वदतेऽपूपः।

( ७ ) धृ ( ऋण लागणें ) धातु वापरतांना धनकोची व स्पृह् (इच्छिणें) धातु वापरतांना इच्छित वस्तूची चतुर्थी होते. जसें, देवदत्ताय शतं धारयति। पुष्पेभ्यः स्पृहयति । परिक्षीणः कश्चित् स्पृहयति यवानां प्रसृतये ।

( ८ ) क्रुध्, द्रुह्, ईर्ष्य् ( हेवा करणें ), असूय् ( दोष काढणें ) या अर्थाचे धातु वापरतांना ज्याच्यावर कोप आहे त्याची चतुर्थी होते. जसें, देवदत्ताय क्रुध्यति–द्रुह्यति–ईर्ष्यति–असूयति वा । पण क्रुध् व द्रुह् हे उपसर्गयुक्त असतां द्वितीया होते. जसें, देवदत्तमभिक्रुध्यति–अभिद्रुह्यति ।

( ९ ) प्रति किंवा आ उपसर्गयुक्त श्रु ( वचन देणें ) धातु वापरतांना मागणाऱ्याची चतुर्थी होते. जसें, विप्राय गां प्रतिशृणोति राजा ।

( १० ) गतिवाचक धातु वापरतांना पोंचावयाच्या स्थलाची द्वितीया किंवा चतुर्थी होते. जसें, ग्रामं ग्रामाय वा गच्छति--व्रजति--याति वा । पण गति लाक्षणिक असेल तर द्वितीयाच होते. जसें, स पञ्चत्वमगच्छत् । विस्मयं ययौ । उपहास्यतां गमिष्यामि ।

( ११ ) नमस्, स्वस्ति स्वाहा, स्वधा, वषट्, अलम्, प्रभु, शक्त ( समर्थ, जोडीचा ),स्वागतं,कुशलं, हितं–सुखं (हित-सुख--कारक) यांच्याशीं संबंध असणाऱ्या नामाला चतुर्थी लागते. जसें, नमो देवेभ्यः । स्वस्ति प्रजाभ्यः । अग्नये स्वाहा । अलं–प्रभुः–शक्तो मल्लो मल्लाय । स्वागतं–कुशलं भवते । गोभ्यो हितं –सुखम् ।

**३१७. पञ्चमी**—(१) ज्यापासून प्रत्यक्ष किंवा लाक्षणिक वियोग होतो त्यास ही विभक्ति लागते. जसें, ग्रामादागच्छति । वृक्षात्पर्णं पतति । धैर्यात् न चलति । राज्यात् भ्रष्टः । कुतो भवान् ? पाटलिपुत्रात् ।

( २ ) ज्या स्थलापासून किंवा कालापासून अंतर किंवा अवधि मोजला असेल त्याला पंचमी लागते आणि अंतरवाचक नामाला प्रथमा किंवा सप्तमी व कालावधिवाचक नामाला सप्तमी लागते. जसें, वनाद् ग्रामः क्रोशः क्रोशे वा । कार्तिक्याः आग्रहायणी मासे ।

( ३ ) ज्यापासून भय वाटतें, ज्यापासून एखाद्याला रक्षावयाचें किंवा निवारावयाचें आहे, ज्या पदार्थापासून किंवा स्थानापासून एखाद्याची

उत्पत्ति होते, ज्याच्यापासून लपावयाचें आहे, ज्यापासून विमुख ( किंवा परावृत्त ) व्हावयाचें आहे, ज्याच्यापासून विद्या ग्रहण करावयाची आहे त्या प्रत्येकाची पंचमी होते. जसें, व्याघ्राद् बिभेति–भयं वा। यस्मान्नोद्विजते लोकः। चौरेभ्यां रक्षति–त्रायते वा। पापात् निवारयति। यवेभ्यो गां निवर्तयति गोपालः। शृङ्गात् शरो जायते। क्रोधात् भवति संमोहः। हिमालयात् गंगा प्रभवति। उपाध्यायात् निलीयते। अध्ययनात्पराजयते ( अध्ययनापासून कंटाळून परावृत्त होतो )। न निश्चितार्थाद्विरमन्ति धीराः। गुरोरधीते।

( ४ ) दोहोंमध्यें एकाहून दुसऱ्याचें कोणत्याहि बाबतींत आधिक्य किंवा न्यूनता सांगतांना पहिल्याची पंचमी घालतात. जसें, वज्रादपि कठोराणि लोकोत्तराणां चेतांसि। मतिरेव बलाद्गरीयसी। संभावितस्य अकीर्तिर्मरणादतिरिच्यते।

( ५ ) पंचमी कधीं कधीं हेतु ( कारण ) दर्शविते. जसें, दारिद्र्याद् ( दारिद्र्यामुळें ) ह्रियेमति. कारण दर्शविणारें नाम पुँल्लिंगी किंवा नपुंसकलिंगी असेल तर त्याला पञ्चमी विकल्पानें लागते ३१५ ( ३ ). जसें, जाड्येन जाड्यात् वा ( मठ्ठपणामुळें ) बद्धः। अनुमानाचा हेतु दर्शविणाऱ्या नामाचीहि पञ्चमी वापरतात. पर्वतो वह्निमान्। धूमात् ( धुरामुळें--धूर आहे म्हणून )।

( ६ ) पूर्वकालवाचक धातुसाधित अव्यय गाळलें असतां त्यानें दर्शविलेल्या क्रियेच्या कर्मास किंवा आधारास पंचमी लागते. जसें, श्वशुरात् ( श्वशुरं वीक्ष्य ) जिह्रेति। आसनात् ( आसने उपविश्य ) प्रेक्षते।

( ७ ) अन्य, भिन्न या अर्थाचे शब्द; पूर्व, उत्तर, दक्षिण, प्राच् प्रत्यच् यांसारखे शब्द; आरात् ( दूर, जवळ ), ऋते–( खेरीज ) यांच्याशीं संबंध असणाऱ्या नामास पञ्चमी लागते. जसें, अन्य इतरो भिन्नो वा कृष्णात्। ग्रामात्पूर्वः प्राग् वा। ग्रीष्मात्पूर्वो वसन्तः। त्वत् ऋते–( तुझ्याखेरीज ).

( ८ ) प्रभृति, आरभ्य, बहिः, ऊर्ध्वं, परं, अनन्तरं, आ ( पासून, पर्यंत ), प्रति ( प्रतिनिधि, ० च्या बदली ); विना, नाना, पृथक् ३१५ ( ९ ) यांच्याशीं संबंध असणाऱ्या नामास पंचमी लागते. जसें, बाल्यात्प्रभृति-आरभ्य। ग्रामाद्बहिः। मरणात्परं–उर्ध्वं–अनन्तरं वा। दृष्टं बहोः कालात्

( परं ) = फार काळानंतर; आसमुद्रात् (समुद्रापर्यंत); आमूलात् (मूळापासून); अभिमन्युरर्जुनतः प्रति। तिलेभ्यः प्रति माषान् यच्छति ( तिळांच्या बदली उडीद देतो )। रामाद् विना इत्यादि.

( ९ ) दूर व समीप अर्थांच्या शब्दांशीं संबंध असणाऱ्या नामास पञ्चमी किंवा षष्ठी लागते. जसें, ग्रामात् ग्रामस्य वा दूरं–समीपम्।

३१८. षष्ठी—( १ ) ही विभक्ति स्वस्वामी, जन्यजनक, सेव्यसेवक, अवयवावयवी, अंशांशी, गुणगुणी इत्यादि जोड्यांमधील संबंध दर्शविते. जसें, मम गृहम्। रामस्य पिता। दशरथस्य पुत्रः। पशोः पादः। मृदां चयः। शरदां शतं। रामस्य शौर्यं।

( २ ) धातुसाधितानें दर्शविलेल्या क्रियेच्या कर्त्यास व कर्मास षष्ठी लागते. जसें, कृष्णस्य कृतिः (कृष्णाचें करणें)। जगतः स्रष्टा। सतां पालकः। गवां दोहः।

( ३ ) परंतु वाक्यांत कर्ता व कर्म दोनहि असतील तेव्हां फक्त कर्मालाच षष्ठी लागते व कर्त्याची तृतीया होते ३१५ ( १ ). जसें, आश्चर्यो गवां दोहोऽगोपेन।

( ४ ) त ( क्त ) प्रत्ययान्त धातुसाधितें जेव्हां वर्तमानकालवाचक ( २७६ ए), क्रियावाचक व स्थलवाचक (२८९)असतात तेव्हां त्यांचा प्रयोग षष्ठ्यन्त नामाशीं करतात. जसें, राज्ञः पूजितः ( राजाला पूज्य असणारा ), पण राज्ञा पूजितः ( राजानें पूजिलेला ); छात्रस्य हसितं ( शिष्याचें हंसणें ); इदमेषामासितं शयितं वा ( हीं यांची बसायची–निजायची जागा. )

( ५ ) तव्य–अनीय–य प्रत्ययान्त विध्यर्थक धातुसाधितांच्या कर्त्याची तृतीया किंवा षष्ठी होते. जसें, मया मम वा सेव्यो हरिः। पण कर्ता व कर्म एकदम येतात तेव्हां तृतीयाच होते. जसें, नेतव्या ग्राममजा त्वया।

( ६ ) पुष्कळांतून एकाचा ( एका भागाचा ) कोणत्या तरी बाबतींत वेगळेपणा सांगावयाचा असतां, ज्यापासून वेगळेपणा दर्शवावयाचा तद्वाचक शब्दाची षष्ठी किंवा सप्तमी होते. बुद्धिमतां बुद्धिमत्सु वा कर्तारः श्रेष्ठाः। गवां गोषु वा कृष्णा ( गौः ) बहुक्षीरा। धुर्यः साहसिकानाम्।

( ७ ) अमुक अवधींत एखादी गोष्ट अमुक वेळां झाली असें सांगतांना अवधिवाचक नामाची षष्ठी होते. जसें, द्विः पञ्चकृत्वो वा अह्नः भुंक्ते ।

( ८ ) एखादी गोष्ट घडल्यापासून अमुक अवधि झाला असें सांगतांना ती क्रिया दर्शविणाऱ्या धातुसाधित विशेषणाची व त्याच्या विशेष्याची षष्ठी वापरतात. जसें, अद्य दशमो मासस्तातस्योपरतस्य ।

( ९ ) भेद, अन्तर या अर्थांचे शब्द षष्ठ्यन्त नामाशीं वापरतात. जसें, अत्रभवतो मम च समुद्रपल्वलयोरिवान्तरम् । को भेदः पिककाकयोः ।

(१०). 'हेतु' शब्द वापरतांना हेतुभूत पदार्थास व 'हेतु' शब्दास षष्ठी लागते. अन्नस्य हेतोः [ अन्नासाठीं ]. परंतु हेतु, निमित्त, कारण, प्रयोजन असल्या शब्दांचा एखाद्या सर्वनामासह प्रयोग करतांना या शब्दांची व सर्वनामाची प्रायः वाटेल ती विभक्ति वापरतात. जसें, को हेतुः, केन हेतुना, कस्मात् कारणात्, कस्मै हेतवे, किं निमित्तं, किं कारणं वसति ।

( ११ ) तस् प्रत्ययान्त दिग्वाचक शब्द व त्याच अर्थाचे उपरि, अधः, पुरः, पश्चात्, अग्रे, पुरस्तात् असले शब्द आणि कृते, पारे, मध्ये, समक्षं ह्या शब्दांशीं संबंध असणाऱ्या नामाची षष्ठी होते. जसें, ग्रामस्य दक्षिणतः-उत्तरतो वा । वृक्षस्योपरि–अधः इत्यादि. ममाग्रे-- पुरस्तात्--पश्चात्–पुरः समक्षं वा । समुद्रस्य पारे- मध्ये वा । राज्यस्य कृते ।

( १२ ) आयुष्यं, भद्रं, कुशलं, सुखं, अर्थः, हितं हे शब्द आशीर्वादार्थी वापरतांना त्यांच्याशीं संबंध असणाऱ्या नामाला चतुर्थी किंवा षष्ठी लागते, जसें, भद्रं कृष्णस्य कृष्णाय वा भूयात् ।

( १३ ) 'स्मरणें', 'प्रभुत्व असणें' या अर्थांचे धातु, दय्, अनु कृ (सारखें वागणें ), व्यव हृ, पण् (=जुगार, क्रयविक्रय ), यांच्या कर्माला प्रायः षष्ठी लागते. जसें, मातुः स्मरति–अध्येति वा । अर्थानामीशिषे त्वम् । दीनानां दयस्व । भीमस्यानुकरोति । शतस्य व्यवहरति--पणते वा ।

( १४ ) योग्य, अनुरूप, सदृश, अभिज्ञ इत्यादि शब्दांचा षष्ठीशीं प्रयोग होतो. क्वचित् सप्तमीशींहि होतो. जसें, अभिज्ञो लोकव्यवहाराणाम् ।

संग्रामाणामकोविदः । उचितः क्लेशानाम् । त्रैलोक्यस्यापि प्रभुत्वं तस्मिन् युज्यते। कथायामभिज्ञः । सर्वविश्रंभेष्वभ्यंतरीकरणीया ।

( १५ ) एक क्रिया होत असतां दुसरी क्रिया घडली असें सांगतांना ( विशेषतः अनादर दर्शवावयाचा असतां ) पहिली क्रिया दर्शविणाऱ्या काल-वाचक धातुसाधित विशेषणाची व त्याच्या विशेष्याची षष्ठी वापरतात. जसें, एवं वदतस्तस्य लुब्धको निभृतः स्थितः। पश्यतोऽपि मे श्येनेनापहृतः शिशुः।

( १६ ) षष्ठीविभक्ति इतर विभक्त्यर्थांच्या बदलींहि वापरण्याचा प्रघात आहे. जसें, तस्य (=तस्मै ) यच्छति ।

**३१९. सप्तमी**–( १ ) ही विभक्ति क्रियेचें स्थल ( किंवा आधार ) व काळ दर्शविते. जसें, आसने उपविशति । शरदि न वर्षति मेघः। अरौ बाणान् क्षिपति ।

( २ ) सप्तमी ही कारण किंवा उद्देश ( हेतु ) दर्शविते. जसें, छिद्रेषु अनर्था बहुलीभवन्ति । चर्मणि ( कातड्यासाठीं ) द्वीपिनं हन्ति । क्षेत्रे ( शेता-साठीं ) विवदन्ते । सृष्टोऽसि धात्रा कर्मसु ( कर्में करण्यासाठीं ) ।

( ३ ) अमुक काळानंतर किंवा अंतरावर एखादी क्रिया होते, असें सांगतांना कालवाचक किंवा स्थलवाचक नामाची सप्तमी किंवा पंचमी होते. जसें, इहस्थोऽयं क्रोशे क्रोशाद्वा लक्ष्यं विध्यति । अद्य भुक्त्वाऽयं द्व्यहे द्व्यहाद्वा भोक्ता ।

( ४ ) या विभक्तींचा स्थल किंवा आधार हा अर्थ लाक्षणिकहि समजावा. जसें, मयि स्निह्यति । इमामाश्रमधर्मे नियुंक्ते । त्वयि अनुपपन्नमिदम् । केशेषु गृह्णाति ( केसांला धरतो ) । पुत्रे राज्यभारं निक्षिप्य । मूर्खें न विश्वसेत्। पितरि विनयेन वर्तस्व । स्वयोषिति रतिः । विषयेषु निःस्पृहः । पुत्रे कुटुंबभारं आरोप्य । लोकस्तु भुवने जने ( ' लोक ' हा शब्द भुवन व जन या अर्थीं वापरतात । मातरि साधुः भ्रातरि असाधुः । द्यूते निपुणः–पटुः इ. । गृह-कर्माणि व्यापृता–व्यग्रा–आसक्ता–तत्परा वाः । इत्यादि.

( ५ ) एक क्रिया होत असतां किंवा झाली असतां दुसरी क्रिया घडली असें सांगतांना पहिली क्रिया दर्शविणाऱ्या कालवाचक धातुसाधित विशेषणाची

व त्याच्या विशेष्याची सप्तमी वापरतात. जसें, कर्णं ददाति मयि भाषमाणे ( मी बोलत असतांना ) । गोषु दुह्यमानासु गतः । गोषु दुग्धासु आगतः । दरिद्रेषु आसीनेषु ऋद्धाः भुञ्जते ।

क्वचित् विशेष्य अध्याहृत असतें; त्या वेळेस एवं, इत्थं, तथा, इति इत्यादि शब्द वापरतात. जसें, तथा कृते -अनुष्ठिते । इति स्थिते, एवं गते ।

## काळ व अर्थ यांचे उपयोग

**३२०. वर्तमानकाळ**—वर्तमानकाळाचें रूप क्रिया चालू आहे किंवा नेहमीं होत असते, तसेंच नुकतीच झाली किंवा थोड्या वेळानें होणार आहे असें दर्शवितें. जसें, क्रीडति ( खेळतो, खेळत आहे, खेळत असतो ); कदा आगतोऽसि । अयमागच्छामि ( हा येतों = नुकताच आलों ); कदा गमिष्यसि । अयं गच्छामि (हा जातों=थोड्याच वेळानें जाईन )। किं करोमि । क्व गच्छामि ।

संकेतवाक्यांत वर्तमानकाळाचें रूप भविष्यकाळ दर्शवितें. जसें, देवश्चेद्वर्षति ( वर्षिष्यति ) तर्हि धान्यं वपामः ( वप्स्यामः ). यावत् किंवा पुरा या निश्चयार्थक अव्ययांसह वर्तमानकाळचें रूप वापरलें असतां तें भविष्यकाळ दर्शवितें. जसें, आलोके ते निपतति पुरा ( तुझ्या दृष्टीस खास पडेल ).

स्म ह्या अव्ययासह वर्तमानकाळचें रूप वापरलें असतां तें भूतकाळ दर्शवितें. जसें, वसति स्म ( राहिला, राहत होता--असे ).

**३२१. अनद्यतनभूतकाळ**–अद्यतन=आजचा ( ११५ ). अनद्यतन= आजचा नसलेला—आजच्या पूर्वीचा. ह्या काळाचें रूप चालू दिवसाच्यापूर्वी क्रिया झाली असें दर्शवितें; तसेंच गोष्टी किंवा वृत्तान्त सांगतांनाहि ह्या काळाचीं रूपें वापरतात.

**३२२. परोक्षभूतकाळ**—परोक्षभूतकाळाचें रूप बोलणाऱ्याच्या पश्चात् ( परोक्ष ) व चालू दिवसापूर्वी क्रिया झाली असें दर्शवितें. याचीं रूपें गोष्टी किंवा वृत्तान्त—विशेषेंकरून प्राचीन काळचा—सांगतांना वापरतात. या काळाचीं उत्तमपुरुषी रूपें संभवत नाहींत. आपण शुद्धीवर नसतांना केलेली क्रिया सांगतांना किंवा क्रिया करून ती छपविण्यासाठीं नाहीं केली असें म्हणतांना क्वचित् या काळाचीं उ. पु. रूपें येतात. जसें, सुप्तोऽहं किल विललाप ( मी

झोपेंत शोक-विलाप केला )। बहु जगद पुरस्तात्तस्य मत्ता किलाहम् ( मी उन्मत्त होऊन त्याच्यापुढें पुष्कळ बोलल्यें )। कलिंगेष्ववात्सीः किम्। ( कलिंग देशांत राहिला होतास ? )। नाहं कलिंगाञ्जगाम ( कलिंगदेशांत मी मुळींच गेलों नाहीं ).

**३२३. सामान्यभूतकाळ**-या काळाचें रूप सामान्यतः कोणतीहि भूतकालीन क्रिया-विशेषेंकरून चालू दिवशीं किंवा नुकतीच झालेली-क्रिया दर्शवितें. जसें, अभूत् ( झाला आहे ). ह्या काळचें रूप मा किंवा मास्म यासह वापरलें असतां आज्ञार्थाचा बोध होतो व अशा वेळीं आगमाचा लोप होतो. जसें, मा शुचः ( शोक करूं नकोस ); मा भूत् ( न होवो ).

**३२४. अनद्यतनभविष्यकाळ**—अद्यतन=आजचा ( ११५ ). अनद्यतन=आजचा नसणारा—आजच्या नंतरचा. ह्या काळाचें रूप चालू दिवसानतर क्रिया होणार आहे असें दर्शवितें. जसें, युध्यस्व जेतासि रणे सपत्नान्। श्वो गन्तास्मि ।

**३२५. आज्ञार्थ**-ह्याचीं रूपें विधि ( आज्ञा ), विनंती, उपदेश, आशीर्वाद इत्यादि अर्थ दर्शवितात. जसें,

विधि ( आज्ञा )-शीघ्रं गच्छ, गच्छतु । प्रार्थना, विनंती-भिक्षां देहि। आशीर्वाद-चिरं जीव । अवतु युष्मानीशः । उपदेश-शुश्रूषस्व गुरून् । सत्कारनियोग-मम पुत्रं भवानध्यापयतु । इ.

( अ ) आज्ञार्थाचीं कर्मणि रूपें सभ्यतापूर्वक आज्ञा दर्शवितात. जसें, श्रूयताम् ( ऐकावें )। आस्यताम् ( बसावें )।

( आ ) निषेधवाक्यांत आज्ञार्थाच्या रूपांबरोबर न हें अव्यय न वापरतां नेहमीं मा हेंच वापरतात. जसें, मा कुरु । मा भवतु ।

**३२६. विध्यर्थ**-विधि ( आज्ञा ), संभव, प्रार्थना, शक्यता इत्यादि अर्थी विध्यर्थाचीं रूपें वापरतात. जसें, सत्यं ब्रूयात् । लभेत सिकतासु तैलमपि। भो भोजनं लभेय । त्वं जडमपि भारं वहेः ।

**३२७. क्रियातिपत्त्यर्थ**-अतिपत्ति=अनिष्पत्ति. दोन वाक्यार्थांमध्यें कार्यकारणसंबंध असून क्रिया झालीं नसेल किंवा व्हावयाची नसेल तेथें ह्याचीं रूपें वापरतात. जसें, सुवृष्टिश्चेदभविष्यत्तदा सुभिक्षमभविष्यत् ।

## धातुसाधितांचे विशिष्ट उपयोग

३२८. धातुसाधितें मूळचीं कोणत्याहि काळाचीं असलीं तरी त्यांचा काळ त्यांच्याशीं संबंध असणाऱ्या क्रियापदाच्या काळाप्रमाणें जाणावा. जसें, वसन् ददर्श ( राहात होता तेव्हां पाहिलें )। ताडयिष्यन् अभ्यद्रवत् ( मारण्याचा हेतु धरून अंगावर धांवून गेला ).

३२९. त (क्त), तवत् (क्तवतु), वस्. तव्य, अनीय आणि य हे प्रत्यय लागून बनलेलीं धातुसाधितें वाक्यांत पुष्कळ वेळां क्रियापदाप्रमाणें वापरतात. जसें, तेन कटः कृतः। वाच्यस्त्वया राजा ( तूं राजाला सांग )। इदमुक्तवान् ( हें बोलला )। इत्यूचिवान् सस्मितम्।

( अ ) गतिवाचक धातु, अकर्मक धातु आणि स्था, रुह्, जन् यांसारखे कांहीं ( उपसर्गानें सकर्मक होणारे ) धातु यांना लागलेला त ( क्त ) प्रत्यय कर्मवाचक किंवा भाव ( म्हणजे क्रिया ) वाचक असून शिवाय कर्तृवाचकहि असतो. जसें, गतो देवदत्तो ग्रामम्। गतो देवदत्तेन ग्रामः। गतं देवदत्तेन। ग्लानो भवान्। ग्लानं भवता। आसितो भवान्। आसितं भवता। उपस्थितो गुरुं भवान्। उपस्थितो गुरुर्भवता। आरुढो वृक्षं भवान्। दैवीं सम्पद-मभिजातोऽसि।

३३०. हेत्वर्थक अव्यय हेतु (उद्देश) दर्शवितें. जसें, भवन्तं द्रष्टुं ( भेट-ण्यासाठीं, भेटण्याच्या उद्देशानें ) आगतः।

पण इच्छिणें, समर्थ असणें, धजणें, जाणणें, झटणें, आरंभणें, मिळविणें, सहन करणें, पात्र (योग्य) असणें आणि असणें, 'या अर्थांच्या धातूंशीं, त्याच-प्रमाणें पर्याप्ति ( पूर्णता ), सामर्थ्य, नैपुण्य व काल या अर्थांच्या शब्दांशीं तुम् प्रत्ययान्त धा. सा. अव्ययाचा हेतु हा अर्थ नसतांहि प्रयोग होतो. जसें, कर्तुं इच्छति–शक्नोति–जानाति–यतते–प्रारभते–प्रक्रमते इ; भोक्तुं अस्ति, विद्यते इ., भोक्तुं समर्थः, भोक्तुं कालः, कर्तुं निपुणः इ.

अर्ह् धातूशीं तुम् प्रत्ययान्त धा. सा. अव्ययाचा प्रयोग 'प्रार्थना, विनंती' दर्शवितो. जसें, श्रोतुमर्हति भवान् ( आपण कृपा करून ऐकावें )।

तुम् प्रत्ययान्त धा. सा. अव्ययाचें कर्म कर्मणि व भावे प्रयोगांत तसेंच राहतें. परंतु मुख्य क्रियेचें कर्म व धातुसाधितानें दर्शविलेल्या क्रियेचें कर्म जर एकच असेल तर मात्र त्याची कर्मणि प्रयोगांत प्रथमा होते. जे धातु सकर्मक व अकर्मक असे दोन्ही होऊं शकतात, अशा धातूंचा मुख्य क्रियेप्रमाणें प्रयोग असेल तर तुमन्ताच्या कर्मांची विकल्पानें प्रथमा होते म्हणजे त्याचे कर्मणि व भावे दोन्ही प्रयोग होतात. स मां द्रष्टुमागच्छति । तेन मां द्रष्टुमागम्यते । सर्वः कल्ये वयसि यतते लब्धुमर्थान् । सर्वेण कल्ये वयसि यत्यते लब्धुमर्थान् अपूपान्भोक्तुमहं लभे । अपूपाः भोक्तुं मया लभ्यन्ते । अपूपान् भोक्तुमहमिच्छामि । अपूपाः भोक्तुं मया इष्यन्ते किंवा अपूपान्भोक्तुं मया इष्यते ।

शक्, युज्, अर्ह् ह्या व या अर्थांच्या धातूंचा व शब्दांचा तुम् प्रत्ययान्त धा. सा. शीं प्रयोग असून त्याचा कर्मणि किंवा भावे प्रयोग करावयाचा असल्यास त्या धा. सा. च्या कर्माची विकल्पानें प्रथमा होते. जेव्हां प्रथमा होत नाहीं तेव्हां क्रियापद प्र. पु. ए. असतें, धातुसाधित असल्यास त्याचें न. ए. होतें. तव पुत्रानहं अध्यापयितुं शक्नोमि । तव पुत्राः मया अध्यापयितुं शक्यन्ते किंवा तव पुत्रान् अध्यापयितुं मया शक्यते । न न्याय्यं निहतं शत्रुं भूयो हन्तुं नराधिपाः । न न्याय्यो निहतः शत्रुः भूयो हन्तुं नराधिपाः । अचिराधिष्ठितराज्यः शत्रुः समुद्धर्तुं सुकरः किंवा अचिराधिष्ठितराज्यं शत्रुं समुद्धर्तुं सुकरम् ।

## ३३१. कांहीं अव्ययांचे विशिष्ट प्रयोग

**अथ** हें ‘ जर ’ अर्थी वाक्यारंभीं येतें. जसें, अथ कौतुकं, आवेदयामि । **अथ किम्** हें ‘ होय ’, ‘ तसेंच, ’ ‘ तर काय ? ’ या अर्थी प्रश्नाच्या उत्तरांत येतें. जसें, लक्ष्मण, किं भरतः प्राप्तः । अथ किम् ।

**अपि** हें प्रश्नवाचक असतां वाक्यारंभीं येतें. जसें, अपि वृषलमनुरक्ताः प्रकृतयः । अथ किम् ।

**इति** हें समाप्ति, अनुवाद, हेतु ( कारण ), नातें ( दृष्टि ), प्रमाण ( आधार ) इत्यादि अर्थ दर्शवितें. जसें, इति प्रथमोऽध्यायः । ‘ अधीष्व

भगवन्'इति गुरुं ब्रूयात् । उत्खातिनी भूमिरिति (म्हणून, यासाठीं,या कारणानें) रथवेगो मन्दीकृतः । पिता इति स पूज्यः, अध्यापकः इति निन्द्यः । इति श्रुतिः ( वेद ) ।

इव ( प्रमाणें ) हें उपमानवाचक शब्दानंतर वापरतात व त्यानें जोडल्या जाणाऱ्या शब्दांची विभक्ति एकच असते. जसें, मृतमिवात्मानं संदर्श्य । अपत्ये इव मयि वर्तते ।

इव तसेंच नु किंवा वा हें किम् च्या रूपांस जोडून वापरतात तेव्हां तें 'संभव' दर्शवितें. जसें, कः इव–कोनु–कोवा=कोण बरें, किमिव=काय बरें, कमिव इत्यादि.

**किम्, किमुत, किं पुनः, किमङ्ग**=किती तरी अधिक ( किंवा कमी ).

क्व हें दोन वाक्यांत येतें तेव्हां त्या वाक्यांनीं दर्शविलेल्या अर्थांमध्यें महदन्तर किंवा विसदृशता आहे असा बोध होतो. जसें, तपः क्व वत्से क्व च तावकं वपुः ।

**ननु** [ न+नु ] हें अव्यय वादामध्यें शंकावाक्याच्या किंवा आक्षेप-वाक्याच्या आरंभीं येतें. अशा वाक्याच्या शेवटीं 'इति चेत्' येतें.

**नाम** हें अव्यय ज्या नामांना जोडतें त्यांची विभक्ति एकच असते. जसें, पाटलिपुत्रे नाम नगरे ।

**यथा, यद्** हीं जेव्हां अनुवादवाक्याच्या आरंभीं येतात तेव्हां त्यांचा 'कीं' असा अर्थ होतो. जसें, आज्ञापितोऽस्मि परिषदा यथा ( कीं ) अद्य त्वया नवं नाटकं नाटयितव्यमिति ।

## शब्दांची द्विरुक्ति

**३३२.** नामाची द्विरुक्ति 'प्रत्येक', 'सर्व' असा अर्थ दर्शवितें. जसें, दिने दिने=दररोज । वृक्षं वृक्षं सिंचति । त्याचप्रमाणें 'अनुक्रम' दर्शविण्या-साठींहि नामाची द्विरुक्ति करतात. जसें, मूले मूले स्थूलः=बुडख्याकडे मोठा होत गेलेला. ज्येष्ठं ज्येष्ठं प्रवेशय=ज्येष्ठानुक्रमानें आंत सोड. कधीं कधीं 'धमकी, कोप, भीति, घांदल, गडबड' हेहि अर्थ होतात. जसें, चौर चौर हनिष्यामि त्वाम् । माणवक माणवक अविनीतक अविनीतक इदानीं ज्ञास्यसि जाल्म । सर्पः सर्पः बुध्यस्व बुध्यस्व ।

क्रियापदाची व अव्ययाची द्विरुक्ति ' वारंवार ', ' फार ' हे अर्थ दर्शविते. जसें, जल्पति जल्पति । लुनीहि लुनीहि ( तोड तोड ) इति लुनाति । मन्दं मन्दं=अति मंदपणें; भुक्त्वा भुक्त्वा, स्मारं स्मारंम्=वारंवार–पुनः पुनः स्मरून.

उपरि, अधि, अधः यांची द्विरुक्ति केली असतां ' सामीप्य ' हा अधिक अर्थ तींत येतो. उपर्युपरि ग्रामम्=गांवाच्या जवळच वरच्या बाजूला.

क्रियेचा विनिमय दर्शविण्यासाठीं कांहीं सर्वनामांची द्विरुक्ति करतात, व त्यांचा प्रायः समास होतो. जसें, इतरेतरं–परस्परं–अन्योन्यं नमन्ति=एकमेकांला नमस्कार करतात । अन्योन्यस्मै दत्तम् ।

---

## समासविचार

२३३. परस्परसंबंध असलेले दोन किंवा अधिक शब्द जोडून जो एक शब्द बनवितात[1] त्यास **समास** म्हणतात. समासाच्या योगानें अर्थ संक्षेपानें व्यक्त करतां येतो.

तत्पुरुष, बहुव्रीहि, अव्ययीभाव आणि द्वंद्व असे समासांचे चार मुख्य प्रकार आहेत. ज्या समासांचा ह्या चार प्रकारांत अन्तर्भाव होत नाहीं, त्यांस सामान्यसमास ( सुप्सुप् ) म्हणतात.

२३४. शब्दांचा समास होतांना पूर्वपदाच्या विभक्तिप्रत्ययाचा लोप होतो म्हणजे त्याचें मूळरूप राहतें. समासांतील पूर्वपद उत्तरपदाशीं जोडतांना अन्त्य व आद्य वर्णांचा नित्य संधि होतो. पूर्वपद व्यंजनान्त असल्यास त्याचें पद अंग ( ७२ टीप ) होतें. समासाच्या पोटांत न् चा ण् व स् चा ष् होणें, स् किंवा म् आगम येणें, वर्णांचा लोप होणें, शब्दांना आदेश होणें, स्वरांचें ऱ्हस्व दीर्घ होणें इत्यादि फेरफार विशिष्ट प्रसंगीं होतात, ते विस्तारभयास्तव येथें दिले नाहींत.

---

१. परस्परसंबंध असणाऱ्या वाटेल त्या शब्दांचा समास होतो किंवा केलाच पाहिजे असें मात्र नाहीं.

३३५. समासाचा अर्थ सांगणाऱ्या वाक्यास **विग्रह** म्हणतात, अर्थात् हें वाक्य व्याकरणशुद्ध असलें पाहिजे. समासाचा अर्थ सांगतांना समासांतलिच शब्द वापरावेत. जेथें तसें शक्य नसेल तेथें योग्य ते समानार्थक शब्द वापरावेत. समास करतांना किंवा सोडवितांना विभक्त्यर्थप्रकरणाचा पुष्कळ उपयोग होईल ( ३१२–३१९ ). जसें, देवानां पतिः—देवपतिः; अग्नेः अगारं-अग्न्यगारं; गुणैः उपेतः—गुणोपेतः; शुक्लः पक्षः—शुक्लपक्षः; विद्वद्रत्नं—विद्वान् रत्नं इव किंवा विद्वानेव रत्नं; सुजनः—शोभनः जनः; सुरक्षितः— सुष्टु रक्षितः, उन्मुखः—उद्गतं मुखं यस्य सः; निर्मक्षिकं—मक्षिकाणां अभावः.

## तत्पुरुष

३३६. ज्या समासामध्यें उत्तरपदाला प्राधान्य असतें त्यास **तत्पुरुष** म्हणतात. जसें, देवानां पतिः—देवपतिः, समये उक्तं—समयोक्तम् ।

तत्पुरुष समास हा त्याच्या उत्तरपदाप्रमाणें नाम, विशेषण किंवा अव्यय होतो, व नाम होतो तेव्हां त्याचें लिंग व वचन हीं उत्तरपदाच्या लिंगवचनाप्रमाणें असतात. जसें, आम्रस्य फलानि—आम्रफलानि; नरेषु उत्तमः नरोत्तमः; मम कृते—मत्कृते.

तत्पुरुषाचे पोटभेदः—( १ ) विभक्तितत्पुरुष, ( २ ) कर्मधारय, ( ३ ) द्विगु, ( ४ ) अव्ययतत्पुरुष आणि ( ५ ) उपपदतत्पुरुष.

## विभक्तितत्पुरुष

३३७. तत्पुरुषांतील पूर्वपदाची जी विभक्ति असेल तीप्रमाणें द्वितीयातत्पुरुष, तृतीयातत्पुरुष, इत्यादि होतात.

(१) **द्वितीया**—ग्रामगतः— ग्रामं गतः, कल्पनातीतः—कल्पनां अतीतः;अन्नं बुभुक्षुः—अन्नबुभुक्षुः, मुहूर्तं सुखं—मुहूर्तसुखं, वर्षभोग्यः—वर्षं भोग्यः.

(२) **तृतीया**—कर्तृवाचक व करण (साधन) वाचक तृतीयान्त नामांचा बहुतेक धातुसाधितांशीं समास होतो. जसें, देवेन दत्तः—देवदत्तः; नखैः निर्भेदः—नखनिर्भेदः, शस्त्रयुद्धं, परशुच्छिन्नः, गुणैः उपेतः—गुणोपेतः; तृतीयान्त शब्दाचा विध्यर्थक धा. सा. शीं झालेला समास निंदा किंवा स्तुति दर्शवितो. काकेन पेया ( नदी )—काकपेया ( जलपूर्णा ), वातच्छेद्यं ( तृणं ).

तृतीयान्त नामाचा कोणत्याहि नामाशीं समास होतो; मात्र अमक्यानें केलेलें, असा अर्थ असला पाहिजे. जसें, शंकुलाखण्डः—शंकुलया ( अडकित्त्यानें, कातरीनें ) केलेला तुकडा, शस्त्रव्रणः, जलार्द्रः.

'कालवण' व 'मिसळण्याचा पदार्थ' या अर्थाच्या तृतीयान्त शब्दांचा अन्न–भक्ष्य–वाचक शब्दांशीं समास होतो. जसें, दध्योदनः–दध्ना ओदनः ( दह्याशीं कालवलेला भात ), क्षीरोदनः, गुडधानाः—गुडेन धानाः ( गुडदाणी ), गुडपृथुकाः ( गूळपोहे ).

तृतीयान्त नामाचा पूर्व, सदृश, ऊन, अधिक, मिश्र इत्यादि कांहीं शब्दांशीं किंवा या अर्थांच्या शब्दांशीं समास होतो. जसें, मासपूर्वः–मासेन पूर्वः (महिन्यानें अगोदरचा–वडील), मातृसदृशः–मात्रा सदृशः, एकेन ऊना (विंशतिः)–एकोना, द्वाभ्यां अधिकं–द्व्यधिकं, अष्टोत्तरं, माषविकल, गुडमिश्र, धान्यार्थः–धान्येन ( लब्धः ) अर्थः.

(३) **चतुर्थी**–विकृति–( बनलेला–बनवावयाचा पदार्थ ) वाचक चतुर्थ्यन्त नामाचा प्रकृति ( मूलद्रव्य ) वाचक नामाशीं समास होतो. जसें, यूपाय दारु–यूपदारु (यज्ञस्तंभाकरितां लांकूड), कुण्डलहिरण्यं–कुंडलाय हिरण्यं; पण रन्धनाय स्थाली येथें समास होत नाहीं; कारण रन्धन (शिजविणें) हें स्थालीची विकृति नव्हे.

चतुर्थ्यन्त नामाचा बलि, हित, सुख, रक्षित यांच्याशीं समास होतो. जसें, काकेभ्यः बलिः–काकबलिः, अश्वाय हितं (हितकारक)–अश्वहितं, अश्वरक्षितं–अश्वेभ्यः रक्षितं.

चतुर्थ्यन्त नामाचा 'अर्थ' (=साठीं, करितां) शब्दाशीं नित्य समास होतो व तो विशेषण होतो. जसें, द्विजार्थः–र्था–र्थं ( द्विजाय अयं–इयं–इदम् ) पायसः–दक्षिणा–वायनं.

( ४ ) **पंचमी**–व्याघ्रभयं–व्याघ्रात् भयं, राक्षसभीतः, ग्रामात् निर्गतः–ग्रामनिर्गतः, अधर्मजुगुप्सुः, पापमुक्तः, तदन्यः–तस्मात् अन्यः.

( ५ ) **षष्ठी**–वीरसेनसुतः–वीरसेनस्य सुतः, राज्ञः पुरुषः ( सेवक )–राजपुरुषः, जलबिन्दुः, सखीनां जनः ( समूहः )–सखीजनः, मम अर्थे–मदर्थे, मत्कृते, त्वत्पुत्रः–तव पुत्रः, श्रुतिमनोहरः, मासजातः–मासः जातस्य.

कांहीं प्रसंगीं भागवाचक शब्द प्रधानपद असूनहि षष्ठीतत्पुरुषांत पूर्वपद होतो. जसें, पूर्वकायः—पूर्वं कायस्य ( शरीराचा पुढला भाग ), अधरकायः, मध्यं अह्नः—मध्याह्नः, मध्यरात्रः—मध्यं रात्रेः; पूर्वाह्णः, पश्चिमरात्रः ( रात्रीचा शेवटचा भाग ). पूर्वपद स्त्रीलिंगी असेल तर त्याचें पुँल्लिंगी रूप होतें. जसें, मृग्याः क्षीरं—मृगक्षीरं, कुक्कुटाण्डं—कुक्कुट्याः अण्डं, काकशावः.

( ६ ) **सप्तमीः**—सप्तम्यन्त शब्दाचा धा. सा. शब्दाशीं, तसेंच प्रावीण्य नैपुण्य इ. अर्थाच्या शब्दाशीं समास होतो. जसें, जले क्रीडा—जलक्रीडा, मार्गस्थितः, पूर्वजन्मकृतं, मासे देयं—मासदेयं, अश्वेषु कोविदः—अश्वकोविदः न्यायनिपुणः. नरोत्तमः; ईश्वरे अधि—ईश्वराधीनः.

## कर्मधारय

३३८. समानविभक्तिक अशा दोन शब्दांच्या तत्पुरुषसमासास **कर्मधारय** म्हणतात. याचे प्रकारः—

( अ ) **विशेषणाचा विशेष्याशीं**—शीतं उदकं—शीतोदकं, वर्तमानकविः, भूतार्थः, सत्पुरुषः, सर्वदेवाः, एकनराधिपः, सप्तर्षयः, महारिपु—महान् रिपुः.

( १ ) विशेषण पूर्वपद असून त्याचा स्त्रीलिंगी विशेष्याशीं कर्मधारय किंवा बहुव्रीहि समास होत असेल तर विशेषण प्रायः पुल्लिंगाप्रमाणें रूप धारण करतें. जसें, कृष्णा चतुर्दशी—कृष्णचतुर्दशी, महती सेना—महासेना, ऊर्ध्वदृष्टिः

( २ ) कित्येक प्रसंगीं विशेषण उत्तरपद होतें व विशेष्य पूर्वपद होतें. जसें, अधमः नरः—नराधमः, अपसदः क्षत्रियः—क्षत्रियापसदः इत्यादि.

**( आ ) ( १ ) विशेषणाचा विशेषणाशीं**—( मात्र त्यांचा एकाच विशेष्याशीं संबंध पाहिजे )—शुक्लकृष्णः ( पांढरा व काळा ), कृष्णश्च सारंगश्च ( चित्रविचित्र )—कृष्णसारंगः, लोहितशवलः, पण उदितास्तौ ( चन्द्रसूर्यौ ).

---

१. महत् शब्द कर्मधारय व बहुव्रीहि समासांत पूर्वपद असेल तर त्याचें ' महा ' असें रूप होतें.

(२) पूर्वकालदर्शकाचा उत्तरकालदर्शकाशीं—स्नातानुलिप्तः पूर्वं स्नातः पश्चात् अनुलिप्तः, सुप्तोत्थितः, मृतजातः ( पुत्रः ), दृष्टनष्टः.

( ३ ) नकाररहित त प्रत्ययान्त धा. सा. चा नकारयुक्त त प्रत्ययान्त धा. सा. शीं समास होतो. जसें, कृताकृतं—कृतं च तत् अकृतं च ( अर्धवट केलेलें ), भुक्ताभुक्तं, दृष्टादृष्टं.

क्वचित् नकाररहित धातुसाधिताशींहि होतो. जसें, कृतापकृतं—कृतं च तत् अपकृतं च, गतप्रत्यागतं.

( इ ) **उपमानवाचकाचा साधर्म्यवाचकाशीं**—मेघश्यामः—मेघः इव श्यामः, विद्युच्चपलः, हिमाशिशिरः ( बर्फाप्रमाणें गार ).

( ई ) **उपमेयवाचकाचा उपमानवाचकाशीं** ( मात्र साधर्म्यवाचकाचा प्रयोग नसला पाहिजे )—पुरुषः सिंहः इव—पुरुषसिंहः, मुखकमलं, राजर्षिः—राजा ऋषिः इव, करकिसलयं—करः किसलयं इव, विद्याधनं—विद्या धनं इव, कन्यारत्नं, विद्वद्रत्नं—वाटल्यास अशा समासांचा विद्या एव धनं—विद्याधनं असाहि विग्रह करावा. पाहिल्या प्रकारांत उपमा होते; दुसऱ्या प्रकारांत रूपक होतें. पण पुरुषः व्याघ्र इव शूरः येथें समास होत नाहीं.

( उ ) **विशेषवाचकाचा सामान्यवाचकाशीं**—साकेतनगरं—साकेतं नाम नगरं, अमात्यराक्षसः—अमात्यः राक्षसः नाम, आम्रवृक्षः, ग्रीष्मर्तुः-ग्रीष्मः नाम ऋतुः, व्याघ्रबुद्धिः—व्याघ्रः इति बुद्धिः.

( ऊ ) **अनियमित**—तेजोविशेषः—विशिष्टं तेजः, अतिथिविशेषः—विशिष्टः अतिथिः, देशान्तरं—अन्यः देशः, भाषान्तरं—अन्या भाषा, गुणान्तरं; उच्चावचं —उदक् च अवाक् च, अकिंचनः—नास्ति किंचन यस्य सः, अकुतोभयः—नास्ति कुतः भयं यस्य सः, चित् एव—चिन्मात्रं, अश्नीतपिबता—अश्नीत पिबत इत्येवं सततं यत्राभिधीयते सा ( क्रिया ), खादतमोदता, अहमहमिका ( अहं पूर्वं अहं पूर्वं इति उच्यते यस्यां क्रियायां सा )

## द्विगु

३३९. समानविभक्तिक अशा दोन पदांपैकीं पूर्वपद संख्यावाचक असून ( १. ) जेव्हां त्या दोहोंचा नामसाधित शब्द बनवावयाचा असेल किंवा (२)

तीं दोनहि मिळून निराळ्याच समासाचें पूर्वपद करावयाचें असेल किंवा ( ३ ) एकाच जातीच्या अनेक व्यक्तींचा समुदाय दर्शवावयाचा असेल तेव्हां त्या समानविभक्तिक दोन पदांचा होणारा समास **द्विगु** होय. जसें, षाण्मातुरः षण्णां मातॄणां अपत्यं, पंचसु कपालेषु संस्कृतः—पंचकपालः ( पुरोडाशः )= पांच विटांच्या तुकड्यांवर भाजलेला; पंच गावः धनं यस्य सः—**पंचगवधनः** ( पांच गाई हीच संपत्ति आहे ज्याची असा ); हा समास नित्य आहे. त्रिभुवनं—त्रयाणां भुवनानां समाहारः, पंचपात्रं, अष्टाध्यायी, चतुःसूत्री, त्रिलोकी, पंचानां पूलानां ( पेंड्यांचा ) समाहारः— पंचपूली ( पाचुंदा ), शतश्लोकी. समाहारद्विगु नित्य नपुंसकलिंगी असतो; परंतु त्याचें उत्तरपद आकरान्त असल्यास तो प्रायः ईकारान्त स्त्रीलिंगी होतो. **अपवाद**. सप्ताहः—सप्तानां अह्नां समाहारः, द्व्यहः इ.

## अव्ययतत्पुरुष

**३४०.** ज्या तत्पुरुषाचें पूर्वपद अव्यय असतें त्यास अव्ययतत्पुरुष असें नांव दिलें आहे. जसें, सुजनः—शोभनः जनः, कुपुत्रः—कुत्सितः पुत्रः, अधिपतिः—अधिष्ठितः पतिः, अधिदैवतं—अधिष्ठातृ दैवतं,सुरक्षितं—सुष्ठु रक्षितं,दुष्कृतं —दुष्टं कृतं, स्वयंकृतं, सुकृतं, कापुरुषः—कुत्सितः पुरुषः, किंप्रभुः—कुत्सितः प्रभुः, किंसखा, तत्रस्थितः, एवंगतः, एवंस्थितः, अतिदूरः—अतिशयेन दूरः, दुर्जनः—दुष्टः जनः, ईषत्पिंगलः.

**प्रादिसमास**—तत्पुरुषाचें पूर्वपद उपसर्ग—अव्यय ( २७१ ) असल्यास हा समास होतो. जसें, अतिमात्रः—अतिक्रान्तः मात्रां, अतीन्द्रियः, अतिवेगः, अपशब्दः, प्रत्युत्तरं, प्रतिपक्षः, अधिज्यं ( धनुः )—अधिगतं ज्यां, निष्कौशांबिः—निष्कान्तः कौशांब्याः, विपक्षः, आरक्तः, उपपदं, उपवनं, प्रकोपः.

**नञ्तत्पुरुष**---न हें अव्यय पूर्वपद असून उत्तरपद व्यंजनादि असल्यास न चा अ होतो व उत्तरपद स्वरादि असल्यास न चा अन् होतो व क्वचित् ठिकाणीं न तसाच राहतो. जसें, न पंडितः—अपंडितः, अज्ञानं, अकृतं, अकृत्वा-न कृत्वा, न अर्थः—अनर्थः, अनध्यायः, नगः—अगः—न गच्छति इति.

**गतिसमास**—यांत गतिसंज्ञक अव्यय पूर्वपद असतें. ( कांहीं अव्ययें धातूंना जोडली असतां त्यांस गति म्हणतात ):— अलंकृत्य ( भूषवून )—

अलं कृत्वा, नमस्कृत्य, अस्तमितः, सत्कृत्य, साक्षात्कृत्य, तिरोभूय, अन्तर्धाय, आविर्भूय, पुरस्कृत्य, उरसिकृत्य (स्वीकार करून), मनसिकृत्य (निश्चय करून), मनोहत्य (वीट येईपर्यंत). च्विप्रत्ययान्त (१२४) अव्ययें गतिच होत. वशीभूतः, दिवाभूता, परिखीकृत.

## उपपदसमास

**३४१.** एखादा शब्द जवळ असतांनाच धातूला कृत् प्रत्यय लागून त्या दोन पदांचा जो समास होतो त्यास उपपदतत्पुरुष म्हणतात. हा नित्य होतो. जसें, कुम्भकारः–कुंभं करोति इति, सुवर्णकारः (सोनार), कर्णधारः (कर्णः–सुकाणू). भारवाहः, आखुभुक्–आखून् भुंक्ते, वीरसूः–वीरं सूते इति, पुरः–सरः, बिलेशयः (शेते), कच्छेन पिबति इति, कच्छपः (कच्छः=मागचा भाग), पादपः–पादैः (मूलैः) पिबति इति, पयोदः–पयः ददाति इति, पंकजं–पंके जायते इति, अभ्रंलिहः–अभ्रं लेढि इति, परंतपः, दुष्करः–दुःखेन क्रियते इति, सुलभः, हृदयदाही–हृदयं दहति इति, मधुरभाषी.

जेव्हां उपपद जवळ नसतांहि धातुसाधित शब्द बनतो, तेव्हां त्याशीं होणारा समास उपपदसमास नव्हे. जसें, धरति इति धरः, पयसः धरः–पयोधरः.

**३४२. अलुक् समास** (पूर्वपदाच्या विभक्तिप्रत्ययाचा लोप न होणारा)—जनुषान्धः [ जनुस् = जन्म ]= जन्मान्ध, आत्मनातृतीयः (आपण धरून तिसरा), परस्मैपदं, दूरादागतः, दास्याःपुत्रः (रांडलेक-शिवी), देवानांप्रियः (मूर्ख), पश्यतोहरः (भामट्या), युधिष्ठिरः (युधि + स्थिरः) = धर्मराज, स्तंबेरमः (हत्ती), कर्णेजपः (चहाडखोर), सरसिजं (कमल), गेहेशूरः (भ्याड), प्रवाहेमूत्रितं (निष्फळ कर्म), भस्मनिहुतं (निष्फळ कर्म).

## तत्पुरुषसमासान्तीं होणारे फेरफार

**३४३.** (अ) भागवाचक व संख्यावाचक शब्द, अव्ययें व सर्व, पुण्य हे शब्द ह्यांचा ‘ रात्रि ’ शब्दाशीं तत्पुरुष झाल्यास रात्रि चा रात्र होतो. जसें,

पूर्वं रात्रेः—पूर्वरात्रः, मध्यरात्रः, द्विरात्रं (द्वे रात्री समाहृते), नवरात्रं, अतिरात्रः (अतिक्रान्तो रात्रिं), सर्वरात्रः; 'अहन्' चा 'रात्रि' शीं अहोरात्रः असा समाहारद्वंद्व होतो.

( आ ) राजन्, अहन्, सखि हे शब्द उत्तरपद असल्यास त्यांचीं अनुक्रमें राज, अह ( प्रायः पुं. ) व सख अशीं रूपें होतात. जसें, महाराजः; मद्राणां राजा—मद्रराजः, उत्तमाहः, द्व्यहः, त्र्यहः, राज्ञः सखा—राजसखः, पण भागवाचक शब्द किंवा अव्यय पूर्वपद असेल तर अहन् चें अह्न (पुं.) होतें. जसें, पूर्वाह्णः, अपराह्णः, मध्याह्नः, अत्यह्नः ( अहरतिक्रान्तः ). पण पुण्याहं.

( इ ) ऋच्, पुर्, अप् , धुर् (=कार्यभार ) व पथिन् हे शब्द कोणत्याहि समासांत अन्तीं असल्यास त्यांस अ प्रत्यय लागून त्यांचीं ऋच, पुर, अप, धुरा,पथ अशीं रूपें होतात. जसें,अर्धर्चः—र्चं, विष्णुपुरं, विमलापं (सरः), राज्यधुरा ( पण रथधूः कारण येथें धूः=जूं ), रम्यपथः.

( ई ) स्तुतिवाचक सु व अति आणि निंदावाचक किम् हीं अव्ययें पूर्वपद असतां समासाच्या अन्तामध्यें कोणताच फेरफार होत नाहीं. तसेंच नञ् तत्पुरुषाच्या अन्तामध्येंहि होत नाहीं. जसें, सुराजा, किंसखा, अराजा.

## बहुव्रीहि

**३४४.** अन्य पदार्थाशीं संबंध असणाऱ्या समानाविभक्तिक शब्दांच्या समासास **बहुव्रीहि** म्हणतात. यांत अन्य पदाची प्रथमेखेरीज कोणतीहि विभक्ति असते व हा समास प्रायः विशेषण होतो. हें अन्यपद ' यद् ' असून त्याच्या विभक्तींवरून द्वितीयाबहुव्रीहि इत्यादि नांवें पडतात. जसें, प्राप्तं उदकं यं(ग्रामं) सः—प्राप्तोदकः ( ग्रामः ), ऊढः रथः येन ( अश्वेन ) सः—ऊढरथः ( अश्वः ), कृतकृत्यः—कृतं कृत्यं येन सः (नरः), दत्तं धनं यस्मै सः—दत्तधनः(याचकः), उद्धृतः ओदनः यस्याः सा—उद्धृतौदना ( स्थाली ), कमलं आसनं यस्य सः—कमलासनः ( ब्रह्मदेवः ), पुष्पिताः द्रुमाः यस्मिन् तत्—पुष्पितद्रुमं ( वनं ), इन्द्रादयः ( देवाः )—इन्द्रः आदिः येषां ते, पंच गावः धनं यस्य सः—पंचगवधनः (गोपः), लज्जावनतमुखी—लज्जया अवनतं—लज्जावनतं, लज्जावनतं मुखं यस्याः सा—लज्जावनतमुखी ( वधूः ), अन्नपानादीनि; समानः धर्मः यस्य सः

–समानधर्मा, सरूपः–समानं रूपं यस्य सः, सपक्षः, सोदरः, अन्यरूपा–अन्यत् रूपं यस्याः सा, चारचक्षुः ( राजा )–चाराः चक्षूंषि यस्य सः, पीतांबरः–पीतं अंबरं (वस्त्रं) यस्य सः, उद्धृतदंष्ट्रः–उद्धृताः दंष्ट्राः यस्य सः, चतुर्मुखः–चत्वारि मुखानि यस्य सः (ब्रह्मदेवः), त्रिलोचनः (शंकरः), दशग्रीवः ( रावणः )

पुष्कळदां बहुव्रीहि हा नामासारखा वापरतात. जसें, सुहृद्=मित्र ( शोभनं हृदयं यस्य सः ), दशमुखः–दशकण्ठः=रावण.

( अ ) क्वचित् ठिकाणीं ब. व्री. समासांतील पदें भिन्नविभक्तिकहि असतात. जसें, चक्रं पाणौ ( =हस्ते ) यस्य सः–चक्रपाणिः ( विष्णुः ); लगुडः हस्ते यस्य सः–लगुडहस्तः ( क्षेत्रपालः ), मणिग्रीवः–मणिः ग्रीवायां यस्य सः, उरसि लोमानि यस्य सः–उरसिलोमा.

( आ ) पूर्वपद समास असून तें उपमानवाचक असेल तर त्यांतील उत्तरपदाचा लोप होतो. जसें, गजाननः ( गणपतिः )–गजाननं ( गजस्य आननं ) इव आननं यस्य सः, खरमुखः.

( इ ) कोठें पूर्वपद अव्यय असतें. जसें, उच्चैर्मुखः–उच्चैः मुखं यस्य सः, इहचित्तः–इह चित्तं यस्य सः, निर्बलः–निर्गतं बलं यस्मात् सः, उन्मुखः–उद्गतं मुखं यस्य सः, सुपुत्रः–शोभनः पुत्रः यस्य सः, प्रपर्णः ( वृक्षः )–प्रपतितानि पर्णानि यस्य सः, आधिज्यं ( धनुः )–अधिरूढा ज्या यस्मिन् तत्, दुर्गन्धिः–दुष्टः गन्धः यस्य सः, अस्तिक्षीरा ( गौः ), अपुत्रः किंवा अविद्यमानपुत्रः–अविद्यमानः पुत्रः यस्य सः, अनन्तः, अनादि, दुर्मनाः, तथाविधः–तादृशी विधा यस्य सः, अधोमुखः–खी–खं, विमुखः.

**३४५. बहुव्रीहिचे आणखी प्रकार**—( १ ) अव्ययें, संख्यावाचक शब्द व आसन्न, अदूर, अधिक हे शब्द यांचा संख्यावाचक शब्दाशीं समास होतो व त्यास बहुव्रीहि म्हणतात. जसें, उपदशाः–दशानां समीपे सन्ति (नऊ किंवा अकरा); द्वित्राः–द्वौ वा त्रयो वा ( दोन किंवा तीन), त्रिचतुराः, पंचषाः, आसन्नविंशाः–आसन्नाः विंशतेः, अदूरविंशाः, अधिकचत्वारिंशाः अधिकाः चत्वारिंशतः, इ.

( २ ) दोन दिशांमधील उपदिशा दर्शवावयाची असल्यास त्या दिशांच्या रूढ नांवांचा बहुव्रीहिसमास होतो. जसें, दक्षिणस्याः च पूर्वस्याः च दिशोः अन्तरालं–दक्षिणपूर्वा ( आग्नेयी ), पूर्वोत्तरा, उत्तरपश्चिमा, पश्चिमदक्षिणा; पण ' ऐन्द्याश्च कौबेर्याश्च दिशोः अन्तरालं ' यांचा समास होत नाहीं; कारण हीं दिशांचीं रूढ नांवें नव्हेत.

( ३ ) ' एकमेकांच्या अवयवांना धरून किंवा एकमेकांवर शस्त्रानें प्रहार करून चाललेलें युद्ध ' या अर्थी अवयववाचक किंवा शस्त्रवाचक दोन पदांचा बहुव्रीहिसमास होतो. मात्र हीं पदें अनुक्रमें सप्तम्यन्त किंवा तृतीयान्त असून एकाच शब्दाचीं रूपें असावीं लागतात. ह्या समासांत पूर्वपदाचा अन्त्य स्वर दीर्घ होतो, व उत्तरपदाच्या अन्तीं इ प्रत्यय लागतो; त्यापूर्वी अन्त्य उ चा गुण होतो व इतर स्वरांचा लोप होतो. हा समास अव्यय होतो. जसें, केशाकेशि–केशेषु केशेषु च गृहीत्वा इदं युद्धं वृत्तं, कचाकचि, बाहूबाहवि; दण्डादण्डि–दण्डैः च दण्डैः च प्रहृत्य इदं युद्धं वृत्तं, मुसलामुसलि, मुष्टीमुष्टि–मुष्टिभ्यां मुष्टिभ्यां प्रहृत्य इत्यादि; पण हलैश्च इत्यादि मुसलैश्च यांचा समास होत नाहीं. कारण, हे शब्द निरनिराळे आहेत.

( ४ ) ' सह ' अव्ययाचा कोणत्याहि तृतीयान्त नामाशीं बहुव्रीहिसमास होतो व 'सह' ला विकल्पानें 'स' असा आदेश होतो. जसें, सह पुत्रेण–सहपुत्रः किंवा सपुत्रः, सहच्छात्रः किंवा सच्छात्रः, इत्यादि.

( ५ ) बहुव्रीहिसमासांत विशेषणें व सप्तम्यन्त शब्द हे पूर्वपद होतात. पण सप्तम्यन्त शब्दांचा शस्त्रवाचक शब्दाशीं समास होत असेल तर ते प्रायः उत्तरपद होतात. जसें, कृतकृत्यः, हस्तव्रणः, लगुडहस्तः इत्यादि.

( ६ ) **अनियमित**. गन्तुं मनः यस्य सः–गन्तुमनाः, श्रोतुकामः, गुडप्रियः, शाकप्रियः.

**३४६.** बहुव्रीहीचें शेवटचें पद आकारान्त स्त्री असेल तर अन्त्य आ चा अ होतो. जसें, द्विजिह्वः ( साप )–द्वे जिह्वे यस्य सः, सभार्यः इ. तसेंच शेवटच्या पदाच्या अन्तीं ई, ऊ किंवा ऋ असेल तर समासाच्या अन्तीं प्रायः क

प्रत्यय लागतो. जसें, बहुनदीकः ( देशः ), सवधूकः, सस्त्रीकः, ईश्वरकर्तृकं, मृतभर्तृका ( स्त्री ). आणखीहि कांहीं ठिकाणीं हा क लागतो. जसें, बहुधनिका ( नगरी ), व्यूढोरस्कः ( पुरुषः ), महायशस्कः ( किंवा महायशाः ).

प्राण्यंगवाचक सक्थि, अक्षि हे शब्द बहुव्रीहीच्या अन्तीं असल्यास त्यांचीं सक्थ व अक्ष अशीं रूपें होतात. जसें, दीर्घसक्थः, विशालाक्षः.

न, दुस्, सु यांचा प्रजा व मेधा शब्दांशीं बहुव्रीहि झाल्यास प्रजा व मेधा यांचीं प्रजस् व मेधस् अशीं रूपें होतात. जसें, अप्रजाः, दुर्मेधाः.

धर्म, धनुस् व ऊधस् (=कांस) हे बहुव्रीहीच्या अन्तीं असल्यास त्यांचीं प्रायः धर्मन्, धन्वन्, ऊधन् अशीं रूपें होतात. जसें, समानधर्मा, पुष्पधन्वा आधिज्यधन्वा, घटोध्नी (९८).

उपमानवाचक शब्द किंवा उद्, पूति, सु, सुरभि हे शब्द पूर्वपद असून त्यांचा गन्ध शब्दाशीं बहुव्रीहि होत असेल तर गन्धचें 'गन्धि' होतें. जसें, पद्मगंधिः ( पद्मस्य गन्धः इव गन्धः यस्य सः ). सुगंधिः—सुरभिगंधिः ( वायुः ).

संख्यावाचक किंवा उपमानवाचक शब्द पूर्वपद असेल तर बहुव्रीहीच्या अन्तीं पाद चें पाद् रूप होतें. जसें, द्विपाद्, त्रिपाद्, व्याघ्रपाद्.

बहुव्रीहीच्या अन्तीं गो चें गु असें रूप होतें. जसें, चित्राः गावः यस्य सः—चित्रगुः.

## अव्ययीभाव

**३४७.** जो समास अव्यय बनतो, त्यास अव्ययीभाव म्हणतात. याचें पूर्वपद प्रायः अव्यय असतें. पुढील समास व त्यांचे विग्रह हे निरनिराळे नमुने समजावेत—दिशयोर्मध्ये—अपदिशं; अपत्रिगर्तं—अप त्रिगर्तेभ्यः; स्त्रीषु अधिकृत्य ( विषयीं )—अधिस्त्रि; उपगंगं—गंगायाः समीपे; आसमुद्रं—आ समुद्रात् (समुद्रापर्यंत ); निर्मक्षिकं—मक्षिकाणां अभावः; अतीतानि हिमानि—अतिहिमं; प्रतिदिनं—दिने दिने, प्रत्यहं; अनुरथं—रथानां पश्चात्; अनुरूपं—रूपस्य योग्यं; अनुज्येष्ठं—ज्येष्ठानां अनुक्रमेण; अनुयमुनं ( यमुनां अनु=यमुनेच्या कांठानें ) मथुरा; यथाविधि—विधिं अनतिक्रम्य; यथाशक्ति; यथावृद्धं ( ये ये वृद्धाः ) ब्राह्मणानामन्त्रयस्व; बहिर्ग्रामं—बहिर् ग्रामात्; प्राग्ग्रामं—प्राक् ग्रामात्; मध्येसमुद्रं—समुद्रस्य मध्ये; पारेगंगं—गंगायाः पारे; परोक्षं—अक्ष्णोः परं, समक्षं—अक्ष्णोः संमुखं,

प्रत्यक्षं; प्रत्यग्नि–अग्निं प्रति; अभ्यग्नि–अग्निं अभि; सतृणं–तृणमपि अपरित्यज्य (भक्षयति ); सम्प्रति–सम् प्रति.

३४८. अव्ययीभाव समासाचें रूप नपुं. प्र. ए. प्रमाणें होतें. जसें, अभ्यग्नि.

( अ ) अव्ययीभाव समासाचा अन्त्य स्वर दीर्घ असल्यास ऱ्हस्व होतो(ए, ऐ चा ऱ्हस्व इ आणि ओ, औ चा ऱ्हस्व उ ). तसेंच अन्त्य न् चा लोप होतो. जसें, अनुयमुनं, उपनदि, उपगु, उपसीमं इ.

## द्वंद्व

३४९. च (=आणि) ह्या अव्ययाच्या अर्थानें संबद्ध असलेल्या शब्दांचा जो समास होतो त्यास **द्वंद्व** म्हणतात. ह्याचे दोन प्रकार आहेत—

(१) ज्या द्वंद्वसमासांतील पदांस सारखेंच प्राधान्य असतें तो **इतरेतर द्वंद्व** होय. जसें, रामश्च कृष्णश्च–रामकृष्णौ, धर्मार्थकाममोक्षाः, शुक्ला च कृष्णा च –शुक्लकृष्णे (गर्तौ), उत्तमाधममध्यमाः, द्वौ च दश च–द्वादश, त्रयस्त्रिंशत्, इ.

( २ ) ज्या द्वंद्वसमासांत पदांच्या म्हणजे त्यांनीं दर्शविलेल्या वस्तूंच्या समुदायास प्राधान्य असतें त्यास **समाहारद्वंद्व** म्हणतात. जसें, पाणिपादं –पाण्योः पादयोः च समाहारः ( समुदायः ); धनधान्यं.

३५०. द्वंद्वसमासांत ह्रस्व इकारान्त व ह्रस्व उकारान्त शब्द, स्वरादि अकारान्त शब्द, कमी अक्षरांचे शब्द, समानाक्षरी शब्दांपैकीं लघु अक्षरांचे शब्द, मान्यतर व्यक्तिवाचक शब्द हे प्रायः अगोदर घालतात. जसें, हरिहरौ, उष्ट्रखरं, धवखदिरपलाशाः, कुशकाशं, गुरुशिष्यौ, सीतारामौ, पार्वतीपरमेश्वरौ.

ज्यांचा अनुक्रम कोणत्या तरी कारणानें ठरलेला आहे असे शब्द त्याच क्रमानें येतात. जसें, हेमन्तशिशिरवसन्ताः ( ऋतुक्रम ), ब्राह्मणक्षत्रियविट्शूद्राः ( वर्णक्रम ); युधिष्ठिरभीमार्जुननकुलसहदेवाः ( जन्मक्रम ).

३५१. द्वंद्वसमासाचें लिंग त्यांतील शेवटच्या पदाच्या लिंगाप्रमाणें असतें व वचन एकंदर पदांनीं दर्शविलेल्या व्यक्तींच्या संख्येवरून ठरतें. जसें, जातिकुले, कर्मशीलगुणाः. समाहारद्वंद्व हा नेहमीं नपुंसकलिंगी व एकवचनी होतो.

**३५२.** प्राण्यांचे अवयव, सेनेचीं अंगें ( पायदळ, घोडदळ, हत्तीदळ, रथ-दळ ), वाद्यें वाजविणारे, तसेंच प्राणी खेरीजकरून जातिवाचक शब्द (सामान्य नामें), क्षुद्रजंतुवाचक शब्द, ज्यांच्यामध्यें नित्य वैर असतें अशांचे वाचक शब्द यांचा समाहारद्वंद्व होतो. जसें, पाणिपादं—पाणी च पादौ च एतेषां समाहारः, शिरोग्रीवं; रथिकाश्वारोहं; हस्त्यश्वरथपादातं; मार्दंगिकपाणविकं; धानाशष्कुलि—धानाश्च शष्कुल्यश्च एतेषां समाहारः ( लाह्या व करंज्या ); धनधान्यं;यूकालिक्षं —यूकाश्च लिक्षाश्च एतासां समाहारः ( उवा व लिखा ), दंशमशकं; अहिश्च नकुलश्च एतयोः समाहारः—अहिनकुलं ( साप व मुंगुस ), मूषकमार्जारं; काकोलूकं.

( अ ) याचप्रमाणें आणखीहि कांहीं शब्दांचा समाहारद्वंद्व होतो. जसें, अजाविकं (=अज+अवि), पुत्रपौत्रं, मूत्रपुरीषं, मांसशोणितं, दासीदासं.

(आ) झाडें, फळें, हरिणें, गवतें, धान्यें, कालवणें, पशु, पक्षी एतद्वाचक शब्दांचा विकल्पानें समाहारद्वंद्व होतो. हे शब्द प्रायः बहुवचनी असावे लागतात; तसेंच ते पोटजाति दर्शविणारे असले पाहिजेत. जसें, बदराश्च आमलकाश्च एतेषां समाहारः—बदरामलकं किंवा बदरामलकाः, बदराणि च आमलकानि च ( फळें ) एतेषां समाहारः—बदरामलकं किंवा बदरामलकानि, प्लक्षन्यग्रोधं—धाः; रुरुपृषतं—ताः (हरिणांच्या जाति); कुशकाशं—शाः; व्रीहियवं—वाः; दधिघृतं—ते; गोमहिषं—षाः; तित्तिरिकपिंजलं—लाः; शुकबकं—काः.

(इ) परस्परविरुद्ध अर्थाच्या गुणवाचकनामांचा विकल्पानें समाहारद्वंद्व होतो. जसें, सुखदुःखं—खे, जीवितमरणं—णे; पण कामक्रोधौ, शीतोष्णे (उदके). कारण हे विरुद्ध अर्थाचे नाहींत.

( ई ) कांहीं शब्दांचा समाहारद्वंद्व न होतां साधाच द्वंद्व होतो. जसें, दधिपयसी, मधुसर्पिषी, शुक्लकृष्णौ, इध्माबर्हिषी, उलूखलमुसले, आद्यवसाने, ऋक्सामे, वाङ्मनसे.

**३५३.** 'विद्यासंबंध किंवा नातें दर्शविणाऱ्या ऋकारान्त शब्दांच्या द्वंद्वसमासांत उपान्त्य पदाच्या अन्त्य ऋ चा आ होतो. जसें,होतापोतारौ (ऋत्विग्भेद), होतृपोतृनेष्टोद्गातारः; मातापितरौ, भ्रातास्वसारौ, यातानानन्दरौ; पण पितृपितामहौ, कारण येथें पितामह ऋकारान्त नाहीं.

( अ ) चवर्गान्त, द्कारान्त, ष्कारान्त व ह्कारान्त समाहारद्वंद्वाला अन्तीं अ प्रत्यय लागतो. जसें, वाक्त्वचं, त्वक्स्रजं, शमीदृषदं, वाक्त्विषं, छत्रोपानहं.

३५४. एकशेष–सरूप व एकविभक्तिक अशा शब्दांचा द्वंद्व बनवितांना त्यांपैकीं एकच राहतो; जसें, वृक्षश्च वृक्षश्च=वृक्षौ, वृक्षश्च वृक्षश्च वृक्षश्च=वृक्षाः पुँल्लिंगी व स्त्रीलिंगी शब्दांपैकीं पुँल्लिंगी राहतो. जसें, हंसौ–हंसी च हंसश्च. याचप्रमाणें श्वशुरौ–श्वश्रूश्च श्वशुरश्च, पुत्रौ–पुत्रश्च दुहिता च, पितरौ–माता च पिता च; किंवा श्वश्रूश्वशुरौ, मातापितरौ.

३५५. जे समास पूर्वी सांगितलेल्या प्रकारांत येत नाहींत त्यांना सुप्सुप् समास म्हणतात. जसें, रत्नं भूतः–रत्नभूतः, स्वयं वरः ( वरणें )–स्वयंवरः, दृष्टपूर्वं–पूर्वं दृष्टं, श्रुतपूर्वं; अद्यश्वः–अद्य वा श्वो वा.

३५६. कधीं कधीं एकाच सामासिक शब्दाचा विग्रह अनेक प्रकारें संभवतो. तो संदर्भावरून ठरवावा लागतो. जसें, महाबाहुः = महान्तौ बाहू यस्य सः, किंवा महान् बाहुः; वनान्तरं=वनस्य अन्तरं किंवा अन्यत् वनं.

३५७. कधीं कधीं समासाचें पूर्वपद सामासिक शब्द असून त्यांतील उत्तर-पदाचा लोप होतो. जसें, शाकप्रियः पार्थिवः–शाकपार्थिवः, छायाप्रधानः तरुः–छायातरुः, विषान्नं=विषमिश्रं अन्नं.

---

# परिभाषिक शब्दांचे अर्थ.

शब्दांपुढील आकडे कलमांचे आहेत. येथें त्यांचें स्पष्टीकरण पाहावें.

अक्षर एक किंवा अनेक व्यंजनानीं युक्त स्वर किंवा नुसता स्वर.
अंग प्रत्ययापूर्वी होणारें शब्दांचें रूप.
अध्याहृत भरतीस घेतलेला (शब्द).
अनिट् १७१.
अनुवाद स्वतःच्या किंवा दुसऱ्याच्या वाक्यांचा पुनः उच्चार.
अन्त्य शेवटचा.
अन्तःसंधि ८.
अन्तःस्थ १.
अभ्यस्त १५८.
अभ्यास १५८.
अलुक् ३४२.
अल्पप्राण २.
अवग्रह १४.
आविकारक १३९.
असवर्ण ९ टीप.
आगम नवीन येणारा वर्ण.
आदेश ९ टीप.
आद्य पहिला.
इट् १७१.
इडागम १७१.
इत् ३ टीप.
उद्देश्य ज्याबद्दल विधान केलेलें असतें तो.

उपसर्ग २७१.
उपान्त्य अन्त्यापूर्वीचा.
उष्म १.
घोष–कठोर २
कार वर्ण किंवा वर्णसमूह दर्शविणारा शब्द.
कारिका स्मरणार्थ, रचलेला संग्रह श्लोक.
कृत् धातुसाधित बनविण्यासाठीं धातूंस लावण्याचे प्रत्यय.
क्रियापद १२५.
गण १२६.
गति ३४२.
गुण ४.
गुरु १८० टीप.
ताद्धित नामसाधितें बनविण्यासाठीं नामांस लावण्याचे प्रत्यय.
दशक दहांचा समुदाय.
द्वित्व १५८.
धातु क्रिया दर्शविणारा मूळ शब्द.
नाम ४२.
पद शब्द.
पद १२५.
पद अंग ७३ टीप.
प्रकृति ४४.
प्रत्ययान्त धातु १२५, २२३.

प्रत्याहार ३.
बहिःसंधि ८.
भ अंग ७३टीप.
महाप्राण २.
अघोष–मृदु २.
लघु ह्रस्व
लोप (वर्ण) गाळणें.
वचन ४३, २९९.
विकरण १२१.
विकल्प करावें अगर न करावें.
विकरण १३९.
विग्रह ३३५.
विधेय एखाद्याबद्दल जें विधान विलेलें असतें तें.
विभक्ति ४३.
वृद्धि ५.
वट् १७१.
संप्रसारण ६.
संयोग जोडव्यंजन.
सरूप ज्यांतील वर्ण सारखे आहेत असा.
सर्वनामस्थान ७३टीप.
सवर्ण ९ टीप.
साधित १०८, १२५.
सिद्ध १०८, १२५.
सूत्र आतिसंक्षिप्त नियम,
सेट् १७१.
स्पर्श १.
स्वार्थ शब्दाचा मूळ अर्थ

# शुद्धिपत्र

पुस्तक वाचण्यापूर्वी अशुद्धें शुद्ध करावींत.

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १ | १२ | गच्छासि | गच्छसि |
| ,, | १४ | मासं | मांसं |
| ३ | २५ | विश्यामः | विशामः |
| ४ | १० | त्याचार्ये | त्याचार्यः |
| ५ | २६ | चरिनानि | चरितानि |
| ६ | ९ | गणायामि | गणयामि |
| ९ | ८ | भुत | भूत नकोच |
| १३ | ७ | तावद | तावद् |
| ,, | १३ | श्रेष्ठस्तु | श्रेष्ठस्त |
| १४ | १७ | स्पश् | स्पृश् |
| १५ | १ | दंण्डं | दण्डं |
| १८ | १५ | अमिवादये | अभिवादये |
| ,, | २१ | श्वश्रवाम् | श्वश्र्वाम् |
| २० | १८ | धत्यानि | धन्यानि |
| २२ | १ | मक्षिता | मक्षिका |
| ,, | १६ | सृज् १ प. | सृज् ६ प. |
| ,, | २५ | निस्पृहस्य | निःस्पृहस्य |
| २४ | १३ | पातिक्रिया | प्रतिक्रिया |
| २५ | ५ | युज् ( प्र ) ६ उ. | युज् ( प्र ) ७ उ. |
| २६ | ७ | यावंज्वी | यावज्जी |
| ,, | १७ | सत्यज्य | संत्यज्य |
| २८ | १० | न्काधुना | क्काधुना |
| ३१ | ७ | वृ ( नि ) १०५. | वृ (नि) ५,९,१ उ. प्रयो. |
| ३२ | १ | तावचण्डो | तावच्चण्डो |

| | | | |
|---|---|---|---|
| ३९ | २ | शृणुयाद | शृणुयाद् |
| ,, | ३ | निस्य | नित्य |
| ,, | ६ | नाशन्कुवन् | नाशक्नुवन् |
| ४० | १९ | तधा | तथा |
| ४१ | १६ | मात्मानः | मात्मनः |
| ,, | २२ | चारिम्यो | चारिभ्यः |
| ४२ | १ | पूवाभि | पूर्वाभि |
| ,, | २६ | अभिनव | अभिभव |
| ४४ | ५ | वार्णिजो | वाणिजो |
| ,, | १७ | भवेत | भवेत् |
| ,, | २३ | यझर्तरेव | यझर्तुरेव |
| ४७ | ९ | कृत्तिका | कृत्तिकाः |
| ४८ | १ | रादश्यसे | राद् दृश्यसे |
| ४९ | ९ | वार्योकस | वार्योकस् |
| ,, | १२ | प्राणिन | प्राणिन् |
| ५५ | ९ | त | न |
| ,, | १८ | गीभि | गीर्भि |
| ,, | २२ | चाष्य | चाप्य |
| ५५ | २२वी ओळ १७च्या खालीं वाचणें. | | |
| ५९ | १५ | प्रथ् | ग्रंथ् |
| ६१ | १२ | विप्रोऽज | विप्रोऽन |
| ,, | २४ | श्रोतृणा | श्रोतॄणा |
| ६४ | २ | क्षलमः | क्षसमः |
| ६९ | १६ | जन्मातरो | जन्मान्तरो |
| ,, | १८ | प्रातिप्रद्यते | प्रातिपद्यंते |
| ,, | २२ | दंष्ट्रा | दंष्ट्रा |
| ७७ | १७ | पदभ्या | पद्भ्या |
| ८० | १९ | जैतातृक | जैवातृक |
| ८२ | ३ | कुवन्ने | कुर्वंन्ने |

| | | | |
|---|---|---|---|
| ,, | ५ | कुरुंगायते | कुरंगायते |
| ८८ | ७ | लब्धाधिकारो | लब्धाधिकारो |
| ९३ | १४ | धर्मतौं | धर्मतौं |
| ९७ | ७ | दशनेन | दर्शनेन |
| १०० | ५ | कम | कर्म |
| १०३ | २२ | भुञ्जनानां | भुञ्जानानां |
| १०४ | ११ | युरव | युरेव |
| १०५ | १० | द्रुमतश्नतः | द्रुतमश्नतः |
| १०७ | ४ | धुव | ध्रुव |
| ११२ | १४ | वतेथाः | वर्तेथाः |
| ,, | १५ | आयक्ताः | आयुक्ताः |
| ११७ | १५ | मान्मनः | मात्मनः |
| १२१ | १८ | शातं | शांतं |
| १२८ | १७ | रुष्ट भये | रुष्टे भयं |
| ,, | २४ | भषितम् | भाषितम् |
| १२९ | २ | धर्मम | धर्मम् |
| ,, | ३ | पदम | पदम् |
| १२९ | २१ | न धर्मम् | धर्मम् |
| १३४ | ४ | सस्मेरस्म | सस्मेरस्य |
| १३६ | ११ | नूपतेः | नृपतेः |
| १४१ | ११ | करवामहे | करवामहै |
| १४३ | ६ | मेतद | मेतद् |
| १४५ | १० | सामायताः | समायाताः |
| १४८ | १८ | मस्य | मत्स्य |
| १५० | ११,१२ | कूलीर | कुलीर |
| १६२ | २८ | निवासामि | निवसामि |
| १६५ | २२ | कामनां | कामानां |
| ,, | २७ | नृंशंसे | नृशंसे |
| १६७ | २५ | चितां | चिन्तां |

| | | | |
|---|---|---|---|
| १६८ | ५ | रक्षसः | राक्षसः |
| १६९ | १४ | जीविताम् | जीवितम् |
| १७४ | ७ | पानप | पान |
| १७५ | ९ | विसास | विश्वास |
| ,, | २६ | पञ्चे | पंके |
| ,, | २६ | अतस्वा | अतस्त्वा |
| १७६ | १ | त्मननः | त्मनः |
| ,, | ३ | तथाह्य | तथाह्यु |
| ,, | २१ | जालोर्भि | जालोर्मि |
| ,, | २२ | पुल्लुवे | पुप्लुवे |
| १७७ | १२ | वीर्ववान् | वीर्यवान् |
| १८३ | १८ | दुधर्षा | दुर्धर्षाः |

---

## व्याकरण

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ७ | २० | अनुमासिक | अनुनासिक |
| ९ | ५ | न च्या | न् च्या |
| ११ | ६ | दुघ् + | दुघ्+ |
| १४ | २० | आकारान्त | अकारान्त |
| १६ | २२ | वारिभि | वारिभि: |
| १७ | २७ | धेनुभ्य | धेनुभ्यः |
| १८ | २० | इकारान्त | ईकारान्त |
| २० | ३ | स्त्रियैः | स्त्रियै |
| ,, | ८ | उकारान्त | ऊकारान्त |
| २५ | ५ | दिश, दृश, | दिश्, दृश् |
| ,, | १७ | भिषक् | भिषज् |
| ,, | २३ | असृज् | असृक् |

| | | | |
|---|---|---|---|
| २७ | ८ | दधुलिह्म् | मधुलिह्म् |
| ,, | २१ | दकारादि | द्कारादि |
| २८ | ७ | मित्रधुभ्याम् | मित्रध्रुग्भ्याम् |
| ,, | २५ | पूर् | पुर् |
| ३१ | २४ | पथभ्याम् | पथिभ्याम् |
| ,, | २५ | पथिभ्याम | पथिभ्याम् |
| ३२ | २४ | श्रीमान् | श्रीमत् |
| ३३ | ५ | जांवाद्भिः | जीवाद्भिः |
| ३४ | १२ | व बहुवचनी | न. बहुवचनी |
| ४० | १३ | प्रत्यङ | प्रत्यङ् |
| ४१ | २२ | सर्वो | सर्वौ |
| ,, | २४ | सर्वेः | सर्वैः |
| ४३ | ६ | पूर्वायाम् | गाळणें |
| ४४ | १२ | काभ्याम किम | काभ्याम् किम् |
| ४६ | १३ | अमून् | अमूः |
| ४७ | ७ | अष्मान् | अस्मान् |
| ,, | १६ | दशन | दशन् |
| ,, | १९ | एकोणिस | एक्याण्णव |
| ४८ | ५ | द्वविंशाति | द्वाविंशति |
| ,, | ११ | व्यशीति | द्यशीति |
| ,, | १५ | द्वाष्टनः | द्यष्टनः |
| ,, | ,, | शांत्याः | शीत्योः |
| ५५ | २१ | आकारान्त | अकारान्त |
| ५७ | ५ | लबवत् | बलवत् |
| ५७ | १५ | कनीयस | कनीयस् |
| ७४ | २१ | ययाः | युयाः |
| ७७ | २२ | दुहेव | दुह्वे |
| ,, | २४ | अदुह् | अदुह्व |
| ,, | २७ | दुहतान् | दुहताम् |

| | | | |
|---|---|---|---|
| ७८ | १ | दुह्वीयातम् | दुह्वीयाताम् |
| ,, | ९ | लीढः | गाळणें |
| ,, | ११ | लेह्वामहे | लेह्वामहै |
| ,, | २३ | जक्ष | जक्ष् |
| ७९ | १४ | चाकास्ताम् | चकास्ताम् |
| ७९ | २० | वियः | विभ्रः |
| ८० | ११ | अंशात् | अशात् |
| ,, | १७ | ह चा | ह् चा |
| ८३ | २४ | दधतु | दधातु |
| ९० | २० | जायीयात् | जानीयात् |
| ९१ | २६ | मुचि | मुच् |
| ९६ | ९ | इजे | ईजे |
| ,, | २२ | विविधः | विविधुः |
| ९७ | २५ | चकसांचकार | चकासांचकार |
| ९९ | २६ | स्पृश | स्पृश् |
| ,, | २७ | स्नष | स्नष् |
| १०६ | २६ | अभङ्क्षुः | अभाङ्क्षुः |
| १०७ | २६ | व्यचेषाथाम् | व्यजेषाथाम् |
| १०९ | ४ | तृ | तॄ |
| ,, | ५ | पृ | पॄ |
| ११२ | ९ | प्लू | प्लु |
| ,, | २४ | ऋकारान्त धातु | गाळणें |
| ११४ | १२ | विप्राविषति | यियविषति |
| ११९ | १३ | अनीयव | अनीयत |
| ,, | ,, | तीयेत | नीयेत |
| १२० | ,, | वस | वस् |

# विद्वानांचे अभिप्राय

'संस्कृतप्रवेश' या पुस्तकाचा सरकारी व निमसरकारी शाळांतून अद्याप प्रवेश झालेला नाहीं; असें असतांही त्याची ही ५ वी आवृत्ति निघावी यावरून पुस्तकाचे योग्यतेबद्दल एकच अनुमान निघतें व तें म्हणजे वरील पुस्तक अत्यंत उपयुक्त व सर्वोत्कृष्ठ आहे हें होय. त्याच्या लोकप्रियतेचीं विविध कारणें आहेत. त्यांपैकीं पहिलें व महत्त्वाचें कारण म्हणजे त्यामध्यें स्वीकारलेलें धोरण हें होय. ह्या पुस्तकांतील व्याकरणाचे पाठांचा अनुक्रम सिद्धांतकौमुदीचे अनुक्रमास जुळणारा असून क्वचित् प्रसंगीं विषयाचें आकलन सौकर्यानें होण्यासाठीं योग्य तो फेरफार केलेला आहे. पाणिनीच्या ठळक ठळक सूत्रांचाही चांगल्या रीतीनें परिचय करून देण्याची रा. देसाई यांनीं काळजी घेतलेली आहे. नवीन रीतीनें संस्कृत शिकण्याचे पद्धतींत जर एक मोठा दोष असेल तर तो हा कीं, तीमध्यें व्याकरणासंबंधीं एक प्रकारची अनास्था आहे. या रीतीनें अभ्यास करणाऱ्यास व्याकरणाचे बाबींत आत्मविश्वास कधींहि वाटत नाहीं; जमिनीचा आधार नसलेल्या व जलप्रवाहांत गटांगळ्या खाणाऱ्या माणसाप्रमाणें यांची स्थिती होते. व्याकरणाचे पूर्ण ज्ञानाशिवाय भाषेचें ज्ञान होणें अशक्य आहे.

या पुस्तकांत निवडलेले वाचनपाठ सुद्धां फार महत्त्वाचे आहेत. केवळ व्याकरणाचे सोईसाठीं नीरस वाक्यांचा हा संग्रह नसून, प्रत्येक वाक्याची भाषा व त्यांत व्यक्त केलेला विचार यांचा एकदां परिचय झाला असतां ते कायमचे स्मृतिमंजूषेंत जपून ठेवण्याच्या योग्यतेचे आहेत. संस्कृत वाङ्मयाचा विविधपणा, वैचित्र्य व प्रौढी, आणि त्या वाङ्मयाचे अभ्यासानें होणारे इष्ट संस्कार यांचीही जाणीव हें पुस्तक करून देईल याबद्दल शंका वाटत नाहीं. ह्या पुस्तकाचे योग्यतेप्रमाणें त्याचा प्रसार सर्व शाळांतून होईल अशी इच्छा व्यक्त करून हा अभिप्राय पुरा करितों.

**चिंतामण रामचंद्र देवधर, एम्. ए.**

असिस्टंट सुपरिंटेंडेंट, न्यू इंग्लिश स्कूल, पुणें.

आपलें पुस्तक व्यवस्थित रीतीनें जो अध्ययन करील त्यास सर्व प्राचीन संस्कृत वाङ्मयाचा चांगला परिचय होईल अशी खात्री वाटते. आपण व्याकरणाचे नियम प्रकरणवार दिले हें मला फार आवडलें. कारण एका प्रकरणाचा सर्व विचार एकदम डोळ्यापुढें आल्यानें संस्कार दृढतर होतात. आणखी व्याकरणाचे संस्कृत प्रत्यय व संस्कृतसंज्ञा आपण मूळाप्रमाणें कायम ठेवल्या आहेत, त्यामुळें पूर्वींच्या टीकांतील व्याकरणनिर्देश अपरिचित वाटणार नाहींत. भांडारकर वगैरेंच्या पुस्तकांवरून संस्कृत शिकणारांस क्यच्, क्यङ् वगैरे काव्यप्रकाशांतील निर्देश फार दुर्गम वाटतात हें बी. ए. चे वेळीं काव्यप्रकाश शिकणाऱ्यांच्या अनुभवास आलेलें आहे. आपलें पुस्तक शिकल्यानंतर सिद्धांत कौमुदी शिकण्याची सहज स्फूर्ति होईल व पुढें कौमुदी शिकणें फारच सुगम जाईल. दुसरें, भांडारकराचे पुस्तकांतील संस्कृत वाक्यें अगदींच यांत्रिक म्हणून नीरस असत म्हणून तीं विद्यार्थ्यांचे तोंडीं बसून कांहीं उपयोग नव्हता. आपण सर्व वाक्यें प्राचीन अभिजात वाङ्मयांतून घेतलीं असल्यामुळें तीं तोंडीं बसल्यास विद्यार्थ्यांस जन्मभर उपयोगीं पडतील. शिवाय आपली वाक्यांची निवड सर्वसंमत होण्यासारखी आहे. कारण त्यांत नीतिबोध, शौर्य-धैर्यादि सद्गुणांचा विकास ठिकठिकाणीं आढळून येतो. हीं सर्व वाक्यें विद्यार्थ्यांनीं पाठ केल्यास त्यांस संस्कृतांतील न्याय, म्हणी सुभाषितांचा परिचय होऊन तासचे तास सुललित भाषेंत व्याख्यान देतां येईल, अशी खात्री वाटते. मराठीचें संस्कृतांत भाषांतर करण्याकरितां आपण थोडीं वाक्यें दिलीं आहेत. माझे मतें तेवढींही देण्याची जरूर नाहीं. कारण अशा तऱ्हेनें, बोलण्यांत यांत्रिकपणा येतो व सरससरलता जाते. कादंबरीचा उत्तरार्ध पाठ करून जसें बोलतां येतें तसें भाषांतराचे यांत्रिक वाक्यांनीं येत नाहीं असा अनुभव आहे. पूर्वींच्या सर्व पुस्तकांपेक्षां आपले पुस्तकांत शब्दसंग्रहही फार मोठा आहे. त्यामुळें विद्यार्थ्यांचें संस्कृत वाङ्मयज्ञान विस्तृत होईल. एकंदरींत हें पुस्तक सर्वोपकारक झालें आहे. हें अशा सर्व गुणांनीं विशिष्ठ पुस्तक करुन आपण विद्यार्थिवर्गावर फार उपकार केले आहेत.

श्रीधरशास्त्री पाठक,
संस्कृताचे आचार्य, डेक्कन कॉलेज, पुणें.

